# काळांतील निवडक निबंध

## भाग पांचवा



शिवराम महादेव परांजपे



प्रस्तावना लेखक

प्रा. न. र. फाटक, मुंबई



पुनर्मुद्रण : २७ सप्टेंबर १९४६



किंमत

कागदी बांधणी ५ रुपये ] [ कापडी बांधणी ५॥ रुपये

# अनुक्रमणिका

—:०:—

चालू युद्धजन्य परिस्थितीमुळें काळांतील निवडक निबंधाचीं पुस्तकें जितक्या किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती तितक्या किंमतींत देतां आलीं नाहींत. म्हणून काळांतील निवडक निबंधाचे पहिले पुस्तकांत एक सवलतीचें कूपन टाकलें आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा उपयोग करून घ्यावा.

व्यवस्थापक

य. गो. जोशी प्रकाशन कार्यालय

६२३/१५ सदाशिव पुणें २

# प्रस्तावना



या पुस्तकांत एकूण २२ लेख आहेत. त्यांतील अनेकांवरून ते १९०१–१९०२ सालांतील आहेत याचा जाणत्यांना बोध होईल. १९०१ सालच्या प्रारंभीं इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया मरण पावली व तिचा थोरला मुलगा ७ वा एडवर्ड याच्या राज्यारोहणाची धामधूम सुरू झाली. परंतु तो प्रसंग पार पडण्यापूर्वींच एका मोठ्या रोगाच्या तडाख्यांत एडवर्ड सांपडल्यामुळें राज्याभिषेकाचा सोहळा लांबणीवर टाकावा लागला. या धांदलीला अनुलक्षून लिहिलेले कांहीं लेख या संग्रहांत आलेले आहेत. हे लेख प्रासंगिक स्वरूपाचे असले तरी कै. शि. म. ऊर्फ अण्णासाहेब परांजपे यांच्या विचारसरणीचे वैशिष्ट्य त्यांत उतरलेलें आहे. अण्णासाहेब हे इंग्रजी राज्याचा मनापासून तिटकारा करणारे व त्या तिटकाऱ्याचे इतरांना शिक्षण देणारे असल्यामुळें त्यांनीं राजेसाहेबांच्या दुखण्याचा विषय इतर कोणत्याही वृत्तपत्रकारापेक्षां अगदीं वेगळ्या रीतीनें हाताळल्याचें सहज दिसून येईल. या विषयाचा उपन्यास अण्णासाहेबांनीं 'ईश्वरीसूत्र कांहीं निराळेंच असतें', या ६ व्या लेखांत केलेला असून पुढें तोच विषय 'स्वदेशाभिमान आणि साम्राज्य' (१०), 'हिंदुस्थानांतील प्रतिनिधींच्या महत्त्वाकांक्षा' (१२), 'देशभक्ति आणि राजनिष्ठा' (१३), 'चांगला राजा आणि राजनिष्ठा' (१४), 'मृत्यूचा दरबार आणि दिल्लीचा दरबार' (१७), 'कराराची कल्पना', 'जर करार तर उत्सव कसला ?' (१९–२०) या लेखांतून परोपरीनें खेळविलेला आहे. हिंदी प्रजेनें इंग्रजांच्या राज्याबद्दल म्हणजे एक प्रकारें आपल्या पारतंत्र्याबद्दल निष्ठा कशी बाळगावयाची हा प्रश्न त्यांनीं या लेखांतून घोळघोळून लोकांसमोर ठेवला आहे. अण्णासाहेबांना इंग्रजी राज्याविषयींच्या निष्ठेची किती चीड होती याचें प्रत्यंतर 'ईश्वरीसूत्र कांहीं निराळेंच असतें !' या लेखांतील अनेक वाक्यांच्या लहान लहान शब्दांतून आढळण्याजोगें आहे. या लेखाच्या दुसऱ्या परिच्छेदाच्या

" आपल्या परमप्रिय राणीसाहेब मेल्यापासून आपल्या परमप्रिय एडवर्ड साहेबांच्या ह्या राज्यारोहणाची तयारी चाललेली होती. ... ... जूनची २६ तारीख हा राज्यारोहणाचा दिवस कधीं येईल. असे प्रत्येक मुलाला, स्त्रीला, आणि उल्लू पुरुषाला झालेलें होतें." या वाक्यांतील दोनच शब्द येथें निर्देशिले असले तरी त्याच्यासारखे आणखी किती तरी शब्द वाचकांना या लेखांत व अन्यत्र हुडकतां येतील व त्यांच्या योगानें अण्णासाहेबांच्या प्रखर देशभक्तीचा बोध होईल एडवर्डच्या राज्यारोहणाचा समारंभ लांबला यामुळें अण्णासाहेबांना सारें वर्ष या एकाच विषयाच्या अनुषंगानें घालवितां आलें व जनतेची स्वदेशभक्ति त्यांनीं जागृत करण्याचा सपाटा चालविला असें दिसून येतें. अण्णासाहेबांनीं आपली राजकीय विचारप्रणालि फ्रेंच क्रांतिकारकांकडून उचलली होती. राजा व प्रजा यांच्या दरम्यान करार घडून आलेला असतो ही कल्पना फ्रेंच क्रांतिकारक रूसो याची असल्याचें निराळें सांगावयास नको. विचार क्रांतिकारकाचे आणि लेखनशैलीची वक्रोक्तिकुशल धार स्विफ्टची अशी जोड अण्णासाहेबांच्या साहित्य निर्मितींत पडलेली आढळते.

परकीय राज्यसत्तेच्या जाचक जोखडाची जाणीव आपल्या वाचकांना करून देण्याला अण्णासाहेबांना किती साधा विषय पुरत असे याची कल्पना 'प्रभाकरपंतांचे विचार' (७) या लेखानें होईल. ह्या लेखाच्या सुरुवातीस जातां जातां प्लेगची लस टोंचून घेण्याच्या पद्धतीबद्दलची प्रतिकूलता सुचविण्याची संधि त्यांनीं वायां दवडलेली नाहीं. प्रभाकरपंतांनीं इनॉक्युलेशन करून घेतल्या-पासून त्यांची प्रकृति जी बिघडली ती कांहीं केल्या सुधारेना, असा ह्या लेखाचा प्रारंभ आहे. १९००–१९०१ या वर्षांत इनॉक्युलेशन इष्ट कीं अनिष्ट या प्रश्नाची अटीतटीनें चर्चा सुरू होती. सर्वसाधारणपणें बहुजनसमाजाला इनॉक्युलेशनचें भय वाटावें, अशीं मतें एका पक्षाकडून मोठ्या ईर्ष्येनें मांडलीं जात होतीं. अण्णासाहेबांनीं त्याच पक्षाकडे आपला कल ठेवला असल्यास नवल नाहीं. त्याप्रमाणें त्यांच्या लेखाचा नायक इनॉक्युलेशनचे दुष्परिणाम टाळण्याकरितां वैद्याच्या सल्ल्यावरून एका खेडेगांवांत गेला. अण्णासाहेब खेड्याच्या परिस्थितीचे अत्यंत भक्त होते. विशेषतः खेड्याच्या आसपासच्या वनश्रीचा आनंद लुटतां लुटतां ते कधीं कधीं अगदीं बेभान होऊन जात असावे, असें त्यांनीं अनेकदां केलेल्या ह्या विषयाच्या वर्णनावरून तर्क करण्याला जागा

आहे. या लेखांत त्यांनीं वनश्रींचें जें वर्णन केलें आहे, तें लेखाच्या मूळ उद्देशाकडे पाहतां प्रमाणाबाहेर गेल्याचा अनुभव आल्याशिवाय राहत नाहीं; सृष्टिसौंदर्याचा विषय निघाला कीं प्रमाणाची शुद्धि राहूं नये, अशी त्यांची सृष्टिसौंदर्यासंबंधीं विलक्षण आसक्ति होती. तिनेंच या लेखांतही आपला पगडा बसविला आहे. येथील वर्णन वाचीत असतां अण्णासाहेबांचें कवित्व आणि वक्तृत्व या दोन्ही गुणांची ओळख पटते. तें सारें एखाद्या जातिवंत कवीच्या कल्पकतेला साजणारें आहे. कित्येक कल्पनाही अपूर्व आहेत. "त्या वेळीं पृथ्वीवर जो सर्वत्र हिरवा रंग पसरलेला दिसत होता, तो परमेश्वराच्या सदय अंतःकरणाचा कोवळेपणा व लुसलुशीतपणाच पर्जन्याच्या धारांबरोबर आकाशांतून ह्या मृत्युलोकावर उतरून चोहोंकडे पसरला आहे कीं काय असें वाटत होतें." ...... "त्या वेळीं कोवळें कोवळें ऊन पडलेलेंच होतें, तरी पण आकाशांतून मधून मधून पावसाचे अगदीं बारीक तुषार वाऱ्यानें उडत असलेले दृष्टीस पडत होते ... ... त्याला पावसाचे तुषार म्हणण्यापेक्षां आकाशांतील बर्फाच्छादित मार्गांतून मेघराजाची स्वारी चालली असता त्याच्या चरणाघातांतून उठलेली ती बर्फाची धूळच होती, असें म्हटलें तर जास्त शोभेल." अशा वेळीं त्या मनोहर प्रदेशांत मुलें खेळायला आलीं व या मुलांच्या खेळांतील एका वाक्प्रचारावरच या लेखाची सारी मदार आहे. मुलें खोखोचा डाव खेळत होतीं. ज्याच्यावर हार आली होती त्याला 'तुझ्यावर राज्य आलें आहे' असें म्हणून बाकीचीं मुलें चिडवीत होतीं......" त्या वेळीं त्याना मीं म्हटलें, 'अरे मुलांनो, त्याला काय चिडवितां ! तुमच्यावर देखील राज्य आलेलें आहे.' हे माझे शब्द ऐकतांक्षणींच 'आमच्यावर कोणाचें राज्य नाहीं' असें तीं मोठ्यानें ओरडलीं. याप्रमाणें वारंवार बजावीत असतांही तीं प्रभाकरपंतांचें म्हणणें मुळींच कबूल करीनात. तेव्हां प्रभाकरपंत विचारांत पडला." येथून पुढें अण्णासाहेबांनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याचे अनिष्ट परिणाम वर्णून आपला देशभक्ति हा प्रिय विषय उजळून काढला आहे. "या मुलाना आपल्यावर राज्य आलें म्हणजे काय हें तूर्त कळत नाहीं तर त्यांच्या सुखांत व्यत्यय कां आणा ? मोठेपणीं त्यांना आपोआपच राज्याची दुःखदायक ओळख पटेल, असें मनांत आणून प्रभाकरपंत स्तब्ध राहिला. हळूहळू सभोंवतीं अंधाराबरोबर स्तब्धताही पसरली."

अण्णासाहेबांच्या देशभक्तीचा जळजळीतपणा पाहावयाचा असेल तर ' उत्प्रेक्षेसाठीं अर्थांतरन्यास ', ' पोपट आणि परशुराम ' हे दोन लेख अवश्य पाहावे. एडवर्ड राजाच्या सिंहासनारोहणाचा समारंभ अतिशय दिमाखानें साजरा करण्याकरितां विलायतेस बोलावून नेलेल्या राजांपैकीं कोल्हापुर व ग्वालेर या दोन संस्थानांच्या नरेशांना तिकडील विद्यापीठांनीं एल्एल्. डी. ची पदवी बहाल केली. याबद्दल लोक साशंक झाल्याचें पाहून कोल्हापूरच्या 'ग्रंथमाले'नें ( हिच संपादक व प्रकाशक पुढें ज्यांना कोल्हापुरच्या याच एल्एल्. डी. छत्रपतींनीं तुरुंगांत टाकले ते महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे आद्यप्रवर्तक व समर्थ विद्यालयाचे संस्थापक के. विष्णुअण्णा विजापूरकर होते ) अगदीं चमत्कारिक खुलासा प्रसिद्ध केला. ज्या छत्रपतींनें स्वराज्य स्थापन केलें त्याचे हे वंशज म्हणून गौरवबुद्धीनें ब्रिटिश विद्यापीठानें त्यांस एलएल. डी. ही पदवी अर्पण केली अशा अर्थाच्या त्या खुलाशांत आणखी कित्येक वाक्यें अशीं होतीं कीं, ज्याकडे पाहून कुणीही तिरस्कारानें हसावें. अण्णासाहेबांना तो खुलासा वाचून काय वाटलें व त्यांनी आपले विचार सांगण्याला त्याचा उपयोग कसा केला हें त्या लेखावरून नजर टाकतांच कळणारें आहे. देशभक्तीचा गुण हा देशकालानुसार आपलें रूप बदलणारा नसतो. त्याचें रूप मदर लेखापूर्वीं किंवा त्या लेखाच्या वेळीं जसें होतें तसेंच ते आजही आहे. अण्णासाहेबांनीं त्या गुणाच्या कसोटीवर 'ग्रंथमाले'च्या खुलाशांतील अनेक विधानें जहाल वृत्तानें तपासलीं असून त्यासंबंधीं आपलीं मतें सादर केलीं आहेत. अण्णासाहेबांना स्वतःच्या हातानें लेख लिहिण्याचा कंटाळा होता. ते तोंडानें मजकूर सांगून दुसऱ्याकडून लिहवून घेत. यामुळें ह्यांच्या वक्तृत्वाचे कित्येक विशेष या लेखांत उत्कटपणानें आलेले आहेत. एक दोन स्थळें तर त्यांच्या खाजगी संवादाचें, स्मरण करून देणारीं आहेत. कोणी बावळट इसम अण्णासाहेबांकडे येऊन असमर्थनीय प्रसंगाची बाष्कळपणानें बाजू सांवरून धरण्याचा यत्न करीत आहे व अण्णासाहेब त्याला त्याच्या शब्दांत धरून त्याची भंबेरी उडवीत आहेत. असा देखावा डोळ्यांसमोर आल्याचा भास अण्णासाहेबांच्या सहवासांत तशा वादाचे प्रसंग अनुभवलेल्यांना झाल्याशिवाय राहणार नाहीं. मात्र लेखांतून तो भाग निराळा काढून पाहिला पाहिजे.

ग्रंथमालाकार—" हिंदुस्थानांतील आलेल्या राजेरजवाड्यांची यादी वाचली

म्हणजे श्रीशिवाजीमहाराजांच्या वंशांतील कोणी आहे कीं नाहीं हें पहाण्याची उत्कंठा झालीच पाहिजे. ज्यांच्यापासून हिंदुस्थानाचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्या शूर व पाणीदार लोकांच्या राज्याचा संस्थापक शिवाजी होता व त्याचा वंश अद्यापि सुरू आहे कीं नाहीं अशी चौकस बुद्धि नाहीं असा एकही इंग्रज असेल...असें आम्हांस वाटतें. ह्या यादींत आमच्या महाराजसरकारांचें नांव सांपडल्याबरोबर त्यांचे मनांत सानंद आदर उत्पन्न होणें साहजिक आहे. अशा पिढींजाद गादीचा आपण बहुमान करावा असें केंब्रिजच्या लोकांस वाटल्या-वांचून राहणें शक्य नाहीं."

अण्णासाहेबांनीं 'एकही इंग्रज असेल असें आम्हांस वाटतें' या वाक्या-च्या [illegible]ीचा दोष ध्यानांत येण्यासाठीं कंसांत 'असेल कीं नसेल' हा प्रश्न टाकला आहे. वर दिलेला मजकूर संपतांच 'कसें-कसें ?' हा सवाल अशा झोकानें ठेवला आहे कीं, प्रत्यक्ष संवाद ऐकत असल्याचा भास व्हावा. यानंतर ग्रंथमालेंतील पदवीमार्गाल कारणपरंपरेचीं वाक्यें देऊन केंब्रिजच्या लोकांना 'अगदीं बरोबर वाटलें !' हा शेरा जोडला आहे. ज्यांचें राज्य इंग्रजांनीं घेतलें ते लोक इंग्रजांना शूर व पाणीदार वाटतात, त्या लोकांचा स्वराज्यसंस्थापक शिवाजी, कोल्हापुरचे महाराज सरकार हे त्याचे वंशज म्हणून केंब्रिजचे लोक बहुमानास प्रवर्तले ही सारीच कल्पना इतकी कच्ची आहे कीं, तिचा भुगा उडवून देतांना अण्णासाहेबांना मुळींच प्रयास पडले नाहींत. शिवाजीला जे चोर, लुटारू म्हणत आले, ते त्याच्या वंशजाला मनापासून कितपत मान देत असतील हें सहज लक्षात येणारें आहे मान देतात असें म्हणावें तर १८८० मध्यें एका छत्रपतीला वेडा ठरवून नगरच्या किल्ल्यांत त्याचे हाल करण्यांत आल्याची कथा विसरणें उचित नव्हे; शिवाय हे थोरांचे वंशज इंग्लंडांत गेले किंवा नेले कशाला, हा प्रश्न प्रामुख्यानें विचारांत घेण्याजोगा आहे, जितांचें राज्यारोहणासमारंभांत प्रदर्शन करण्यासाठीं त्यांना नेलेंल, ही ढळढळीत गोष्ट डोळ्यांआड करणें योग्य नाहीं; वगैरे मुद्दे सांगून पारतंत्र्यानें मानापमानाच्या कल्पना कशा पालटल्या आहेत, याचे अण्णासाहेबांनीं बरेंच विवेचन केलेलें आहे तें मुळांतूनच पाहावें. शेवटीं समारोप केला आहे तो सुद्धां मननीय आहे—
"मिथ्या मानाबद्दल किंवा झांकलेल्या अपमानाबद्दल कोणीही आनंद मानूं नये. किंवा त्याच्याबद्दल कारणें दाखविण्याचेही श्रम घेऊं नयेत....खरें असेल तेंच

बोलावें, उदात्त असेल तेंच लिहावें, उपयोगी असेल तेंच शिकवावें. देशाचें हित ज्यांत असेल तेंच करावें...हें आपलें सगळ्यांचें कर्तव्यकर्म आहे."

'पोपट आणि परशुराम' ह्या लेखाची मध्यवर्ती कल्पना हिंदी राजेरजवाड्यांच्या दिखाऊ बढाईचा विचार करतांना सुचली असावी असें वाटतें. एकदां हे राजे स्वतंत्र होते, आतां ते पिंजऱ्यांत अडकल्याप्रमाणें आहेत. पिंजऱ्यांत असले तरी त्यांची बडेजावी आढळते यावरून परशुरामानें स्वातंत्र्य-पारतंत्र्याचे तुलनात्मक विचार उच्चारले. पारतंत्र्यांत सुख मानणारांचा अण्णासाहेब मनांतून कसा धिक्कार करीत असतील याचाही अंदाज या लेखानें करतां येतो. "तूं गुलामगिरीचा पक्षी आहेस! तूं पारतंत्र्याचा मदतगार आहेस! तूं बंदिवासाचा उपदेशक आहेस! तू परवशतेचें चित्र आहेस!......लहान मुलांच्या दृष्टीस तुझें हें उदाहरण पडलें तर तीं मोठेपणीं गुलाम होतील आणि गार्भिणी स्त्रियांनीं तुझें उदाहरण पाहिलें तर त्यांच्या पोटीं उपजणारीं मुलेंही गुलामच झालीं पाहिजेत. बहुतकरून देवानें तुला आधीं निर्माण केलें आणि नंतर मग ह्या जगामध्यें गुलामगिरी पसरली!" वगैरे.

वृत्तपत्राच्या संपादकाला साधारणतः देशांतील नित्यनैमित्तिक घडामोडींना अनुलक्षूनच आपले विचार लोकांसमोर स्वतःचीं मतें व योग्यता यांच्याधोरणानें ठेवावे लागतात. ही कामगिरी बजावतांना कुठें घसरल्यास इंडियन पीनल कोडाचीं कलमें झडप घालावयाला अण्णासाहेब 'काळ' पत्राचें संपादकत्व करीत असतांना टपलेलीं असत. अण्णासाहेबांचे विचार कायद्याच्या मर्यादा संभाळून प्रकटतील असा भरंवसा नव्हता, म्हणून त्यांनीं इतर वृत्तपत्रांचा धोपट मार्ग सोडून स्वतःकरितां निराळाच पंथ काढला. देशांतील घडामोडींबद्दल जेव्हां जितकें अवश्य असेल तेव्हां तितकें लिहावयाचें, परंतु तसें करतांना वाचकांना स्वदेशभक्तीच्या मात्रेचे वळसे देण्याचा बाणा शक्य तोंवर पाळावयाचा; अशी त्यांची रीत एडवर्डच्या राज्यारोहणावरील लेखांतून स्पष्ट दिसणारी आहे. त्यांनीं त्या प्रसंगाच्या निमित्तानें लोकांची इंग्रजी राज्याबद्दलची अप्रसन्नता वाढविण्याचाच यत्न केला आहे. क्वचित् कायदा टाळण्याच्या धडपडीनें त्यांच्या लेखनकलेचीही हानि केली आहे. देशांतील घटनांविषयीं लिहिण्यांतला धोका टाळण्याकरितां अण्णासाहेबांनीं दरसाल परदेशी इतिहासांतील स्वातंत्र्याच्या कथा निवडलेल्या

दिसतील. या संग्रहांतही अशा कथा आहेत. 'टायरोल', 'पिकाची पाहणी' असे एकंदर आठ लेख युरोपांतील स्वातंत्र्याचा इतिहास निवेदन करणारे आहेत. हा इतिहास कशाकरितां चोखाळला, या प्रश्नाचें उत्तर ह्या लेखांच्या उपसंहारांत सांठविलेलें आहे. या शेवटच्या लेखांत स्वातंत्र्यप्राप्तीच्या तयारीचा तपशील दिलेला असून ह्याचा रोख हिंदी जनतेवर असल्याचें कळण्याला उशीर लागत नाहीं. चक्रनेमिक्रमानुसार जेव्हां हिंदुस्थानावर क्रांतीची लाट येईल तेव्हां हा देश तिच्या स्वागताला सादर पाहिजे. या सूचनेनंतर शिक्षण, शस्त्र, युद्धनैपुण्य, निसर्गाचें अनुकूलत्व आणि जनतेचें ऐक्य या गोष्टींचें विवेचन केलें आहे. राज्यक्रांतीच्या कामीं 'शिक्षण व शस्त्रें या दोन गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत' ... ... 'स्वतंत्रतेबद्दलची प्रीति हें सगळ्या शिक्षणाचें पर्यवसान होय. (येथें 'सा विद्या या विमुक्तये' हें म. गांधींनीं गुजरात विद्यापीठाकरितां निवडलेलें बिरुद स्मरणें अपरिहार्य आहे.) पुष्कळ पुस्तकें वाचणें म्हणजे शिक्षण नव्हे. शाळेच्या, कॉलेजाच्या किंवा परीक्षेच्या हॉलच्या पायऱ्या झिजविणें हें शिक्षण नव्हे. स्वतंत्रतेची लालसा उत्पन्न करील तें शिक्षण; या व्याख्येप्रमाणें ज्यांना शिक्षण मिळालें त्यांना शस्त्रें संपादन करतां येतात; पुष्कळदां शेजारचीं राष्ट्रें चोरून शस्त्रांची मदत करतात. शस्त्रांचा प्रश्न निकालांत निघाल्यावर लढायचें कसें या प्रश्नाचा विचार करावा लागतो. युद्ध, पराक्रम, शौर्य, याविषयीं अण्णासाहेबांनीं केलेली मीमांसा तत्कालीन युयुत्सु देशभक्तांना आशावादाची वाटली यांत आश्चर्य नाहीं. शिक्षण, शस्त्रें, निसर्गाची अनुकूलता या साऱ्या गोष्टी लोकांची एकजूट नसेल तर सपशेल वायां जातात, हा या लेखमालेच्या उपसंहाराचा शेवटचा भाग आहे; व यांतूनच हिंदी इतिहासाची पाहणी करून अण्णासाहेबांना 'मनोराज्य' करावेंसें वाटलें. या 'मनोराज्या'चें चित्र प्रारंभीं कवित्वशक्ति खर्चून रेखाटलें असलें तरी पुढचा सगळा भाग हिंदी राजांच्या फाटाफुटीनें देशावर ओढवलेल्या संकटांच्या वर्णनानें व्यापलेला आहे. हिंदुस्थानांत एकजुटीच्या जोरावर निर्माण होणाऱ्या स्वातंत्र्याचें चित्र आरंभीं रेखाटून असें मनोहर भवितव्य साधण्याचा इशारा त्या लेखाच्या शेवटीं आजच्या दैन्याची व्याजस्तुति कां यावी हें समजत नाहीं. कदाचित् वर्तमान काळाची शोचनीयता ठसठशीतपणानें लोकांच्या डोळ्यांवर घालावी हा उद्देश असेल किंवा स्वभावसुलभ वक्रोक्तीच्या संवयीनें अनावर उचल खाल्ल्याचा

तो परिणाम असेल. परंतु येथें अण्णासाहेबांच्या लेखनविषयांचा विचार कर्तव्य असल्यानें देशांतील घडामोडींचा इतर बहुतेक सगळ्या वृत्तपत्रांच्या वळणांतला काथ्याकूट सोडून आपलें उद्दिष्ट साधण्याकरितां अण्णासाहेबांनीं स्वीकारलेली दिशा केव्हांही अपूर्वच गणावी लागेल.

काळामध्यें पुष्कळदां वर्षारंभी ईश्वराचें माहात्म्य गाण्याचा प्रघात अण्णासाहेबांनीं ठेवला होता. पूर्वोत्तर या दोन मीमांसांचें अण्णासाहेबांचें अध्ययन विशेष असल्यामुळें सगुण ईश्वराच्या कल्पनेवर त्यांचा कितपत विश्वास होता हें सांगणें कठिण आहे; परंतु त्यांनीं या कल्पनेचा आपल्या व्यवहारांत पुष्कळ उपयोग केला याबद्दल संशय नाहीं. ईश्वराची स्तुति का असेना, त्यामध्यें अण्णासाहेबांचा स्वदेशभक्तीचा ध्यास डोकयावल्यावांचून राहत नसे. प्रस्तुत संग्रहांत ‘ परमेश्वराचें अभिवचन ’ या लेखासाठीं त्यांनीं गीतेचा एक प्रसिद्ध श्लोक विवेचनार्थ घेतला असून, अधर्माचें अभ्युत्थान, धर्माची ग्लानि याचा खल करताना हिंदी जनतेची पारतंत्र्यमूलक भीषण परिस्थिति उजेडांत आणलेली आहे. युरोपियन राज्यकर्ते आपलीं अभिवचनें बेलाशक स्वार्थासाठीं मोडतात या स्थितीवरही त्यांनीं कटाक्ष टाकलेला वाचकांना दिसेल. दुसऱ्या लेखांत बौद्धांच्या अहिंसाधर्माचा आणि हिंदूंच्या क्षात्रवृत्तीचा परिणाम कोणता याची माहिती आलेली आहे. क्षात्रवृत्तीची लोकांत जागृति होऊन त्यांच्या हातून स्वदेश पारतन्त्र्याच्या मगरामिठींतून सुटण्यासाठीं पराक्रमाचीं कृत्यें अत्यंत साहसानें व निर्भयपणानें व्हावीं, हा बोध या लेखांत भरपूर आहे. “ मनुष्याला गुलाम बनविणें हें धर्माचें कर्तव्य नव्हे. धर्म ही संस्था गुलामगिरीसाठीं नाहीं. मोक्ष हें धर्माचें अंतिम फल होय. आणि मोक्ष म्हणजे स्वतंत्रताच...... विजयश्रीच्या मंगल मालिकेशिवाय धर्माचाही कंठ ओका दिसतो आणि शत्रूच्या मस्तकावर उभा राहिल्याशिवाय धर्म ( त्यांतील कित्येक मतें कितीही उच्च असलीं तरी ) ठेंगणाच दिसतो...मी सूर्यमंडळ भेदून जाईन हा विचार ज्याच्या डोक्यामध्यें घोळत आहे त्याला शत्रूचें डोकें फोडणें फारसें अशक्य आहे काय ? असले उदात्त हेतु आणि उदात्त फलें आपल्या शास्त्रकारांनीं आपल्या योद्ध्यांच्या पुढें ठेविलीं आहेत. त्यामुळें आजपर्यंत या भारतभूमीच्या इतिहासामध्यें लोकांच्या हातून अनेक शूरत्वाचीं कृत्यें पूर्वीं झालेलीं आहेत व पुढेंही होण्याचा संभव आहे.” अशा-

सारख्या वाक्यांची गधून मधून पेरणी करून अण्णासाहेबांनीं आपली पारतंत्र्य-विरोधाची तळमळ जागजागीं मोठ्या खुबीनें व्यक्त केली आहे.

ब्रिटिश राज्यकर्ते एखाद्या बलाढ्य राष्ट्राशीं लढण्याच्या संकटांत सांपडले म्हणजे हिंदी जनतेला राजकीय मोक्ष साधेल, ही एक कल्पना हिंदी राष्ट्रवादाच्या मुळाशीं फार दिवस जखडलेली होती. तिचा प्रत्यक्ष उच्चार प्रस्तुत संग्रहाच्या लेखांतून नसला तरी निराळ्या रीतीनें ती उघडकीस आणलेली आहे. राज्यकर्त्यांनीं पापें करूं नयेत, त्यांना इहलोकीं कोणी वरिष्ठ नियंता नसला तरी ईश्वराच्याकडे त्या पापांचा झाडा द्यावा लागतो, या कल्पनेच्या रूपानें वरील कल्पनेला तोंड पडलेलें दिसतें. गोवध ( १८ ) हक्काच्या नोंदीचा कायदा ( १५ ) या लेखांतून वरील कल्पनेला पुष्कळच वाव मिळाला आहे.

'एका गुणी माणसाची बदृछान' ( १६ ) हा लेख कुणाला पुढें ठेवून लिहिला आहे, याबद्दल मतभेद असला तरी इंग्रजी चालीरीतीनें व्यवहार करावयास सवकलेल्या स्त्री-पुरुषांवर ( त्यांत सामाजिक सुधारणाही जमेस धरली पाहिजे ) या लेखांत कोरडे ओढले आहेत, याचें ज्ञान वडणें फारसें कठिण नाहीं. 'शिपाई हा सुद्धां एक नागरिक आहे' हा लेख अगदीं स्वतंत्र स्वरूपाचा व बराच महत्त्वाचा आहे. अनियंत्रित राज्यकर्ते शिपाईगिरीच्या पेशाला कसें राबवितात याची माहिती या संग्रहांतील दुसऱ्या लेखातून तुरळक तुरळक आलेली आहे. समाजांत शिपायाचा दर्जा काय व त्यानें स्वजनाच्या संबंधांत आपलें कर्तव्य बजावतांना कोणती दृष्टि बाळगावी, याची शहानिशा कायद्याच्या तत्त्वज्ञानांत पुष्कळच पाहावयाला सांपडते. १९१९ साली पंजाबांत लष्करी कायदा पुकारला गेल्यावर शिपाईगिरीच्या कर्तव्यांबद्दल तात्त्विक ऊहापोह येथील वृत्तपत्रांतून मोठाले कायदेपंडित करूं लागले. अण्णासाहेबांनीं हा लेख लिहिला त्या काळीं शिपायाच्या नागरिकत्वाची चर्चा करण्याला कोणता प्रसंग उद्भवला हें नीटसें लक्षांत येत नाहीं. बोअर लोकांच्या बंदोबस्तासाठीं हिंदी फौजांचा उपयोग केला, एडवर्ड राजाच्या राज्यरोहणानिमित्त हिंदी फौजा राबविणार, असल्या गोष्टींतून हा विषय सुचल्याचा तर्क करवतो. कारण कांहींही असलें तरी हा लेख ४५ वर्षांपूर्वींच्या काळाकडे नजर टाकल्यास अण्णासाहेबांच्या सर्वव्यापी देशभक्तीबद्दल कौतुक उत्पन्न केल्याशिवाय राहत नाहीं. १९४५ सालानें

'शिपाई हा सुद्धां एक नागरिक आहे' या सिद्धांताच्या खरेपणाची साक्ष हिंदी जनतेला व ब्रिटिश राज्यकर्त्यांना पटविली. ब्रिटिश राज्यकर्तृत्वाविषयीं अप्रीति लोकांमध्यें उत्पन्न करण्यासाठीं जो जो विषय सांपडेल, सुचेल किंवा निघेल त्याला आपल्या विचारसरणीच्या चरकांत पिळून काढावयाचें हा अण्णासाहेबांचा खाक्या सगळीकडे अचूक प्रत्ययास येतो.

'काळांतील निवडक निबंधां'चें महत्त्व, ते निबंध ज्या काळांत लिहिले गेले त्याकडे लक्ष देऊनच ठरवावयाला पाहिजे. आजचा नवीन वाचक त्यापासून सर्वच बाबतींत इतक्या दूर अंतरावर आलेला आहे कीं, त्याला यांतले कित्येक लेख अगदींच सौम्य वाटतील; कित्येक लेख पूर्णपणें निरर्थक आहेत, असें म्हणण्यापर्यंतही त्याची मजल जाईल. आज आपण राजकीय स्वातंत्र्याच्या मंदिरांत नसलों तरी आवारांत निःसंशय पोंचलेलों आहों. अण्णासाहेबांनीं लोकांच्या राजकीय जागृतीनिमित्त काम सुरू केलें त्या दिवसांत स्वातंत्र्याचें स्वप्नही नव्हतें. स्वातंत्र्य, स्वराज्य वगैरे शब्दांच्या घोषणा १९०५ नंतर भीतभीत बेताबेतानें होऊं लागल्या. अशा परिस्थितींत राजकीय पारतंत्र्याचा तिटकारा लोकांना शिकविण्याची कामगिरी किती बिकट असेल याची कल्पना तेव्हांचा संपूर्ण इतिहास डोळ्यांसमोर असल्याशिवाय होणार नाहीं. अण्णासाहेबां-सारख्यांनीं ज्या विचारांची शिकवण दिली, तेच विचार पुढें प्रबळ होत जाऊन लोकांनीं स्वातंत्र्याचें आवार गांठलें. प्रतिकूल परिस्थितीची पकड चुकवीत ज्यांनीं आपली बुद्धिमत्ता अव्याहत लोकजागृत्यर्थ झिजविली, त्यांतल्या महा-राष्ट्रीय अग्रगण्यांपैकीं कै. अण्णासाहेब परांजपे हे एक होत ही गोष्ट ध्यानांत ठेवली म्हणजे त्यांच्या लेखांचें महत्त्व निराळें सांगावयाला नको.

मुंबई,
ता. १०-९-४६

न. र. फाटक

# य. गो. जोशी प्रकाशन, पुणें

# वाद्-विवेचन-माला

| | | |
|---|---|---|
| १ सुलभ समाजवाद | पां. वा. गाडगीळ | १—०—० |
| २ फॅसिझम | ,, | १—०—० |
| ३ साम्राज्यशाही | ना. ग. गोरे | १—०—० |
| ४ अराज्यवाद | पां. वा. गाडगीळ | १—०—० |
| ५ लोकशाही | आचार्य जावडेकर | १—८—० |
| ६ मार्क्सचा भौतिकवाद | पां. वा. गाडगीळ | १—०—० |
| ७ विश्वकुटुंबवाद | ना. ग. गोरे | १—८—० |
| ८ ईश्वरवाद | आचार्य दांडेकर | १—८—० |
| ९ गांधीवाद | आचार्य जावडेकर | १—८—० |
| १० राष्ट्रवाद | कोल्हटकर | २—०—० |
| ११ जडवाद | तर्कतीर्थ जोशी | १—४—० |
| १२ हिंदुत्ववाद | ज. स. करंदीकर | २—८—० |
| १३ मार्क्सच्या कॅपिटलचा सारग्रंथ | पां. वा. गाडगीळ | १०—०—० |

या तेरा **पुस्तकांत** वाद्-विवेचन-माला पूर्ण होते.

या आवृत्तीची सोल एजन्सी **महाराष्ट्र-ग्रंथभांडार, गिरगांव मुंबई** यांजकडे दिली आहे. तेव्हां ग्राहकांनीं व पुस्तक-विक्रेत्यांनीं पुस्तकें भांडाराकडून परस्पर मागवावीं.



**काळांतील लेखांचे जन्मस्थान.**

**सरदार कानड्यांच्या ( कोनकरांच्या ) वाड्यांतील सोनेरी रंगमहाल**

## परमेश्वराचें अभिवचन : : : १

काळ : अग्रलेख, ता. ११।४।१९०२

★ वर्षारंभीची प्रार्थना.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥**

जेव्हां जेव्हां धर्माची ग्लानि होते आणि अधर्माचें प्राबल्य वाढतें, तेव्हां तेव्हां मी अवतार धारण करतों, असें परमेश्वरानें अभिवचन दिलेलें आहे, हें सर्वांना विश्रुतच आहे; परंतु तें अभिवचन आमच्या हल्लींच्या लोकांच्या संबंधानें खरें कधीं होणार ?

संकटांत सांपडलेल्या मनुष्याचें मन अविश्वासी होतें. ज्याचें गलबत वादळांत सांपडलें आहे अशा मनुष्याला सगळ्या पृथ्वीच्या पाठीवर पाणीच पसरलेलें आहे असें वाटतें; कोठें जमीन असेल असें त्याला वाटत नाहीं; इतका तो आपल्या सभोंवतालच्या प्रत्यासन्न संकटांनीं गांगरून गेलेला असतो. एका-पाठीमागून एक कोसळणारीं दुःखें मनुष्याचें मन उतावीळ करितात. दुःखग्रस्त मनुष्याला स्थलाचें व काळाचें अंतर दिसेनासें होतें. दूर स्थळीं व चिरकालानें ज्या गोष्टी व्हावयाच्या असतात त्या आपल्याच डोळ्यांदेखत व्हाव्या असें त्याला वाटूं लागतें व त्या तशा घडून आल्या नाहींत म्हणजे त्याचें मन अस्थिर होतें आणि निराशेनें भरून जातें. कांहीं अंशीं अशाच प्रकारची स्थिति हिंदु-स्थानांतील लोकांची झालेली आहे आणि म्हणूनच ‘ परमेश्वर आपलें अभिवचन

खरें करीलना?' अशा प्रकारचे प्रश्न कधीं कधीं त्यांच्या मनामध्यें उद्भवतात. हिंदुस्थानांतील लोकांवर इतकीं संकटें येऊन गुदरत आहेत कीं, त्यांतून हिंदुस्थानला कधीं वर डोकें काढतां येईल, अशी आशा बाळगण्याला क्वचितच जागा उरलेली आहे.

प्रत्येक वर्ष जसें येतें तसें जातें. हिंदुस्थानांतील लोकांच्या सुखामध्यें जो कांहीं भर टाकील असा एकही संवत्सर येत नाहीं. जो येतो तो हिंदुस्थानांतील लोकांकरितां दुःखाचीं ओझींच आपल्या डोकीवर घेऊन येतो. हिंदुस्थानांतील लोक पुराणप्रिय आहेत. जुन्या गोष्टींचें स्मरण चिरकाल टिकवावें, अशी त्यांची फार इच्छा असते; आणि तिला अनुसरून ते पूर्वींच्या रीतिरिवाजांचें अवलंबन करीत असतात. त्याप्रमाणें नवीन वर्षारंभाचा दिवस हा सणाचा दिवस म्हणून पाळण्याची चाल इकडे पडली आहे. सणाचा दिवस म्हणजे आनंदाचा दिवस होय. पण तसा आनंद हल्लीं ह्या नवीन वर्षारंभाच्या दिवसामध्यें काय उरला आहे? रूढीला अनुसरून लोक या पाडव्याच्या दिवशीं गुढ्या आणि तोरणें उभारतात. पण वास्तविक गुढ्या आणि तोरणें उभारण्यासारखा आनंद उत्पन्न करण्याइतकी लोकांची समाधानकारक स्थिति अलीकडे कधींही लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आलेली नाहीं. वर्षप्रतिपदेचा सण पाळणें आणि साजरा करणें म्हणजे एका दृष्टीनें आपल्या शालिवाहन राजाचें प्रतिवार्षिक स्मारक करण्यासारखेंच आहे. पण तसलें स्मारक करण्यांत काय अर्थ उरला आहे? इतःपर शालिवाहनाहून हा आपला शककर्ता नाहीं. हल्लीं आपल्यावर शालिवाहनाहून दुसऱ्यांचा शक बसलेला आहे व त्या शकापुढें शालिवाहनाचा शक हळूहळू लोपत चालला आहे. आज जर शालिवाहनाचा कोणावर शक असेल तर तो केवळ पंचांगावर आहे. पंचांगाशिवाय इतर सर्वत्र ख्रिस्ती शकाचें प्राबल्य झालेलें आहे. त्या शकाला सर्वतोपरी वाहिलेले, त्या शकाप्रमाणें बसणारे, उठणारे, निजणारे आणि खाणारे जे लोक आहेत त्यांनीं शालिवाहन शकाचें स्मारक प्रत्येक चैत्राच्या प्रतिपदेला करावें हें विसंगत आहे. आपण म्लेंच्छ धर्म स्वीकारून फिरून हिंदुस्थानांतील देवतांची उपासना करणें ह्यांत जितकी सुसंगतता आहे, तितकीच वरील गोष्टीमध्यें आहे, हें कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. ख्रिस्ती शकाच्या अमुक महिन्याच्या अमुक तारखेला पाडवा आला आहे अशा प्रकारानें जेथें शालिवाहनाच्या विजयश्रीच्या दिवसाची

गणना केली जाते, तेथें तो दिवस सणाचा म्हणून मानण्यांत तरी काय हंशील आहे ! अशा सणाच्या दिवशीं आनंद म्हणून काय तो एवढाच कीं, त्या दिवशीं दहा वाजल्यापासून पांच वाजेपर्यंत सरकारी ऑफिसांतून कावाड-कष्ट करण्याची सुट्टी मिळते. ह्याशिवाय या वर्षप्रतिपदेच्या सणाच्या दिवसांत दुसरा कांहीं आनंद उरला आहे असें मुळींच नाहीं. ते खरे आनंदाचे दिवस पूर्वींच निघून गेले ! आतां केवळ उपचार म्हणून गुढ्या आणि तोरणें उभीं करावयाचीं. वास्तविक गुढ्या आणि तोरणें हीं विजयश्रीचीं चिन्हें होत. जेव्हां एखादी विजयप्राप्ति होते तेव्हां गुढ्या आणि तोरणें उभारावयाचीं. जेव्हां आपल्याला अतिशय आनंद होईल तेव्हां गुढ्या आणि तोरणें उभारावयाचीं. जेव्हां आपण एखादें शतकृत्य करूं, दिग्विजय करूं, किंवा महत् पराक्रम करूं, तेव्हां गुढ्या आणि तोरणें उभारावयाचीं, हा गुढ्यांचा आणि तोरणांचा मूळ उद्देश होय. पण आतां असा कांहींच प्रसंग लागत नाहीं. हल्लीं आपण अतिशय पराभव पावलों असलों, अतिशय दुःखांत निमग्न झालों असलों, किंवा अतिशय नीच कृत्यें आपल्या हातून झालेलीं असलीं तरी देखील आपण गुढ्या आणि तोरणें उभारण्याला तयारच ! ध्वजारोपण हें विजयाचें सूचक, पण आम्ही राष्ट्र या दृष्टीनें गुलामगिरीमध्यें असतांनाही आम्हांला ध्वजारोपण करण्याला शरम वाटत नाहीं. अशा रीतीनें अर्थ समजल्यावांचून सद्यःस्थितीला विसंगत अशीं भलभलतीं कृत्यें आपण करीत असतों शालिवाहनाच्या वेळेपासून बरींच वर्षेंपर्यंत विजयश्री आणि विजयध्वज हीं दोन्ही आपल्यापाशीं होतीं. विजयश्री आपण मिळवीत होतों आणि विजयध्वज आपण उभारीत होतों. हल्लीं विजयश्री आपल्याला सोडून गेली आहे, आणि विजयध्वजांचीं फडकीं मात्र आपल्या-पाशीं राहिलीं आहेत. तीं एखाद्या काठीच्या टोंकाला बांधून आपण आपले विजयध्वज वाटेल तेव्हां उभे करतों, पण विजयावांचून विजयध्वजाच्या नुसत्या चिंध्यांना काय शोभा आहे ! हल्लीं विजयश्री आम्हांला सर्वतोपरी सोडून गेली आहे; परंतु तिचें बाह्य सोंग मात्र आमच्यामध्यें पूर्णपणें वास्तव्य करीत आहे. विजयश्री नाहीं, पण विजयश्रीचें नाटक आपल्याकडून प्रतिवर्षीं नियमितपणें केलें जात आहे. तान्हाजी मालुसऱ्यांनीं सिंहगडाच्या किल्ल्यावर जें निशाण लाविलें, चिमणाजी अप्पांनीं वसईच्या किल्ल्यावर जो ध्वज उभारला, किंवा राघोबादादांनीं अटकेच्या किनाऱ्यावर जो भाला रोंविला, तें खरें ध्वजा-

रोपण, तो खरा पाडवा, तें आपलें खरें तोरण आणि तो आपला खरा वर्षप्रतिपदेचा दिवस ! एखाद्या व्यक्तीचा पाडवा चैत्र शुद्ध प्रतिपदेला असो किंवा कार्तिक शुद्ध प्रतिपदेला असो. परंतु राष्ट्राचा पाडवा म्हटला म्हणजे, ज्या दिवशीं त्या राष्ट्रांतील लोकांनीं कांहीं मर्दुमकीचें काम केलें असेल तो होय. तोच राष्ट्रीय ध्वजारोपणाचा दिवस होय; आणि तोच दिवस त्या राष्ट्रांत गुढ्या आणि तोरणें उभारण्याला योग्य होय. परंतु आतां, असल्या महोत्सवाचे दिवस आपल्याला सोडून गेले आहेत. आपण असल्या प्रकारच्या विजयश्रीच्या सणांना आतां पारखे झालों आहों. पूर्वींच्या सुखाला आपण हल्लीं अंतरलों आहों.

कांहीं तरी बरी स्थिति यावी म्हणून नवीन येणाऱ्या वर्षाकडे आपण मोठ्या उत्सुकतेनें पहात बसतों. व नवीन येणाऱ्या व्हाइसरॉयांप्रमाणें नवीन येणाऱ्या वर्षाच्या स्वागतासाठीं आपण घरोघरीं आणि रस्तोरस्तीं गुढ्या-तोरणें उभारीत असतों पण नवीन येणाऱ्या व्हाइसरॉयांप्रमाणें आणि गव्हर्नरांप्रमाणें नवीन येणारीं वर्षें हल्लीं सर्व लोकांची निराशा करून टाकण्याला शिकलेलीं आहेत. मागची कारकीर्द वाईट गेली, तर ह्या कारकीर्दींत तरी आपलें कांहीं कल्याण होईल अशा आशेवर लोकांनीं असावें; परंतु प्रत्येक संवत्सर ह्या बाबतींत नवीन येणाऱ्या इंग्लिश प्रतिनिधींच्या इतक्याच निष्ठुरतेनें लोकांच्या आशा निष्फळ करून टाकीत आहे. पूर्वीपेक्षां नवीन वर्षाच्या कारकीर्दींत लोक अधिक भिकारी होत चालले आहेत; लोकांची अधिक उपासमार होत चालली आहे; लोकांमध्यें रोगाचें मान जास्त वाढत चाललें आहे; आणि पावसाचें मान कमी होऊन महर्घता दिवसेंदिवस जास्त वाढत आहे; अशा प्रकारचा अनुभव आज कित्येक वर्षें हिंदुस्थानांतील लोकांना येत आहे. पूर्वींच्या वैभवाशीं तुलना करून पाहिली तर हल्लींचे हिंदुस्थानांतील लोक फारच वाईट स्थितीमध्यें आहेत, असें कोणालाही वाटल्यावांचून राहणार नाहीं. पण पूर्वींच्या स्थितीशीं साम्य पावण्याची महत्त्वाकांक्षा जरी सोडून दिली तरी हिंदुस्थानांतील सर्व लोकांच्या पोटाला पोटभर अन्न मिळावें, एवढें तरी निदान अत्यंत आवश्यक आहे. पण दुर्दैवानें सर्वांना पोटभर अन्न मिळणेंही दुरापास्त झालें आहे, असे दिवस हल्लीं हिंदुस्थानच्या लोकांवर येऊन गुदरले आहेत. हिंदुस्थानांतील कांहीं थोड्याशा लोकांचें खाणेंपिणें चमचमीत चाललें असेल, पण बाकी बहुतेक लोकांना जवळ जवळ उपासमारच करावी लागत आहे. इतक्या लोकांच्या पुढची भाकरी ओढून

तिच्यावर कांहीं लोकांनीं आपला तळिराम गार करावा, हा अतिशय मोठा अन्याय नव्हे काय? ज्याला अन्न नसेल त्याला तें द्यावें हा न्याय होय; व तसें कोणीं न दिलें तर तोदेखील मोठा अन्याय होतो. मग ज्यांच्यापाशीं अन्न असेल त्यांच्यापासून तें घेऊन त्यांची उपासमार करणें, हा सर्वांत मोठा अन्याय नाहीं काय? अन्नदान हा जर धर्म असेल तर असलेल्या अन्नाचें हरण, ही धर्माची ग्लानि नव्हे काय? आणि हें अधर्माचें अभ्युत्थान नव्हे काय?

धर्म शब्दाचे अर्थ अनेक पंडितांनीं अनेक केलेले आहेत: व अलीकडच्या सुधारलेल्या धर्मशास्त्राच्या मताप्रमाणें अधर्म तो धर्म आणि धर्म तो अधर्म होऊं लागला आहे. त्यामुळें अज्ञ लोक जेव्हां अधर्म वाढला आहे असा आक्रोश करितात त्याच वेळेला तो धर्माचा उत्कर्ष होत आहे म्हणून सुधारलेले शास्त्री आनंद मानीत असतात. आणि जेव्हां लोक धर्माप्रमाणें आचरण करीत आहेत असें कित्येकांना वाटत असतें, त्या वेळेला तें धर्मबाह्य वर्तन होत आहे, म्हणून इतरांची हाकाटी असते. अशा मतभेदामुळें अलीकडे कित्येक बाबतींत धर्माची वृद्धि होत आहे किंवा ग्लानि होत आहे, हें ठरविण्याची फार मुष्किल पडूं लागली आहे. उदाहरणार्थ– मद्याचा, मांसाचा, किंवा व्यभिचाराचा प्रसार जास्त झाला तर ही धर्माची ग्लानि होत आहे आणि हें अधर्माचें अभ्युत्थान होत आहे, असें कोणी प्रतिपादन करूं लागल्यास तें त्याचें प्रतिपादन हल्लींच्या काळीं सर्वथैव खरेंच ठरेल आणि सर्व लोकांना संमत होईल, अशीं कोणीही मनुष्य खात्री देऊं शकत नाहीं. कारण, ह्याच गोष्टीमध्यें धर्माची वृद्धि आणि धर्माचें अभ्युत्थान आहे असेंही सप्रमाण सिद्ध होण्याचा हल्लीं संभव आहे. ही नैतिक धर्मकल्पनांची गोष्ट झाली; व अशीच धार्मिक धर्मकल्पनांचीही स्थिति हल्लीं झालेली आहे. येशु ख्रिस्तवाल्यांच्या मताप्रमाणें, हिंदुस्थानांत ख्रिस्ती धर्माव्यतिरिक्त धर्मांतील अजून अनेक लोक आहेत व ते ख्रिस्ती होत नाहींत ही धर्माची मोठी ग्लानि होत आहे, व हें अधर्माचें मोठें अभ्युत्थान होत आहे. येशु ख्रिस्तवाल्यांचें असें मत आहे, कीं हिंदुस्थानांत जेव्हां सगळे लोक ख्रिस्ती होतील तेव्हांच येथें धर्माची ग्लानि आणि अधर्माचें अभ्युत्थान बंद होईल. तोंपर्यंत त्यांच्या मतानें, हा निवळ नरकलोकचा मुलूख आहे, आणि येथें सैतानाचा अम्मल चालू आहे. परंतु इतर धर्मांतील लोकांच्या कल्पना ह्याच्या अगदीं उलट आहेत. सत्य मार्गानें चालणें, सत्य बोलणें, सत्य असेल तेंच

करणें, परोपकार करणें, दुसऱ्याच्या वस्तूचा अपहार न करणें, दुसऱ्याची विनाकारण हिंसा न करणें वगैरे गोष्टींमध्येंच खरा धर्म आहे, असें त्यांना वाटत आहे. आणि परमेश्वरा, अशाही लोकांना तूं अजून जिवंत ठेविलें आहेस. अशीं उभयप्रकारची परस्परविरुद्ध धर्ममतें प्रचलित असल्यामुळें धर्माची वृद्धि कोठें होत आहे आणि धर्माची ग्लानि कोठें होत आहे, हें ठरविण्यालासुद्धां पामर जनांना फार पंचाईत पडते. हे भगवंता, ख्रिस्ती शतकांच्या पूर्वीं कांहीं वर्षांमागें पानिपतच्या कुरणावर तूं अर्जुनाला गीता सांगितलीस त्या वेळीं धर्म ह्या शब्दाचा तुझा अर्थ काय असेल, तो तुलाच ठाऊक. परंतु हल्लीं धर्म शब्दाचा अर्थ तुझ्या वेळेपेक्षां पुष्कळच अधिक सुधारलेला आहे. त्यामुळें मद्याचा प्रसार फार झाला, किंवा वेदप्रणीत उत्कृष्ट आचारांचा अत्यंत लोप झाला, किंवा लोकांनीं परस्पर व्यवहारामध्यें सत्यतेचा मार्ग पार सोडला, किंवा ख्रिस्ती धर्माच्या प्राबल्यानें इतर धर्मांतील लोकांना तोंड दाबून बुक्क्यांचा मार अनावर बसूं लागला, म्हणजे ही धर्माची ग्लानि झाली असें वाटून तुझें अंतःकरण द्रवेल अशी आज कोणालाही खात्री नाहीं. म्हणून असल्या प्रकारचे अधर्म होत आहेत, अशी फिर्याद तुझ्यापुढें आणण्यांत मनाला थोडीशी भीति वाटणें साहजिक आहे.

परंतु वर निर्दिष्ट केलेल्या नैतिक आणि धार्मिक बाबतींमध्यें धर्म शब्दाच्या अर्थासंबंधानें कोणामध्यें कितीही मतभेद असला तरी सर्वांच्या मतांनीं उपासमार करणें हा अन्याय म्हणूनच मानिला गेलेला आहे. ही धर्माची ग्लानि नव्हे किंवा हें अधर्माचें अभ्युत्थान नव्हे, असें कोणाच्यानेंही म्हणवणार नाही. म्हणून या निर्विवाद गोष्टीसंबंधानें तरी, हे परमेश्वरा, तुला ह्या असंख्य उपाशी मरणाऱ्या हिंदुस्थानांतील गरीब लोकांची करुणा येऊं दे. ही धर्माची ग्लानि नव्हे काय ? आणि हें अधर्माचें अभ्युत्थान नव्हे काय ? पूर्वीं जेव्हां जेव्हां मनुष्यमात्रांच्या हिताकरितां तूं अवतार धारण केलेस तेव्हां ह्याच्यापेक्षां जास्त अधर्म होत होते काय ? आतांच्यापेक्षां जास्त धर्मग्लानि होणें शक्य आहे काय ? आणि तशी झाली तर ती मनुष्यांना सह्य आहे काय ? परमेश्वरा, अजून ह्या हतभाग्य प्राण्यांची तुला करुणा येत नाहीं काय ? लोकांना अतिशय ताप होतो तेव्हां मेघ त्यांच्याकडे आर्द्रतेनें पाहतो, हें कृत्य त्या जडात्मक मेघाला शोभो. परंतु सर्वांचीं अंतःकरणें आकलन करणाऱ्या हे

परमेश्वरा, तुला हें योग्य नाहीं. प्रजा सर्वतोपरी जेरीस आलेली आहे. तिला संकटानें चोहोंकडून व्यापून टाकलेलें आहे मनुष्यांच्या दुःखाची परमावधि झालेली आहे. मनुष्यांच्या प्रयत्नांनीं हात टेकिले आहेत. मनुष्यें इतकीं संकटें भोगीत असून त्यांतून त्यांची सुटका करण्याकरितां परमेश्वर धांव घेत नाहीं. तेव्हां ह्या जगांतील न्याय आणि अन्याय यांच्यावर देखरेख ठेवणारा कोणी परमेश्वर आहे किंवा नाहीं, अशीही शंका कित्येकांच्या मनामध्यें उद्भवूं लागली आहे. तेव्हां परमेश्वरा, ह्याच्यापुढें वाट पाहण्याची अवधि राहिलेली नाहीं.

साधूंचें संरक्षण करण्याकरितां, दुष्ट कृत्यें करणारांचा विनाश करण्याकरितां, आणि धर्मस्थापना करण्याकरितां जेव्हां जेव्हां प्रसंग पडेल तेव्हां तेव्हां धांवत येण्याविषयीं तूं अभिवचन दिलेलें आहेस. आणि तुझें अभिवचन म्हणजे मनुष्यांना फसविण्यासाठीं दिलेलें आहे असें कोणाला कधी म्हणतां यावयाचें नाहीं. तूं दिलेल्या अभिवचनामध्यें तूं एकही संदिग्ध शब्द घातलेला नाहींस. त्यांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ स्पष्ट आहे. सगळ्या अर्वाचीन जगांतील अतिशय लुच्चा मुत्सद्दी आणून जरी तुझ्या अभिवचनाचा अर्थ बदलण्यासाठीं बसविला, तरीही त्याच्यानें तुझ्या अभिवचनाचा दुसरा अर्थ करवणार नाहीं. तूं खोटें अभिवचन कशाला देशील ? कारण, गरीब आणि तुझ्यावर विश्वास ठेवून बसणाऱ्या मनुष्यांना फसवून तुला काय मिळवायचें आहे ? गरीब बिचाऱ्या लोकांपाशी असें काय आहे कीं, जें तुझ्यापाशीं नसून त्यांना खोटीं खोटीं अभिवचनें देऊन त्यांच्यापासून तुझ्या मनांतून भोंदून घ्यावयाचें आहे ? मी धर्मस्थापना करण्यासाठी युगायुगाचे ठिकाणीं संभवत असतों, अशा प्रकारचें सगळ्या जगापुढें तूं विधान केलेंस, त्या वेळेस तें करण्याविषयीं तुझ्या दंडावर कोणी गोणी दिली होती ! जें अभिवचन तुला परिपूर्ण करावयाचें नाहीं तें तूं दिलेंसच नसतेंस तर तुझ्यावर गरीब बिचाऱ्या लोकांचा काय जोरा चालला असता ? त्यांनीं तुझें काय केलें असतें ? पण एकदां वचन दिल्यानंतर तूं बांधला गेलास. आतां तुला तुझ्या वचनापासून सुटका नाहीं. तूं आपल्याला कोणी यःकश्चित् राजा किंवा प्रजा समजूं नकोस, कीं ज्या तुला, हव्या तशा शिताफीनें आपलें वचन मोडतां येईल. तूं प्रजेचा राजा आहेस आणि राजांचाहि राजा आहेस. कोणी प्रजा तुला कारभार देवोत किंवा न देवोत; आणि कोणा राजांना तुझ्या स्वर्गांतील

साम्राज्याचें स्मरण असो किंवा नसो, तरी पण तुझ्या सत्तेखालीं यच्चयावत् राजापासून रंकापर्यंत सर्वांचें आकलन झालेलें आहे. प्रजा वचनभंग करील आणि राजा आपलें वचन मोडील; परंतु तुला आपलें अभिवचन खरेंच केलें पाहिजे. तूंच जर आपलें अभिवचन मोडूं लागशील तर वचनभग करणाऱ्या राजांनीं कोणाला भ्यावें ? तूं वचनभंग करणारा नाहींस, तर वचनभंग करणारांना शासन करणारा आहेस. तूं दिलेलें अभिवचन तुला खरें केलेंच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतर नाहीं आणि तें तूं करशील ह्यांत शंका नाहीं.

पण हे सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् परमेश्वरा, तें तूं केव्हां करणार, तुझी कृपादृष्टि आमच्याकडे केव्हां वळणार, तूं आमच्या ह्या हतभाग्य देशाला हातांत केव्हां धरणार, आणि तूं ह्या देशांतील असन्मार्गप्रवृत्त लोकांना सन्मार्गावर कधीं आणणार,हें जाणण्याविषयीं लोकांचीं मनें— दुःखानें गांजलेल्या लोकांचीं मनें— उतावीळ होणें साहजिक नाहीं काय ? तुझ्या आज्ञेप्रमाणें संचार करणारे नवग्रह गतवर्षीं ह्या देशाला अनुकूल नसतील तर ते ह्या वर्षीं तरी अनुकूल होऊन तुझी कृपादृष्टि ह्या देशाकडे वळल्याबद्दल लोकांना सुचवितील असें सगळ्यांना नेहमीं वाटत असतें. परंतु जेव्हां पहावें तेव्हां अशुभ ग्रह हिंदुस्थानची निराशा करण्याला आणि हिंदुस्थानवर जास्त जास्त संकटपरंपरा ओढून आणण्यालाच दक्ष असलेले दिसून येतात. ह्या क्रूर ग्रहांवर, परमेश्वरा, तुझा कांहींच अम्मल नाहीं काय ? वास्तविक हे नऊ ग्रह तुझ्या ताब्यामध्यें असावेत. पण सध्यां तूं ह्या नवग्रहांच्या स्वाधीन झालेला आहेस असें दिसतें. परमेश्वरा, जर तू मनांत आणशील तर ह्या नवग्रहांची स्थिति आम्हांला अनुकूल करून देण्याला तुला फारसें अवघड जाणार आहे, असें नाहीं. मंगळाला, शनीला आणि हर्षलला त्यांच्या अनिष्ट स्थानांतून उचलून शुभ स्थानीं ठेवण्याचें तूं मनांत आणिलेंस तर तुला तें अशक्य आहे काय ? पण तूं हें केव्हां करणार ? आतां वाढला आहे ह्याच्यापेक्षां अधिक अधर्म वाढला पाहिजे अशी तुझी इच्छा आहे ? अशी निर्दय इच्छा कोणाची तरी असावी काय ? मनुष्याच्या ठिकाणींदेखील इतकी निर्दय इच्छा असलेली मनुष्याला खपत नाहीं असली इच्छा, परमेश्वरा, तूं मनांत बाळगिलीस तर हें फार अघटितच आहे असें म्हटलें पाहिजे. आमचे आतांपर्यंत झालेले हाल पाहून तुझें समाधान होत नाहीं, तर आमचे आणखी

हाल झाले पाहिजेत, तेव्हां तुला द्रव येणार, हें वर्तन आमच्या वैऱ्यालादेखील शोभणार नाहीं, तर हे परमेश्वरा, तें तुला कसें शोभेल!

आमचे आणखी काय हाल व्हावे असें तुझ्या मनांतून आहे. आम्हीं काय दुःखें सोशिलीं नाहींत, कीं जीं तुला द्रव येण्यासाठीं आतां सोशिलीं पाहिजेत? आम्ही नवकोटनारायण होतों ते आम्ही भिक्षेकरी झालों. आम्ही राजवाड्यांत रहात होतों, त्या आम्हांला झोंपड्याही मिळेनाशा झाल्या. आम्ही समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य संपादून शत्रूंच्या छातीवर नाचत होतों, त्या आम्हांला दुसऱ्यांच्या लाथा खातां खातां पुरेसें झालें आहे. आम्ही हजारों सहस्रभोजनें घालीत होतों, आणि लक्षावधि ब्राह्मणांना अग्रहार देत होतों, त्या आम्हांला मध्यान्हकाळ आला म्हणजे हातांत चौपदरी घेण्याची वेळ आली आहे. आम्ही पराक्रमानें दुसऱ्यांच्या माना खालीं वांकवीत होतों, ते आम्ही यत्किंचित् लाभासाठीं दुसऱ्याची खुशामत करूं लागलों आहों. आमच्या घरांतून सोन्याचा धूर निघत होता, आणि आमच्या घरांत मोत्यें आणि माणकें हीं आधोलीनें मोजलीं जात होतीं, त्या आम्हांला एक ताब्याचा पैसादेखील नजरेस पडेनासा झाला आहे. ह्यापेक्षां आणखी दुःखें तीं काय भोगावयाचीं आहेत? आमच्या सर्व आशा निष्फळ होत आहेत. आमच्या इच्छा नीच गोष्टींवरच आसक्ति ठेवीत आहेत. आमचीं क्षेत्रें दूषित होत आहेत आमचें वीर्य पतित होत आहे. आमची संतति अल्पायुषी होत आहे. आम्हांला बाळपणींच वार्धक्य येत आहे. आणि वृद्धापकाळाचे दिवस येण्याचे पूर्वींच मृत्यु येत आहे. आम्हीं भाऊ भाऊ एकमेकांच्या उरावर बसत आहों आणि आपलीं गृहछिद्रें दुसऱ्यांना दाखवून देत आहों. मांगाचें कर्म करण्याची आम्ही महत्त्वाकांक्षा बाळगीत आहों. आणि ब्राह्मणाचें कर्म करण्याबद्दल आम्हांला शरम वाटत आहे. आम्हांला स्वदेश म्हणून कांहीं उरला नाहीं; व स्वदेशावर प्रीति करणें हा आम्ही गुन्हा समजतों. खरें बोलण्याची आम्हांला भीति वाटते. आणि सन्मार्गानें पाऊल टाकावयाचें म्हटलें म्हणजे आमच्या अंगावर शहारे येतात. आमची जीभ खुशामतीसाठीं आणि आमचे हात लाचाचे पैसे देण्यासाठीं! इतक्या पतित स्थितीला आम्ही जाऊन पोंचलों! आणखी याहून जास्त दुःख तें आम्हीं काय सोसावयाचें राहिलें आहे! परमेश्वरा, ही आमच्या दुःखाची परमावधि झाली नाहीं काय? ह्यापेक्षां आणखी जास्त दुःख आम्हीं काय

सोसावें ? ज्यांना तूं संकटांतून उद्धरिलेंस त्यांनीं ह्याच्यापेक्षां काय अधिक दुःखें भोगिलीं होतीं ! मरणापेक्षां दुसरें अधिक दुःख तें काय आहे ? आणि अपमानाचें मरण जर देवा, काय असतें हें तुला माहीत असेल, तर त्या मरणानें आम्ही कितीतरी वेळां मेलेले आहों. प्राणवियोगरूपी मरण आल्यावर मग तूं कृपा केलीस, तर तिचा काय उपयोग आहे ? ती कोण जाणणार आणि तिचें चीज कोण करणार ? मग तुझ्या गुणानुवादाचें वर्णन कोण करणार ? मग तुझ्या भक्तवात्सल्याचें स्तोत्र कोण म्हणणार ? आणि तुझ्या अद्भुत चारित्रांचें गायन कोण गाणार ? तेव्हां, हे परमेश्वरा, तूं ह्या दीन झालेल्या देशाचा आतां फार वेळ अंत पाहूं नको. तुझ्या कृपादृष्टीची सर्व लोक वाट पहात आहेत. त्यांना तूं निराश करूं नको. सगळ्या जगानें आनंदामध्यें नांदावें आणि आम्हीं, ह्या देशांतीलच लोकांनीं, दुःखांत दिवस काढावेत, असा पक्षपात तुझ्या ठिकाणीं कां असावा ? तुझें जग हें सगळ्यांकरितां सारखें आहे. त्याजवर एकाचा हक्क जास्त आहे आणि दुसऱ्याचा कमी आहे असें कदापिही नाहीं. मग ह्या हिंदुस्थानांतीलच लोकांना तूं दुःखामध्यें कां ठेवितोस ? त्यांना तूं ह्या दुःख-समुद्रांतून लौकर पैल तडीला नेऊन लाव, तूं येऊन आपलें अभिवचन खरें कर आणि सर्व जगाला आनंदामध्यें आणि सुखासमाधानामध्यें निमग्न करून सोड, ही च तुझ्यापाशीं प्रार्थना आहे.

---

## धर्मकल्पनांचा परिणाम : : : २

काळ : अग्रलेख, ता. २५-४-१९०२

★ महासभेच्या पुरस्कर्त्यांना आधार!

विचाराचा आचारावर पुष्कळ परिणाम होतो, ही गोष्ट सर्वसम्मत आहे. विचार कोणतीही गोष्ट स्वतः करीत नाहीं, पण दुसऱ्याकडून करवितो. विचार हा आचाराचा जनक आहे; आणि आचार हा विचाराचा पुत्र होय. विचार असेल तर आचार होईल किंवा न होईल; पण विचारच नसेल तर आचार उत्पन्न होऊं शकणार नाहीं, हें खास. कारण असेल तर कार्य उत्पन्न होईल किंवा न होईल; परंतु कारणच नसेल तर कार्य कोठून उत्पन्न होणार? अशा प्रकारचा संबंध विचार आणि आचार यांच्यामध्यें आहे. मनुष्याची या जगांतील जीवयात्रा सुखावह होण्याकरितां त्याला चांगल्या आचारांची अत्यंत आवश्यकता असते. परंतु चांगले आचार चांगल्या विचारांवांचून कसे उत्पन्न होणार? ह्याकरितां मनुष्याला चांगल्या विचारांची आकांक्षा उत्पन्न झाली. पण हे चांगले विचार तरी वाटेवर पडले आहेत असें नाहीं. प्रत्येक मनुष्याला सुख पाहिजे असतें. परंतु तें सुख उत्पन्न करण्याला मूळ कारण जे चांगले विचार ते प्रत्येक मनुष्याच्या डोक्यामध्यें असतातच असें नाहीं. यासाठीं मनुष्याला दुसऱ्याच्या चांगल्या विचारांकडे वळणें भाग पडलें व त्याला स्वतःच्या धर्मामध्यें असलेल्या चांगल्या विचारांचा खजिना एकत्र सांपडला. धर्म या शब्दाचे कोणी कांहीं अर्थ करोत; परंतु सामान्य दृष्टच्या पाहतां धर्म म्हणजे चांगल्या विचारांचा समुच्चय.

आतां ह्या विचारांपैकीं कांहीं विचार पारलौकिक असतात आणि कांहीं ऐहिक असतात. पण ते कसलेही असले तरी ते इतके उत्कृष्ट असतात कीं, तसे विचार एकाच काळीं एकाच व्यक्तीच्या डोक्यामध्यें येणें कधींही संभवनीय नसतें. आणि म्हणूनच असले उत्तम विचार ज्यांमध्यें संकलित केलेले असतात ते धर्म ईश्वरप्रणीत आहेत असें स्वाभाविकपणेंच लोक मानूं लागले. पण कित्येक लोक असे दुराग्रही असतात कीं, त्यांना धर्म हे ईश्वर-प्रणीत आहेत ही कल्पना कधीही पसंत होत नाहीं. त्या धर्मांचें कर्तृत्व ईश्वरा-पासून हिसकावून घेऊन अल्पज्ञ मनुष्यांच्या माथीं मारण्याला ते सदैव उत्सुक असतात. त्यांना ईश्वरानें वेद केलेले खपत नाहींत; त्यांना सीनाय पर्वतावरून देवानें आपल्या आज्ञा सांगितलेल्या सहन होत नाहींत; किंवा देवदूतानें महंमदा-च्या कानामध्यें देवाची इच्छा काय आहे ती येऊन सांगितली हें मत पसंत पडत नाहीं. वेद हे विश्वामित्र, वसिष्ठ या माणसांचे, बायबल हें जीजस ख्राइस्ट या माणसाचें, आणि कुराण हें महंमद या माणसाचें, असें मानण्यांतच त्यांना फायदा आहे असें वाटतें. ह्या वर्गांतील लोक आपापल्या धर्मांतील आज्ञा पाळण्यांत कांहीं कसूर करतात असें नाहीं. परंतु ह्या देवाच्या म्हणून पाळण्यांत त्यांना शरम वाटते आणि मनुष्याच्या म्हणून पाळण्यांत भूषण वाटतें शहाण्या-चे चाकर व्हावें, पण वेड्याचे धनी होऊं नये, अशी एक लौकिक म्हण आहे. पण ह्या मताच्या लोकांना सर्वज्ञ परमेश्वराचें आज्ञाकरत्व पत्करण्यापेक्षां अल्पज्ञ मनुष्याचें— स्वामित्व नव्हे तर— आज्ञाकरत्वच पत्करण्यामध्यें मोठा आनंद वाटतो. पण हे धर्मप्रचारक जरी मनुष्यच होते असें मानिलें, तरी ते फार अलौकिक मनुष्य होते याबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं. ते प्रत्यक्ष ईश्वर नसले तरी ते ईश्वरासारखेच होते, ते ईश्वराचे अंश होते किंवा ते ईश्वराच्या कृपेला पूर्णपणें पात्र झालेले होते, ह्याबद्दल कोणामध्येंही फारसा मतभेद नाहीं. कारण, धर्मप्रचाराचें काम हें लहानसहान नव्हे, तें पाहिजे त्या क्षुद्र मनुष्याच्या हातून होण्यासारखें नाहीं. तसें असतें तर प्रार्थनासमाजाचा देखील एव्हांना एक धर्म बनून गेला असता. पण हचा गोष्टी भलत्यांच्याच हातून होणें शक्य नाहीं. असो. अशा रीतीनें प्रत्यक्ष परमेश्वराच्या हातून किंवा त्याच्या कृपाकटाक्षानें जे धर्म अस्तित्वांत आलेले आहेत त्यांपैकीं हिंदुधर्म बौद्धधर्म, ख्रिस्तीधर्म व महंमदीधर्म हे प्रमुख होत.

हे धर्म म्हणजे चांगल्या विचारांचे निरनिराळे खजिने होत, हें वर सांगितलेंच आहे. जे विचार चांगले ते सदोदित चांगलेच. तरी पण प्रसंग-विशेषाच्या अनुरोधानें कित्येक धर्मांमध्यें चांगल्या विचारांनाच प्राधान्य दिलेलें असतें व त्याचा परिणाम त्या धर्माच्या अनुयायांवर केव्हांना केव्हां तरी झाल्यावांचून राहत नाहीं. धर्म हे ईश्वरप्रणीत असोत किंवा मनुष्यकर्तृक असोत, त्यांच्यामध्यें जे विचार एकत्र केलेले असतात त्यांचा त्या त्या धर्मांतील लोकांवर बरावाईट परिणाम केव्हां तरी होतोच. या म्हणण्याच्या स्पष्टीकरणा-साठीं बौद्धधर्माचें उदाहरण फार चांगलें आहे. हिंदुधर्मामध्यें एके वेळीं यज्ञ-यागादिकांचें फार प्राबल्य झालेलें होतें; व तन्निमित्त अर्थात् यागीयपशुहिंसाही फार होऊं लागली होती. ही धर्माची दोरी एकाच दिशेला अतिशय ओढली जाऊं लागल्यामुळें ती दुसऱ्या दिशेकडे ओढली जाण्याबद्दल इच्छा उत्पन्न होऊं लागल्या आणि प्रयत्न अस्तित्वांत येण्याला सुरवात झाली. त्या इच्छा आणि ते प्रयत्न ह्यांनाच कालगतीनें बौद्धधर्म हें स्वरूप आलें. पूर्वीं ( यज्ञांतील पशूंची ) हिंसा हाच परम धर्म होय, अशी समजूत होती. ह्याच्या उलट गौतमबुद्धानें 'अहिंसा परमो धर्मः' हें मत प्रचारांत आणिलें; व तेव्हांपासून बौद्धधर्मानुयायी लोकांच्या मनावर ह्या अहिंसामताचा पगडा फारच जबरदस्त रीतीनें बसू लागला. अहिंसा हा एक चांगला विचार; व बौद्धधर्माच्या खजिन्यामध्यें ह्या अहिंसामतरूपी हिऱ्यामाणकांचीच विशेष भरती. पण ह्या विचाराचा परिणाम तद्धर्मानुयायी लोकांच्या आचारावर फारच विलक्षण झाला. धर्म हा इहलोकींच्या आणि परलोकींच्या अशा दोन्ही ठिकाणच्या सुखाकरितां आहे. त्यापासून येथेंही सुख झालें पाहिजे आणि परलोकींही सुख मिळालें पाहिजे. अशीच धर्माची योजना असावी आणि असतेही. पण बौद्धधर्मांत अहिंसेवर विशेष कटाक्ष असल्यामुळें या धर्माच्या अनुयायी लोकांच्या ऐहिक सुखामध्यें कधीं कधीं व्यत्यय येण्यासारखा असतो. अहिंसेचें मत एका दृष्टीनें फारच उत्कृष्ट. परंतु आपल्या सभोंवतालचें सर्व जग अहिंसेमध्यें पूर्णपणें निमग्न झालें असतां आपण अहिंसेच्या मताला चिकटून राहण्यांत फारसा अर्थ आहे, असें नाहीं. दुसऱ्या लोकांनीं आपली हिंसा करून आपला प्राण घेतला तर मग आपण त्या अहिंसेच्या उत्कृष्ट मतापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचा अनुभव केव्हां घेणार ?

परंतु या विचारांना गौणत्व देऊन बौद्ध लोकांनीं अहिंसेवरच विशेष भिस्त ठेविली व ह्याचा परिणाम त्यांच्या आचारावर घडून आला. 'ईस्ट अँड वेस्ट'च्या चालू महिन्याच्या अंकामध्यें एका इंग्रजी ग्रंथकाराचा एक उतारा दिलेला आहे. त्यामध्यें ह्या अहिंसामताचा बौद्ध लोकांच्या युद्धावर कसा परिणाम होतो ह्याचें मोठें मार्मिक वर्णन दिलेलें आहे. ब्रह्मदेशांतील लोक हे बौद्धधर्मी आहेत, हें सर्वांना माहीत आहेच. त्यांच्या आणि इंग्लिशांच्या अलीकडे ज्या कांहीं लढाया झाल्या, त्यांमध्यें बौद्ध लोकांची मनोवृत्ति कशी होती ह्याच्याबद्दलचें चित्र सदर उताऱ्यामध्यें काढलेलें आहे. प्रसंग पडला म्हणून बौद्ध लोक लढत होते. वास्तविक तसें करण्याविषयीं त्यांना त्यांच्या धर्माची अनुज्ञा नव्हती. पण ह्या दोन स्थितींमध्यें किती तरी अंतर आहे! ईश्वराच्या आज्ञेला अनुसरून लढणें आणि मनुष्याच्या आवश्यकतेसाठीं लढणें ह्यांमध्यें फारच तफावत आहे. पण बौद्ध लोकांचा धर्म त्यांना लढा असें सांगत नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट लढूं नका, असें सांगत असतो. हिंसा करणें हें महत् पातक आहे, आणि लढाई म्हणजे हिंसेशिवाय दुसरें कांहींच नाहीं, अशी बौद्ध मताची स्थिति असल्यामुळें बुद्धिस्ट लोकांना लढाईच्या वेळीं जोर कोठून येणार? त्यांना भयंकर रणकंदन करण्याला उत्तेजन कसें मिळणार? आणि घनघोर संग्राम करण्याची स्फूर्ति त्यांच्या मनामध्यें कशी प्रादुर्भूत होणार? बौद्ध शिपाई लढाईला निघाला म्हणजे आपण एक भयंकर पातक करण्याला निघत आहों, अशी त्याची भावना होते. आणि अशा भावनेच्या योद्ध्याकडून सफळ युद्ध तें काय होणार? तो शत्रूच्या सैन्यावर छापा घालण्यासाठीं रात्रीचा कोठें दडून बसला असतां त्याला आकाशांत जीं नक्षत्रें दिसतील तीं आपलें अघोर कर्म पहात आहेत,त्यांच्या समक्ष मी हें हिंसेचें काम कसें करूं, असा विचार मनामध्यें येऊन त्याचे हातपाय लटलट कापूं लागले पाहिजेत. अशी त्याची स्थिति झाली म्हणजे तो आयताच शत्रूच्या हातीं सांपडणार. तो कोठेंही पाहो, त्याला उत्तेजन म्हणून कोठेंच मिळावयाचें नाहीं. सूर्य, चंद्र, आकाश, वायु हीं सर्व 'तूं महापातक करीत आहेस' असेंच त्याला सांगणार. अशा रीतीनें बौद्ध लोकांचा धर्मच त्यांचा पराजय करतो; त्यांचें अहिंसेचें शास्त्रच त्यांचीं शस्त्रें बोथट करतें; आणि त्यांचा स्वधर्माभिमानच त्यांचे हातपाय बांधून त्यांना शत्रूच्या हवालीं करतो. असल्या धर्मामध्यें कांहीं चांगल्या गोष्टी असतील, पण सध्यांच्या काळांत

असला धर्म श्रेयस्कर नाहीं. असला धर्म काय कामाचा? ज्याच्यापासून लोकांना इहलोकीं शत्रूपासून पराभव प्राप्त झाला पाहिजे, तो धर्म काय कामाचा? धर्मातील विचार असे असले पाहिजेत कीं, त्या विचारांच्या जोरावर त्या धर्मातील लोक सर्वांमध्यें अग्रणी झाले पाहिजेत. आपला अभ्युदय करणारा म्हणून आपण ज्याला चिकटावें, परंतु जो आपले हातपाय बांधून आपल्याला शत्रूच्या स्वाधीन करतो, तो धर्म नव्हे; तर आपला एक विश्वासघात करणारा हितशत्रूच होय. मनुष्याला गुलाम बनविणें हें धर्माचें कर्तव्य नव्हे. धर्म ही संस्था गुलामगिरीसाठीं नाहीं. मोक्ष हें धर्माचें अंतिम फल होय. आणि मोक्ष म्हणजे स्वतंत्रताच. मायेच्या बंधनांपासून मनुष्याची सुटका करणें, हें धर्माचें इष्ट कार्य होय. पण ज्याच्यामध्यें यःकश्चित् गुलामगिरीच्या बंधनांपासून मनुष्याची सुटका करण्याचें सामर्थ्य नाहीं, तो धर्म त्याची मायेच्या बंधनापासून सुटका काय करणार? जो इहलोकीं आपल्या अनुयायाला शत्रूच्या बंधनांमध्यें सांपडून देण्याची तयारी करून देतो, तो धर्म परलोकीं त्याच्या आत्म्याला निर्वाणपद काय देणार! इहलोकाचीं सुखें पारलौकिक दृष्ट्या थोडींशीं गौण खरीं; परंतु म्हणून धर्मानें ऐहिक सुखांकडे अगदींच दुर्लक्ष करावें, असें नाहीं. आध्यात्मिक उन्नतीप्रमाणें आपल्या अनुयायांची आधिभौतिक उन्नतिही त्यांच्या धर्मानें घडवून आणिली पाहिजे. विजयश्रीच्या मंगल मालिकेशिवाय धर्माचाही कंठ ओका दिसतो. आणि शत्रूच्या मस्तकावर उभें राहिल्याशिवाय धर्म (त्यांतील कित्येक मतें कितीही उच्च असलीं तरी) ठेंगणाच दिसतो. ह्याकरितां ज्यांच्या योगानें ऐहिक श्रेष्ठत्वसुद्धां प्राप्त होईल अशींच मतें प्रत्येक धर्मामध्यें प्रतिपादन केलेलीं असावींत व तीं बहुतेक धर्मांमधून तशीं असतातच.

ह्या बाबतींत हिंदुधर्माकडे आपण पाहिलें तर, त्याची योजना वरील धोरणावरच केलेली आहे, असें दिसून येतें. बौद्धधर्माप्रमाणें हिंदुधर्मामध्यें अहिंसेचा पगडा लोकांच्या मनावर फाजील बसलेला नाहीं. योग्य प्रसंग येईल तेव्हां युद्ध करण्याविषयीं हिंदुधर्माची अनुज्ञाच आहे इतकेंच नव्हे, तर उलट उत्तेजनही आहे. बौद्धधर्मांतल्याप्रमाणें ह्या धर्मामध्यें शत्रूवर चालून जाणाऱ्या योद्ध्याचे हातपाय मोडलेले नाहींत. पण ह्यावरून हिंदूंच्या धर्मशास्त्रामध्यें प्रत्येक युद्धाला उत्तेजनच दिलेलें आहे असें मात्र नाहीं. अन्यायमूलक युद्धाची निंदाच केलेली आहे. असल्या युद्धाला हिंदुधर्मामध्यें

कांहीं झालें तरी आम्ही येथेंच राहणार. तुम्ही मात्र लढाई करून शत्रूला जिंका.' केवढी ही स्वार्थनिरपेक्षता ! आणि केवढी ही स्वातंत्र्याची अभिरुचि ! हे शूर जखमी टायरोलीज शिपाई मरून गेले असतील, परंतु त्यांचे हे शब्द पुढील किती तरी पिढ्यांना निरपेक्षता शिकवितील ! टायरोलमधील स्त्रिया रखवालदार बनल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे, परंतु त्याशिवायही त्या अनेक कामें करीत होत्या. टायरोलीज शिपाई पुढें लढत होते आणि त्यांच्या रांगांच्या पाठीमागून टायरोलमधील बायका त्यांना दारूगोळा, अन्न व पाणी यांचा एकसारखा पुरवठा करीत होत्या. अशा रीतीनें टायरोलमधील पुरुष आणि स्त्रिया, धट्टेकट्टे आणि जखमी झालेले, मोठी माणसें आणि लहान मुलें सर्व एकभावानें व एकजुटीनें टायरोलच्या स्वतंत्रतेसाठीं जिवापाड मेहनत करीत होते. त्यामुळें शत्रूचें सामर्थ्य जरी अमर्याद होतें तरीही टायरोलीज लोकांना अखेरीस यश आलें.

लढाईला सुरुवात केल्यापासून आठ दिवसांमध्यें टायरोल स्वतंत्र झालें. टायरोलचे जे किल्ले शत्रूच्या हातांत होते; ते सर्व टायरोलीज लोकांच्या स्वाधीन झाले शत्रूचें एकंदर दहा हजार सैन्य उध्वस्त होऊन गेलें. जेथें बव्हेरियाची अफाट सत्ता पसरली होती तेथें त्याचें नांवसुद्धां राहिलें नाहीं. आणि ह्या सगळ्या घडामोडी केवळ आठ दिवसांच्या अवकाशांत टायरोलच्या लोकांनीं घडवून आणल्या. परंतु टायरोलीज लोकांचीं संकटें येथेंच संपलीं नाहींत. टायरोल आपल्या दाढेंतून निसटत आहे, ही बातमी नेपोलियनला कळल्याबरोबर त्याला फार क्रोध आला, व या बंडाचा सगळा दोष तो ऑस्ट्रियाला देऊं लागला; व ऑस्ट्रियन लोकांनीं टायरोलमध्यें हें बड उत्पन्न केलें, असें तो स्पष्टपणें म्हणूं लागला. आणि जे ऑस्ट्रियन सेनापति टायरोलच्या मदतीला आले होते त्यांना एकदम पकडून आणावें, चोवीस तासांच्या आंतमध्यें त्यांना गोळ्या घालून मारून टाकावें, असा त्यानें हुकूम सोडला. नेपोलियनची ही नेहमींची खुबीच असे कीं, त्याच्या विरुद्ध एखादी गोष्ट घडली म्हणजे ती करणारांना तो कांहीं तरी नांवें ठेवीत असे. व त्यांनीं मोठे भयंकर अन्याय केलेले आहेत व त्यांना कडक शासन केलें पाहिजे असा त्यांच्याबद्दल तो चोहोंकडे बभ्रा करून सोडीत असे त्यामुळें भोळसर लोकांचें लक्ष नेपोलियननें केलेल्या अन्यायांवरून दुसऱ्यांच्या अन्यायां-कडे वळत असे. नेपोलियननें आपलें सैन्य टायरोलमध्यें जमा केलें. मार्शल लेफेबव्हर हा आपलें अफाट सैन्य घेऊन टायरोलमध्यें आला. व सालसबर्ग,

फ्यूअर सिंगर, वूर्गल वगैरे ठिकाणीं उभय पक्षांच्या चकमकी होऊन अखेरीस फ्रेंच आणि बव्हेरियन सैन्यांनीं इन्स्ब्रुक शहर तारीख १९ मे रोजीं टायरोलीन सैन्याच्या हातून परत घेतलें. नेपोलियनच्या उत्तेजनानें ही जी मोहीम सुरू झाली होती तीमध्यें बव्हेरियाच्याच पक्षाला यश येत गेलें व टायरोलीज लोक फिरून हताश होऊं लागले. आणि त्याच सुमाराला दुसरीकडून मोकळें झालेलें पंधरा हजार फ्रेंच सैन्य टायरोलकडे चाल करून येत होतें. आणि ऑस्ट्रियाचे जे सरदार टायरोलच्या साहाय्यासाठीं आले होते तेही हताश होऊन परत जाऊं लागले होते. अशा प्रसंगीं टायरोलच्या शेतकऱ्यांनीं फिरून धीर धरून शत्रूच्या सैन्याला तोंड दिलें. ह्या प्रसंगीं होफरनें लढाईच्या पूर्वीच्या दिवशी आपल्या देशबांधवांना जें एक पत्र पाठविलें होतें, त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, " देशबांधवहो, आपल्या देवासाठीं आणि आपल्या देशासाठीं जिवावर उदार होऊन लढण्याकरितां उद्यांची प्रातःकाळ ही वेळ ठरविण्यांत आलेली आहे. परमेश्वराच्या कृपेनें आपण बव्हेरियन्सना इन्स्ब्रुकमधून खात्रीनें हांकलून देऊं, असा देवाचाच संकेत दिसत आहे. तेव्हां तुम्ही सर्वजण आमच्या मदतीला या. परंतु जर परमेश्वरापेक्षां आपल्याला जास्त समजतें आहे, असें तुम्हांला वाटत असेल तर आम्ही तुमच्यावांचूनही लढाई करीत आहों." याचा परिणाम फार चांगला होऊन सर्व लोक तयार झाले. स्पेक्बेचर यानेंही या प्रसंगीं फार शौर्य गाजविलें व अखेरीस टायरोलीज लोक यशस्वी होऊन इन्स्ब्रुक शहर फिरून त्यांचे ताब्यांत आलें. आणि त्यामुळें टायरोलच्या लोकांना फिरून आनंद प्राप्त झाला. परंतु त्या सुमाराला दुसरीकडे ऑस्ट्रियाचा बादशहा आणि नेपोलियन ह्यांच्यामध्यें एक संग्राम चाललेलाच होता. त्याचा शेवट वॅग्रामच्या लढाईमध्यें पराभव होऊन ऑस्ट्रियाच्या विरुद्ध झाला; व फ्रान्स आणि ऑस्ट्रिया यांच्यामध्यें तह ठरून त्या तहाप्रमाणें आस्टियाला टायरोलमधून आपलें सन्य काढून घेणें भाग पडलें. टायरोलला मुख्य आश्रय काय तो ऑस्ट्रियाचाच होता. परंतु तो आश्रय अशा रीतीनें एकाएकीं तुटल्यामुळें सर्व टायरोलीज लोकांची अगदीं कंबर खचून गेली आणि बरेच शेतकरी निराश होऊन आपापल्या घरीं जाऊन बसले. टायरोलला स्वातंत्र्याची आशा उरली नाहीं आणि आजपर्यंत केलेले सर्व प्रयत्न निष्फळ होण्याच्या बेतांत आले. तरी पण टायरोलचे शेतकरी दुसऱ्याच्या गुलामगिरीमध्यें राहण्याला खुषी होईनात. अशा प्रसंगीं सर्वांचे

डोळे होफरकडे लागले. तेव्हां पुष्कळ लोकांची एक सभा जमली असतां त्या सभेमध्यें सर्वांना आश्वासन देऊन होफरनें असें सांगितलें कीं, ' माझ्या शरीरांतील शेवटचा रक्ताचा बिंदु गळून पडेपर्यंत मी तुमचा पक्ष सोडणार नाहीं. ' होफरच्या या अभिवचनामुळें लोकांना पुष्कळ धीर आला. परंतु टायरोलच्या स्वातंत्र्याच्या सूर्यावर एका पाठीमागून एक जास्तच अभ्रें येऊं लागलीं टायरोल कायमचें पादाक्रांत करून टाकावयाचें अशा इच्छेनें नेपोलियननें दुसरीकडून मोकळीं झालेलीं सैन्यें टायरोलमध्यें आणून घातलीं आणि टायरोलच्या वतीनें प्रतिबंध करण्याला जाग्यावर कोणीही नसल्यामुळें थोडक्याच वेळामध्यें तीस हजार फ्रेंच सैन्यानें इन्स्प्रुक शहरामध्यें येऊन आपला तळ दिला इन्स्प्रुक अशा रीतीनें शत्रूच्या हातांत गेलेलें पाहून आतां मात्र टायरोलच्या स्वतंत्रतेची लढाई कायमची संपली, असा सर्वांचा समज झाला. परंतु हा समज चुकीचा होता. नेपोलियनच्या अवाढव्य सैन्यानें सर्व यूरोप खंडाची दृष्टि चकित होऊन गेलेली होती व त्या सैन्यापुढें टायरोलचें कांही एक चालावयाचें नाहीं, अशी सर्वांची खात्री होऊन चुकलेली होती. परंतु टायरोलीज शेतकऱ्यांच्या स्वदेशभक्तीनें आणि पराक्रमानें फिरून एकदां हा समज खोटा ठरविला.

टायरोलमधील ऑस्ट्रियाचें सैन्य निघून जाऊं लागल्यामुळें टायरोलची स्थिति निराश्रित होत चालली होती; व याउपर टायरोलनें स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न करणें अगदीं फुकट आहे, असें वाटून ऑस्ट्रियन सरदार टायरोलच्या पुढाऱ्यांना आपल्याबरोबर टायरोल सोडून चलण्याविषयीं स्नेहबुद्धीनें फार फार आग्रह करीत होते. आणि स्पेक्बेचर यानें तर टायरोल सोडून जाण्याचा निश्चयही केलेला होता. परंतु निघण्याच्यापूर्वी तो जेव्हां होफरची भेट घेण्याकरितां गेला, तेव्हां उभयतांच्या गांठी पडून अखेरीस स्वदेशभक्तीचाच विजय झाला. शेवटपर्यंत आपल्या देशांतच राहून, आपण आपल्या देशाचा उद्धार करूं, असा होफरनें स्पेक्बेचरला बोध केला व त्याप्रमाणें स्पेक्बेचर राहिला. परंतु होफरच्या मनाला तरी स्वस्थता कोठें होती ? स्वदेशभक्ति त्याला आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठीं फिरून प्रयत्न करण्याविषयीं एका बाजूनें उत्तेजन देत होती; परंतु दुसऱ्या बाजूनें प्रत्येक क्षणीं निराशा त्याचे हातपाय मोडीत होती. अशा रीतीनें काय करावें, हें कांहींच सुचेनासें झाल्यामुळें होफर पहाडांतील एकांतवासामध्यें परमेश्वराची प्रार्थना करीत कित्येक दिवस जाऊन राहिला.

जोसेफ हॅस्पिंजर ह्याचेंही मन असेंच अस्वस्थ झालेलें होतें. टायरोलमधील शेतकरी मात्र शस्त्र घेऊन स्वतंत्रतेसाठीं लढण्याला अगदीं तयार झालेले होते, परंतु त्यांना कोणी पुढारी मिळेना. अखेरीस हे टायरोलचे सर्व देशभक्त एकदां एके ठिकाणीं जमले, व तेथें त्या शेतकऱ्यांनी, 'आपण आपला प्राण घालवूं पण स्वतंत्रता घालविणार नाहीं' अशी शपथ वाहिली. व पुढें कसें काय करावयाचें, ह्याबद्दल सर्व व्यवस्था ठरविण्यांत आली. व हॅस्पिंजर, होफर वगैरे मंडळींनीं त्या शेतकऱ्यांचा पूर्वीप्रमाणें पुढारीपणा पत्करला आणि लढाईचा निश्चय ठरला. होफर आतां हतवीर्य झाला असें समजून त्यानें आपल्याला शरण यावें यासाठीं त्याच्या शत्रूंनीं त्याला ११ ऑगस्ट रोजीं इन्स्ब्रुक येथें आपल्यापुढें हजर राहण्याविषयीं हुकूम पाठविला होता. त्यावर लढाईचा निश्चय झाल्यामुळें होफरनें मोठ्या शौर्यानें असा उलट जबाब पाठविला कीं, 'मी आपल्या म्हणण्याप्रमाणें इन्स्ब्रूक येथें येणारच आहें; परंतु मी आपल्याबरोबर दहा हजार तीरकमठेवाले लोक मात्र घेऊन येणार आहें.' हा निरोप म्हणजे लढाईला आव्हानच होतें. व ता. ४ ऑगस्ट रोजींच लढाईचें तोंड लागलें. शत्रूचें सैन्य एक दरी उतरून चाललें होतें. त्या दरीमध्यें त्या सैन्याच्या वाटेच्या बाजूनें उंच डोंगरावर दाट झाडीमध्यें हॅस्पिंजरच्या हाताखालीं शेतकरी लोक दबा धरून बसले होते. त्यांनीं शत्रु आटोक्यांत येतांक्षणींच चोहोंबाजूंनीं मारा सुरू केला. तेव्हां शत्रूचें सैन्य अगदींच गोंधळून गेलें. त्याच धांदलीमध्यें जवळच एक पूल होता तो एकाएकीं मोडून त्याचीं लाकडें, दगड वगैरे शत्रूच्या अंगावर कोसळून त्यांचा अतिशय संहार झाला व अशा रीतीनें हॅस्पिंजरच्या सैन्याला यश आलें. ह्यानंतर लेफेब्व्हर याच्या सैन्याचा होफर आणि स्पेकबेचर यांनीं एका डोंगरामध्यें पराभव केला. अशाच प्रकारच्या आणखी दोन-चार ठिकाणीं लढाया होऊन त्या सर्वांमध्यें बव्हेरियन लोकांचाच पराभव झाला व अखेरीस इन्स्ब्रुक हें शहर टायरोलीज लोकांच्या हातीं आलें. ह्या लोकांच्या लढाईमध्यें बव्हेरियाचे सहा हजार लोक जायबंदी झाले. ह्या विजयाचा परिणाम असा झाला कीं, त्याच्या योगानें शत्रूचा दम सुटला. मार्शल लेफेब्व्हर हा आपलें सैन्य घेऊन परत जाण्याकरितां निघाला आणि त्यामुळें सर्व टायरोल शत्रूच्या सैन्यापासून निर्भय झालें आणि बव्हेरियाच्या अंमलापासून आपली पूर्णपणें मुक्तता झाल्याबद्दल टायरोलमधील सर्व लोकांना आनंद झाला. ज्या स्वतंत्रतेसाठीं आपण लढत होतों, ती

आपल्याला प्राप्त झाली असें पाहून टायरोलच्या सर्व लोकांना समाधान वाटूं लागलें. ह्याप्रमाणें लोक आनंदामध्यें असतांना होफरनें इन्स्ब्रुक शहरामध्यें मोठ्या थाटानें प्रवेश केला. त्या वेळचा तो समारंभ फार प्रेक्षणीय होता, आणि लोकांचा उल्हास अवर्णनीय होता. होफर यानें शहरांत प्रवेश केला. आणि तेथील किल्ल्यामध्यें तो जाऊन राहिला, व सर्व लोकांच्या संमतीनें सर्व टायरोल देशाचा अधिकार होफरनें आपल्या हातामध्यें घेतला. त्याला सर्व लोकांनी टायरोलचा, ' कमांडर-इन्-चीफ ' अशी पदवी दिली. ह्याप्रमाणें मुलकी आणि लष्करी अशी दोन्ही प्रकारची सत्ता होफरचे हातामध्यें येऊन तो तेथील मुख्य अधिकारी बनला तेव्हां, त्यानें आपल्या नांवाची द्वाही फिरविली, आणि आपल्या नांवाचें नवीन नाणें पाडून सुरू केलें; व त्या वेळेपासून टायरोलचे लोक स्वतंत्रतेचा उपभोग घेऊं लागले.

टायरोलचा इतिहास अजून पुष्कळ लांब आहे; पण आम्हांला टायरोल-बद्दलची जी गोष्ट सांगावयाची होती ती येथें संपली. या गोष्टीमध्यें पुष्कळ तात्पर्य आहे. या गोष्टीमध्यें चांगला उपदेश करण्याचें सामर्थ्य आहे, आणि हें कथानक रोमहर्षण असून फिरून उल्हासजनकही आहे. गारठलेल्या मनामध्यें ही गोष्ट उष्णता उत्पन्न करील, हताश झालेल्या मनाला ही गोष्ट उत्तेजन देईल, आणि दुर्बळ मनुष्याच्या अंगांत ही गोष्ट शक्ति उत्पन्न करील हा इतिहास मोठ्या राजांच्याही मनांत क्षणभर भीति उत्पन्न करील, आणि अत्यंत देशद्रोही मनुष्याच्याही मनांत अक्षय स्वदेशप्रीति उत्पन्न करील; मोठ्या राजांनेंही सदाचरणानें चालावें आणि गुलामागिरीत सांपडलेल्या लोकांनीही धैर्य सोडूं नये, हा या गोष्टींतील हेतु आहे. खऱ्या स्वदेशभक्तीनें पाहिजे ती गोष्ट होऊं शकते, हा ह्या कथेंतील अभिप्राय आहे. बलाढ्य राजा आणि गरीब शेतकरी हा मनुष्यामधील खरा भेद नव्हे, ह्या भेदावर ईश्वरी कृपा अवलंबून नाहीं, अन्यायी कोण आहे आणि न्यायी कोण आहे, हें परमेश्वर पाहत असतो, आणि तदनुरोधानें तो आपल्या फळांची वांटणी करीत असतो; म्हणून राजांनीं आणि रंकांनीं, धन्यांनीं आणि गुलामांनीं, सशक्तांनीं आणि अशक्तांनीं सर्वांनीं नेहमीं न्यायानें वागण्याचा प्रयत्न करीत असावें, हें उत्तम बोधामृत ही गोष्ट आपल्याला पाजीत आहे. त्याचें आपण विचारपूर्वक सेवन केलें पाहिजे.

---

# ईश्वरी सूत्र कांहीं निराळेंच असतें : : : ४

## Man Proposes and God Disposes.

काळ : अग्रलेख, ता. २७-४-१९०२.

ह्या वरील वाक्याची सत्यता या जगांतील सर्व ठिकाणच्या लोकांच्या मनावर ठसविणारा हल्लींच्यासारखा प्रसंग वारंवार क्वचितच येत असतो. कालचा दिवस हा मनुष्यांनीं एडवर्डसाहेबांच्या राज्यारोहणासाठीं मुक्रर केलेला होता; परंतु परमेश्वरानें त्याला आपली मंजुरी दिलेली नव्हती, तीमुळें त्या दिवशीं राज्यारोहणसमारंभ घडून आला नाहीं. परमेश्वराच्या घरचा खेळ कांहीं विचित्र आहे ! जगांतील सर्व मनुष्यांनीं हा राज्यारोहणाचा दिवस बदलण्याचें मनांत आणलें असतें तरीदेखील ही गोष्ट शक्य झाली नसती, परंतु परमेश्वरानें तो दिवस बदलला ! ईश्वरी सूत्रें कांहीं निराळींच असतात. त्याचें धोरण काय आहे हें पाहूनच मनुष्यानें आपले बेत करावे. देवाच्या मंजुरीवांचून मनुष्याचा--मग तो मनुष्य कोणीही असो अथवा कितीही मोठा असो--एकादा हुकूम शेवटास जाणें शक्य नाहीं. म्हणून त्याच्याच कृपेच्या अनुरोधानें मनुष्यांनीं आपले प्रयत्न चालविणें भाग आहे. असे विचार प्रस्तुत प्रसंगावरून कोणाच्याही मनांत उद्भवल्यावांचून राहणार नाहींत.

आपल्या परमप्रिय राणीसाहेब मेल्यापासून आपल्या परमप्रिय एडवर्ड साहेबांच्या ह्या राज्यारोहणाची तयारी चाललेली होती. वर्ष दीडवर्षभर अनेक लोक राज्यारोहणाच्या समारंभासाठीं खपत होते. जूनची २६ तारीख हा

राज्यारोहणाचा दिवस केव्हां येईल असें प्रत्येक मुलाला, स्त्रीला आणि उल्लू पुरुषाला झालेलें होतें. बहुतेक सर्व जग ह्या दिवसाची वाट पाहत होतें. ह्या समारंभासाठीं केवढ्या तयाऱ्या चाललेल्या होत्या ! इंग्लंडपासून पांच पांच हजार कोसांवरील दूर दूरच्या खेड्यापाड्यांतून जर लांकडांच्या कमानी आणि फडक्यांच्या मेहरपी ह्यांची तयारी चाललेली होती, तर खुद्द इंग्लंड देशामध्यें आणि लंडन शहरामध्यें काय चाललें असेल, ह्याची कल्पनाही करणें शक्य नाहीं. आपल्या हिंदुस्थानाकरितां जानेवारीमध्यें राज्यारोहणसमारंभ व्हावयाचा आहे, त्या वेळीं लोकांनीं काय मजा करावयाची ती करावी, सध्यां करूं नये, अशा प्रकारचा निषेधात्मक सरकारी हुकूम असतांनाही जर आपण आपल्या इकडे महोत्सवाची इतकी तयारी चाललेली पाहिली, तर जेथें लोकांनीं उत्सव करावा अशी सरकारची आज्ञा आहे, परंतु आपला स्वतःचा राजा, आपल्या धर्माचा राजा, चारी खंडांमध्यें साम्राज्य स्थापन करून यशस्वी झालेला आपला राजा, गादीवर बसत आहे हें पाहून स्वाभाविक उत्पन्न होणाऱ्या आनंदानेंच, सरकारी हुकुमाची अपेक्षा न बाळगितांही, जेथील लोक आपखुषीनें उत्सवाच्या तयारीला प्रवृत्त झालेले आहेत, अशा त्या लंडन शहरामध्यें काय थाटमाट तयार झालेले होते, हं तेथें असलेल्या लोकांच्या डोळ्याला आणि इतर ठिकाणच्या लोकांच्या कल्पनेला मात्र दिसणें शक्य आहे. लंडनमध्यें ज्या मुख्य देवळांत राज्यारोहणाविधि व्हावयाचा तें देऊळ पूर्वीच्या तयारीसाठीं आज कित्येक महिने बंद केलेलें होतें. राज्यारोहणाची मिरवणूक कोणत्या रस्त्यांनीं जावयाची ते रस्ते ठरविलेले होते. रस्ते ठरले गेले असल्यामुळें, त्या रस्त्यांवरील दुतर्फा घरवाल्यांनीं प्रेक्षकांसाठीं आपल्या घरांची खिडकीन् खिडकी भाड्यानें देऊन टाकिली होती. हजारों सरदारांनीं आणि मानकऱ्यांनीं राज्यारोहणाच्या वेळीं ज्या ज्या रंगाचे आणि फॅशनचे कपडे घालावयाला पाहिजेत त्या त्या रंगाचे आणि फॅशनचे कपडे शिवून तयार करून ठेविले होते. राणीसाहेबांनीं हिंदुस्थानांतील कारागिराच्या कामावर खूष होऊन त्याला उत्तेजन देण्यासाठीं त्या जिनसांनीं बनविलेला पोषाख पसंत करून ठेविलेला होता. अश्वमेधयज्ञांत श्यामकर्ण वारू सोडतात त्याप्रमाणें कोणता श्यामकर्ण वारू राज्यारोहणाच्या प्रसंगीं सोडावयाचा हें ठरून राहिलेलें होतें. राज्यारोहणाच्या प्रसंगीं कोणत्या मानकऱ्यानें काय काम करावयाचें, ह्याच्या-

बद्दल कमिटी नेमून ठराव करून टाकण्यांत आला होता. राज्यारोहणाच्या वेळीं राजानें कॅथलिक लोकांचें मन दुखावलें तरी तिकडे दुर्लक्ष करून कशा रीतीनें शपथ घ्यावी हें निश्चित करण्यांत आलेलें होतें. इंग्लंडनें बऱ्यावाईट रीतीनें आपल्या ताब्यामध्यें जे अनेक प्रांत ओढून घेतलेले आहेत त्या सगळ्या-चा ज्याच्या योगानें निर्देश होईल, अशा प्रकारची कोणती पदवी ह्याप्रसंगीं राजानें स्वीकारावी ह्याच्याबद्दलही खल होऊन शेवटचा निकाल लाविण्यांत आलेला होता देशोदेशीच्या राजेरजवाड्यांना आमंत्रणें पाठ-विण्यांत आलीं होतीं. निरनिराळ्या ठिकाणचें सैन्य विलायतेंत गोळा केलें होतें. समुद्रामध्यें आरमाराची लांबच लांब रांग उभी राहून तयार झालेली होती. मोठमोठे पाहुणे उत्सवासाठीं सर्व ठिकाणांहून गोळा झालेले होते. कलकत्त्याहून प्रद्योतकुमार टागोर जाऊन बसले होते. मुंबईचे सर जमशेटजी जिजीभाई गेले होते. मद्रासचे राजा सर सावळिआ रामस्वामी मुदलीयर हे गेले होते. बोब्बि-लीचे राजे, दक्षिणेचे गणपतराव विंचूरकर, मुरशिदाबादचे अली मिरझा, नागपूरचे चिटनवीस, पंजाबचे नबाब फत्तेअलीखान, औंधचा राजा प्रतापसिंग, पेशावरचे नबाब महमद असलामखान, कपूरथळाचे सर हरनामसिंग, वगैरे मंडळी हिंदुस्थानांतून विलायतेस जाऊन राज्यारोहणाची चातकाप्रमाणें वाट पाहत बसली होती. राणीच्या थडग्यावर पुष्पमाला समर्पण करून हिंदुस्थानांत इंग्रजी शिक्षणापासून झालेल्या फायद्याचें स्वरूप शब्दांनीं व प्रत्यक्ष रॉयल एशिआटिक सोसायटीच्या मेजवानीच्या वेळीं इंग्लिश लोकांना दाखवून, व दुसरीं अशींच किरकोळ कामें आटपून घेऊन राज्याराहणाच्या मिरवणुकींत प्रतापसिंग वगैरेंच्या बरोबर घोड्यावर बसून कसें मिरवावें, ह्याच्याबद्दल विचार करण्यामध्यें ग्वाल्हेरचे अलिजाबहाद्दर माधवराव शिंदे चूर होऊन गेलेले होते. एल्. एल्. डी. ची पदवी मधच्यामध्यें फुकट मिळवून घेऊन कोल्हापूरचे शिळे छत्रपति महाराज नवीन छत्रपतींच्या मिरवणुकीमध्यें गाडींत बसून मिरवत जाण्याची वेळ केव्हां येते इकडे लक्ष लावून बसले होते. आपलें सोवळेंओवळें, देवधर्म, पूजाअर्चा, देवांचे देव्हारे आणि गंगेच्या पाण्याचे घडे इत्यादींसंबंधानें आपलें आद्य कर्तव्य यथास्थितपणें करून नंतर अवश्य प्राप्त झालेली राजनिष्ठा प्रदर्शित करण्याची कामगिरी करण्याविषयीं जयपूरचे सवाई माधवसिंग महाराज उत्सुक झालेले होते. भावलपूरचे नबाब, ईडरचे महाराज, कुचबिहारचे महाराज

वगैरे हिंदुस्थानांतील अनेक घेंडें विलायतेस जाऊन राज्यारोहणासाठीं सज्ज होऊन बसलेलीं होतीं. ज्या रस्त्यानें मिरवणूक जावयाची त्या रस्त्याच्या दोन बाजूंनीं उभें करण्याकरितां साठ हजार सैन्य तयार करून ठेवलेलें होतें. कॉलनीजमधील मोठमोठे लोक राज्यारोहणासाठीं विलायतेंत येऊन थडकले होते. सर वुइलफ्रेड लॉरिअर, लॉर्ड क्रोमर, वगैरे मंडळी विलायतेस दाखल होऊन राज्यारोहणाची मार्गप्रतीक्षा करीत होते. जर्मनीमधून प्रतिनिधि आले होते. ओस्टाचा ड्यूक, सॅक्सकोबर्ग गोथाचा ड्यूक, रोमानियाचा प्रिन्स वगैरे येऊन बसलेले होते. रशियाचा झारविच, प्रशिआचा प्रिन्स हेन्री, सयामचा प्रिन्स, अबिसीनियाचा वकील, चीनचा वकील, जपानचा वकील वगैरे अनेक मंडळी आलेली होती. एकंदर कमींत कमी एकोणीस राजपुत्र आलेले होते ह्याशिवाय इतर अलुतेबलुते लोक लंडनमध्यें हा समारंभ पाहण्याकरितां किती आले होते याची तर गणनाच नाही. गाडीवाल्या कंपन्यांनीं आपल्या गाड्यांचें भाडें दुप्पट आधींच केलेलें होतें, व चौपटीनें किंवा सहा पटीनें तें वाढविण्याचा त्यांचा विचार होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं फळ्या बांधून एकंदर सुमारें नव्वद हजार लोकाना बसतां येईल इतकी जागा तयार करण्यांत आली होती. कानडा देशांतील सृष्टिसंपत्ति प्रदर्शित करण्यासाठीं म्हणून तिकडच्या वस्तूंनीं एक मोठी थोरली कमान उभी करण्यांत आलेली होती. राज्यारोहणाच्या रात्रीं दिव्यांची आरास कशी करावी व ती कशी दिसेल हें पाहण्यासाठीं अठरा तारखेच्या रात्रीं दिवे लावून पाहण्यांत आले होते. रस्त्यानें मिरवणूक कशी जावयाची ह्याच्या-बद्दलही रस्त्यावरून मिरवणूक काढून एक रगाची तालीम करून पाहण्यांत आलेली होती. इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष राज्यारोहणविधीचीही वेस्टमिनिस्टर ॲबेमध्यें तालीम करून घेण्यांत आली होती. त्या वेळीं सर्व सरदार लोक राज्यारोहणाच्या वेळेप्रमाणें आपले झगे व मुगुट घालून बसलेले होते. व या तालमींतील खुद्द राजाचें काम, सर स्पेन्सर पॉनसॉनबिल यांनीं केलें होतें. अशा प्रकारची सर्व तयारी झालेली होती. राज्यारोहणाच्या उत्सवासाठीं एकवीस गलबतें, पंचवीस क्रुइझर्स, सतरा टारपेडो बोट कॅचर्स, बत्तीस डिस्ट्रॉयर्स, आणि सहा टोर्पेडो बोटी मिळून एकंदर निरानिराळ्या नांवाखालीं मनुष्य जातीचा प्राण-घात करणारीं हीं एकशेंएक भांडीं राज्यारोहणाच्या समारंभासाठीं टेम्सनदीमध्यें

४

येऊन उभीं राहिलेलीं होतीं, व त्यांचीही एक तालीम झालेली होती. राज्यारोहणाच्या रात्रीं, आठ वाजतां साम्राज्यांतील सगळ्या ठिकाणी इंग्लंडचें नॅशनल अँथेम गायिलें जावें म्हणून चोहोंकडे तजवीज करण्यांत आलेली होती. अशी अश्रुतपूर्व तयारी झालेली होती इतकी मोठी राज्यारोहणाची तयारी पूर्वीं कधींही झालेली नसेल. ह्या सगळ्या तयारीमध्यें बोअर लढाईचेंच काय तें एक वैषम्य राहिलेलें होतें. परंतु बोअर्सच्या झालेल्या नुकसानीबद्दल लक्षावधि पौंड देण्याचें कबूल करून तहही विकत घेऊन ठेवण्यांत आलेला होता. अशा प्रकारची सर्व तयारी झालेली होती. नजरनजराण्यांच्या थैल्या इंडियन राजांच्या हातांत भरून तयार होत्या. मानपत्रांच्या डब्या, करंडे, नळकंडी, पेट्या वगैरे सर्व सिद्ध झालेल्या होत्या. इंग्लंडांतल्याप्रमाणें इतर ठिकाणींही जय्यत तयाऱ्या झालेल्या होत्या. हिंदुस्थान इतर बाबतींमध्यें मागासलेलें असलें तरी असल्या बाबतींमध्यें तें बाकीच्यांच्या दोन पावलें पुढेंच असावयाचें त्याप्रमाणें येथेंही जिकडे तिकडे तयाऱ्या होऊन राहिल्या होत्या. सभांचीं आमंत्रणें गेलेलीं होतीं. चर्च आणि मशिदींमधून प्रार्थना ठरल्या होत्या देवळांतून कीर्तनाचे बेत ठरले होते. हरदासांनीं प्राणप्रतिष्ठापूर्वक श्रुतिस्मृतींच्या आधारें कीर्तनें लिहून काढिलीं होतीं. त्यांच्या तबलजींनीं मृदंगाच्या तोंडाला कणीक लाविली होती. हंड्यांतून तेलें घातलेलीं होतीं. माळ्यांनीं हार गुंफले होते. हलवायांनीं खिरापतीच्या बत्ताशांच्या पुड्या बांधल्या होत्या. सरदार, पेन्शनर, पदवीवाले वगैरे लोकांनीं बिनाठिगळाचे आंगरखे आणि जरीकांठीं उपरणीं बाहेर काढून ठेविलीं होतीं. कवींनीं कविता केल्या होत्या. चितार्‍यांनीं चित्रें काढिलीं होतीं. फार काय ! मूर्तिपूजेच्या स्पृहणीय लाटेची परमावधि होऊन नाटकवाल्यांनीं आपल्या तिकिटांचे दर कमी केलेले होते, आणि व्यापाऱ्यांनीं आपल्या जिनसांची किंमत कमी करून घेतली होती. झाडें लावण्याची तयारी झाली होती. गरिबांना वांटण्याकरितां अन्न शिजण्याच्या बेतांत होतें. पानसुपाऱ्यांचीं ताटें भरून तयार होतीं. अत्तरदाण्यांतून अत्तरें घातलेलीं होतीं. गुलाबपाण्यानें गुलाबदाण्या भरून राहिल्या होत्या. राज्यारोहणसमारंभासाठीं शाळाधिकाऱ्यांच्या हुकुमावरून यक्ष, गंधर्व, किन्नर, इत्यादिकांचें काम करण्याला तयार झालेल्या शाळांतील लहान अर्भकांचे राज्यारोहणाचीं गीतें ओरडून ओरडून बसलेले गळ खडीसाखरेनें फिरून ताळ्यावर येऊन, गायला लागण्याच्या बेतांत आले होते. भिक्षेकरी आपल्याला जेवण

मिळेल म्हणून, शाळेंतील मुलें आपल्याला पेढा मिळेल म्हणून, खुषमस्कऱ्ये लोक आपल्याला पदवी मिळेल म्हणून, आणि बाकीचे सामान्य लोक इंग्लंडचा राजा इंग्लंडांत गादीवर बसतो आहे म्हणून आनंदित झालेले होते. अशा प्रकारची सर्व ठिकाणीं सर्व तयारी झालेली होती. राज्यारोहणाच्या सिद्धतेला कांहीं एक कमी राहिलेलें नव्हतें. गुरुवारचा दिवस उगवणार आणि इंग्लंडचे एडवर्डसाहेब गादीवर बसणार, येथपर्यंत मजल येऊन ठेपली होती. मनुष्यांनीं इतकी कडेकोट तयारी करून ठेविली होती.

पण ती मनुष्यांनीं केली होती ! त्याला देवाची मंजुरी मिळालेली नव्हती. गुरुवारचा दिवस उगवला, पण तो इंग्लंडच्या एडवर्डसाहेबांना गादीवर बसविण्यासाठीं उगवला नाहीं. गुरुवारचा दिवस उगवला आणि मावळला ! पण त्यानें एडवर्डसाहेबांना गादीवर बसलेलें पाहिलें नाहीं ! ईश्वराच्या घरचा नेमानेम कांहीं विलक्षण आहे ! गुरुवारचा दिवस येण्याच्या पूर्वीं राजेसाहेबांची प्रकृति थोडीशी बिघडली होती. राज्यारोहणासाठी जमलेल्या सैन्याची पाहणी करण्याकरितां राजेसाहेब ऑल्डर शॉट येथें गेले असतां तेथील तंबूंतील सर्दी बाधून त्यापासून प्रथमतः राजेसाहेबांच्या पोटामध्यें कांहीं विकार उत्पन्न झाला. त्यानें त्यांची प्रकृति दिवसेंदिवस जास्त बिघडत चालली. पडदे सोडलेल्या गाडींतून ते जात येत असत, तरी त्यांच्या अस्वस्थतेबद्दल फारसा कोठें बोभाटा होऊं देण्यांत आलेला नव्हता. तरी पण ती बातमी एकदांची बाहेर फुटलीच. त्यामुळें लोकांमध्यें फार गवगवा झाला म्हणून त्याची शांतता करण्याकरितां राजाची प्रकृति चांगली आहे अशी बातमी तारीख २२ रोजीं अधिकाऱ्यांना मुद्दाम प्रसिद्ध करावी लागली. तरी पण राजे साहेबांची प्रकृति पुढें फारशी सुधारली नाहीं. राजेसाहेबांना पोटांतील आंतड्यांमध्यें एक प्रकारचें गळूं होऊन त्यांची प्रकृति विशेष बिघडत चालली. शनिवारीं त्यांची प्रकृति साधारण बरी होती. व नीट काळजी घेतली तर राज्यारोहणाचा विधि त्यांच्या हातून पार पडेल असा संभव दिसत होता. परंतु सोमवारीं संध्याकाळीं त्यांची प्रकृति फार बिघडली, व तें गळूं शस्त्रानें कापल्यावांचून गत्यंतर नाहीं, असें मंगळवारीं वाटूं लागलें. मंगळवारीं दुपारीं दोन वाजतां ऑपरेशन करण्याची वेळ ठरली. त्याप्रमाणें ऑपरेशन करण्यांत येऊन तें गळूं कापून काढलें. ऑपरेशनच्या वेदना राजेसाहेबांनीं फार शांतपणानें सहन केल्या. व त्यानंतर राजेसाहेबांना किंचित्

आराम वाटला. मंगळवारीं रात्रीं साडेबारा वाजतां राजेसाहेबांना चांगली झोंप लागली होती अशी तार आहे. परंतु रात्रीच्या पूर्व भागांत त्यांना स्वस्थ झोंप नव्हती. परंतु ऑपरेशन झाल्यापासून चोवीस तासपर्यंत प्रकृतींत फेरबदल पडण्याची भीति आहे अशीही एक तार आहे. परमेश्वर करो आणि राजेसाहेबांच्या प्रकृतीला आराम वाटो.

राजेसाहेबांची प्रकृति ह्याप्रमाणें नादुरुस्त झाल्यामुळें राज्यारोहणाचा बेत अर्थात् तहकूब ठेवणें भाग पडलें. ही तहकुबी बऱ्याच दिवसपर्यंत चालणारी आहे. कारण, राजेसाहेबांना आराम पडला तरी ते चांगले बरे होण्याला कित्येक महिने लागतील असा अजमास आहे. राजाच्या अस्वस्थतेबद्दलची बातमी लॉर्ड सालिसबरी यांनीं हाउस ऑफ लॉर्ड्समध्यें सांगितली, आणि मिस्तर बालफर ह्यांनीं हाउस ऑफ कॉमन्समध्यें सांगितली. प्रधानमंडळाचीही एक सभा भरली होती. तेव्हां लोकांच्या भीतीला सीमाच नाहींशी होईल, म्हणून सध्यांच्या प्रसंगी पार्लमेंटची बैठक तहकूब ठेवूं नये असें ठरविण्यांत आलें. राज्यारोहणाचा समारंभ तहकूब झाल्यामुळें सर्वच गोष्टी बंद पडल्या. जी राजे मंडळी राज्यारोहणासाठीं आली होती, ती आपापल्या घरोघर परत जाऊं लागली आहे. वेस्ट एन्ड वगैरे ठिकाणीं शहरांत जे शृंगार केलेले होते ते सर्व खालीं उतरण्यांत येत आहेत. रस्त्याच्या बाजूनें ज्या फळ्यांच्या बैठकी केल्या होत्या त्या सोडण्यांत येत आहेत. राज्यारोहणाचा बेत रहित झाल्यामुळें एकंदर सगळी स्थिति बदलून गेली आहे. विलायतेंतील मानकऱ्यांनीं तयार केलेले पोषाख जागच्या जागींच राहिले राजानें घ्यावयाची शपथ तशीच राहिली. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं उभें राहण्याकरितां आणलेलें साठ हजार सैन्य आपल्या जागीं परत जाणार ! जंगी आरमाराच्या प्रदर्शनासाठीं गोळा केलेलीं एकशें एक गलबतें इंग्रजी ऐश्वर्याचा आणि सामर्थ्याचा भपका जगाला दाखविल्यावांचूनच परत फिरणार ! हिंदुस्थानांतून स्वतःच्या किंवा सरकारच्या खर्चानें विलायतेस गेलेले लोक जसे गेले तसे माघारे येणार ! युरोपांतील राजे व राजपुत्र हे एव्हांना आपआपले ठिकाणीं जाऊन पोहोंचलेही असतील ! गाडीवाल्यांनीं आपले वाढविलेले दर कमी केले असतील ! कनेडियन कमान जी उभारण्यांत आली होती ती आतां खालीं उतरण्यांत आली असेल ! दिवेबत्तीची, आतषबाजीची, रस्त्यांतील मिरवणुकीची आणि ॲबेमधील राज्यारोह-

णाची रंगाची तालीम झाली, पण खरें नाटक झालें नाहीं. इतर ठिकाणच्या-प्रमाणें हिंदुस्थानांतीलही तयाऱ्या जेथल्या तेथेंच राहिल्या. कथेच्या मृदंगावरची कणीक मृदंगावरच राहिली. फुलांचे हार माळ्यांच्या हातांतच राहिले. बत्ताशांचे पुडे हलवायांच्या दुकानांतच पडले. ग्लासांतील तेल जळल्यावांचून जसेंच्या तसेंच राहिलें. तबकांतील विडे सुकून गेले. अत्तराचा वास उडून गेला. गुलाबपाणी गुलाबदाणींतच राहिलें. आणि जरीच्या उपरण्यांच्या घड्या फिरून गांठोड्यांत बांधून ठेवाव्या लागल्या. कवींच्या कविता कागदावरच्या कागदावरच राहिल्या आणि चित्रकारांचीं चित्रें काढलेलीं तशींच पडून राहिलीं. जें अन्न राजाच्या राज्यारोहणाच्या आनंदासाठीं वाटावयाचें होतें. तें राजाच्या प्रकृती-च्या आरामासाठीं वांटण्याची पाळी आली. जी सुट्टी चैनींत घालवावयाची होती ती काळजींत घालविण्याचा प्रसंग आला. आणि एवढ्या साम्राज्याच्या गादीवर आमचा राजा बसला, ह्याबद्दल आम्ही फार आनंदित झालों आहों, असें देवाच्या देवळांत जाऊन देवासमोर जेथें म्हणावयाचें होतें तेथें देवा, आमच्या राजाला आराम पडूं दे' अशी गुडघे टेकून प्रार्थना करण्याची वेळ आली ! झाडें लावावयाचीं होतीं तीं लागलीं नाहींत ! मुलांचीं गाणीं झालीं नाहींत ! पदवीसाठीं खटपट करणारांचीसुद्धां पाठवणी झाली नाहीं. परमेश्वराच्या इच्छेवांचून पानदेखील हलावयाचें नाही. मग इतर गोष्टींचें नांव कशाला पाहिजे ! परमेश्वराच्याच इच्छेनें सर्व कांहीं होत असतें. आकाशांतील ग्रह आणि तारे हेही त्याच्याच इच्छेनुरूप फिरत असतात व म्हणूनच त्यांच्या गतीवरून ज्योतिषशास्त्राच्या आधारानें परमेश्वराची इच्छा काय आहे हें ज्योतिर्विद् जाणीत असतात व पुढील गोष्टींचें भविष्य करीत असतात. बंगालचे ज्योतिषी तरणीप्रसाद यांनीं या राज्यारोहणासंबंधानें केलेलें भविष्य काळाच्या वर्ष ४ च्या ४० व्या अंकामध्यें दिलेलें वाचकांना स्मरतच असेल. त्यांत त्यांनीं म्हटलेलें आहे कीं, 'यंदाच्या राज्याभिषेकासंबंधानें जे अनेक विचार चाललेले आहेत ते शेवटाला जातील असें नाहीं. त्यामध्यें अनेक प्रकारच्या अडचणी उत्पन्न होतील.' परंतु याच्याहीपेक्षां जास्त स्पष्ट भविष्यकथन मद्रासचे कंदास्वामी पिले यांनी केलेलें आहे तें वाचून मनुष्य कितीही नास्तिक असला तरी त्याच्या मनांत परमेश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि आणि ज्योतिषशास्त्राविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झालीच पाहिजे. त्यांनी वर्तविलेलें भविष्य जगद्धितेच्छूच्या

आषाढ शुद्ध १३ शके १८२३ च्या ३६ व्या अंकामध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. त्यांत कंदास्वामी म्हणतात कीं, " तारीख २१ जून ते ता. २८ जून सन १९०२ या मुदतीच्या दरम्यान काळपुळीसारखीं गळवें इंग्लंडच्या हल्लींच्या बादशहाच्या अंगावर उठतील व त्यांमुळें त्यांस त्रास होईल. ग्रहयोगावरून याविषयीं भीति वाटते. अशा प्रकारचें स्पष्ट कथन एक वर्षाच्या पूर्वीं होऊन चुकलेलें आहे. अर्वाचीन शोधांच्या तुटपुंज्या ज्ञानानें फुगून गेलेल्या युरोपिअन साहेबांनीं आणि त्याच्यामागें हुरळून धांव मारूं लागणाऱ्या आमच्यांतील सुधारकांनीं हें पाहून आपली खात्री करून घ्यावी. ही ग्रहांनीं सूचित केलेली परमेश्वराची इच्छा होय, आणि तीच अखेरीस खरी झाली. परमेश्वराच्या इच्छेला मिथ्यात्व कोण आणणार ? तो सर्वसमर्थ आहे. गांजणारांनीं आणि गांजलेल्यांनीं दोघांनींही त्यालाच शरण गेलें पाहिजे. कारण, ह्या जगामध्यें त्याची कृपा हाच दिग्विजय आणि त्याची अवकृपा हीच उतरती कळा होय.

———

## प्रभाकरपंतांचे विचार : : : ५

काळ : अग्रलेख, ता. ४-७-१९०२.

★ आपण बागडत आहोंत. आपल्यावर राज्य आलेलें आहे याचीही आपल्याला दाद नाहीं !

प्रभाकरपंतांचे पुढील विचार बरेच मनोरंजक वाटल्यावरून तेच आज वाचकांपुढें ठेविले आहेत. प्रभाकरपंत खेडेगांवाहून लिहितातः—

गुदस्तसालीं इनॉक्युलेशन करून घेतल्यापासून माझी जी प्रकृति बिघडली ती कांहीं केल्यानें सुधारेना. तेव्हां आपल्या जन्मभूमीच्या हवेमध्यें गेल्यानें कदाचित् हुषारी वाटेल असा एका वैद्यानें सल्ला दिल्यावरून मी हल्लीं बिनपगारी रजा घेऊन आपल्या खेडेगांवीं येऊन राहिलों आहें. येथें माझे दिवस शहरांतल्यापेक्षां फार आनंदानें जातात. येथें चित्ताचें आकर्षण करून घेणारे आणि मनाला मोह पाडणारे असे अनेक वेळां प्रसंग येतात; थोडे दिवसांपूर्वीं एके दिवशीं संध्याकाळीं मी फिरावयाला गेलों होतों. आमच्या गांवाच्या जवळ एक लहानशी नदी आहे. तिचें पाणी उन्हाळ्यांत स्वच्छ असतें; व आपलें स्थान सोडून जावयाचे वेळीं तें बरेंच खळखळ करीत असतें. परंतु आमच्याकडे यंदाच्या मृगाचे पहिले सात आठ पाऊस चांगलेच झाल्यामुळें व डोंगरांतून घाटमाथ्यावरही बराच पाऊस पडलेला असल्यामुळें नदीचें पाणी बरेंच गढूळ झालेलें होतें व त्या नदीची उन्हाळ्यांतील सर्व खळखळ नाहींशी होऊन तिला हल्लीं पुष्कळ

शांतपणा आणि गंभीरपणा प्राप्त झालेला होता. नदीच्या शेजारचें मैदान नवीन उगवलेल्या गवतानें हिरवेंगार होऊन गेलेलें होतें. तेथील आसपासच्या झाडां-वरील धूळ, पावसाच्या पाण्यानें धुऊन जाऊन झाडाची पालवी हिरवीगार व क्वचित्स्थळीं काळीभोर झालेली होती. वेलींना टवटवीतपणा आलेला होता, व मधून मधून रानटी झाडांवरील फुलें आपल्या मंदस्मिताचा प्रकाश आस-पासच्या हिरव्या रंगाच्या पर्णसमुच्चयावर पाडीत होती. आसपासच्या शेतांतून नुकत्याच पेरलेल्या धान्याचें रोप उगवून व जेथें धान्य पेरलेलें नव्हतें तेथें गवत उगवून तो सर्व भूप्रदेश कोंवळ्या हिरव्या रंगानें ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आच्छादित झालेला होता. नदीच्या पलीकडच्या बाजूला एक लहानसा डोंगर होता. तो उन्हाळ्यामध्यें अगदीं रखरखीत दिसत असे. परंतु ह्या वेळीं तोही हिरवी शालजोडी पांघरून बसल्याप्रमाणें दिसत होता. ह्या-प्रमाणें त्या ठिकाणीं जिकडे तिकडे हिरवा रंग पसरलेला पाहून जसा तांबडा समुद्र किंवा पिंवळा समुद्र असतो तसा हा येथें एक हिरवा समुद्रच आहे कीं काय व त्याच्या मध्यभागीं हा डोंगर नसून ह्या वादळाच्या दिवसांत त्या हिरव्या समुद्राची ही एक उंच लाटच उसळलेली आहे कीं काय, असा पाहणाराच्या मनामध्यें त्या वेळीं कधीं कधीं भास उत्पन्न होई पण ती कल्पना निघून गेली म्हणजे फिरून दुसरीच कांही तरी कल्पना मनामध्यें उद्भवे. ह्या डोंगरावरून एक प्रकारच्या हिरव्या पाण्याचे लोट वाहत येऊन त्यांनींच हा डोंगर व हें सर्व मैदान आच्छादून गेलें आहे कीं काय, असा कधीं कधीं भास होई. बाजारांत जो हिरवा रंग विकावयाला ठेविलेला असतो तो सगळा बहुतेक येथेंच पिकत असला पाहिजे असें एकदां मनाला वाटे. झाडें, लता, डोंगर, जमीन हीं सर्वच हिरवीं झालेलीं असल्यामुळें व जिकडे तिकडे हिरव्या रंगाचें प्राबल्य माजलेलें असल्यामुळें पोपटासारखे हिरव्या रंगाचे पक्षी हिरव्या रंगाच्या झाडांवर मुकाट्यानें बसलेले असतांना हे पक्षी आहेत किंवा झाडा-चाच कांहीं भाग आहे हें ओळखण्याची त्या वेळीं फारच मारामार पडत होती. परंतु त्या वेळच्या सृष्टिसौंदर्याच्या अतिरेकामुळें हर्षनिर्भर होऊन ते पक्षी जेव्हां ह्या वृक्षावरून त्या वृक्षावर उडून जाऊं लागत किंवा परमेश्वराच्या कृतज्ञतेबद्दलचीं गाणीं गाऊं लागत त्या वेळीं मात्र हे पक्षी आहेत आणि हिरव्या झाडांचे हिरवे अवयव नव्हेत असा मनाचा निर्णय होई. पण दुरून पाहणाऱ्या

मनुष्याच्या मनाची अशी संशयात्मक वृत्ति त्या वेळच्या त्या हिरवेपणाच्या समुद्रामध्यें झाली तर त्यांत काहीं आश्चर्य नव्हे. त्या हिरव्या समुद्रामध्यें वहिवाटलेल्या एखाद्या दर्यावर्दीप्रमाणें नेहमीं फिरणाऱ्या पोपटांच्या स्त्रियाही कित्येक प्रसंगीं गोंधळून गेल्याचीं उदाहरणें तेथें दृष्टोत्पत्तीस येत होतीं. आपल्या नवान प्रसवलेल्या कोंवळ्या आणि हिरव्या पिलांला देण्यासाठीं तोंडांत हिरवागार चारा धारण करून एका झाडाच्या एका कोंवळ्या नवीन फुटलेल्या पानाजवळ बसून कोणी एक शुकस्त्री आपली चोंच त्याच्यापुढें करीत होती, आणि तिचें अर्भक भुकेसाठीं दुसरीकडेच विलाप करीत होतें. त्या विलापाचा ध्वनि श्रवण केल्यावर त्या शुकस्त्रीला आपली काय चूक होत आहे हें कळून आलें व पुत्रवात्सल्यानें तिचें अंतःकरण सद्गदित होऊन ती त्या करुणस्वरांच्या धोरणानें मार्ग काढीत काढीत गेली, तेव्हां तिला तिचें बालक सांपडलें. अशा प्रकारच्या त्या वनराजीमध्यें जिकडे तिकडे अव्यवस्था माजून राहिलेली होती. दुसरी एक शुकस्त्री आतां संध्याकाळचा गार वारा सुटला आहे, तो सहन करण्याला माझें नुकतेंच जन्मास आलेलें बालक समर्थ होणार नाहीं, अशा बुद्धीनें लवकर लवकर दुरून उडत आली व आपल्या पिलाला ऊब देण्याच्या इच्छेनें ती एका झाडाच्या कोंवळ्या पानासभों-वतींच आपले पंख पसरून बसली. आणि त्या बिचारीचें मूल तर दुसरी-कडेच गारव्यामध्यें कुडकुडत पडलें होतें. अशी तेथील हिरव्या रंगानें पक्ष्या-दिकांची विटंबना मांडली होती. त्या समयीं हिरव्या रंगाला तेथें जिकडे तिकडे पूर आलेला होता. त्या वेळीं आकाशाचीही शोभा फार विलक्षण दिसत होती. सर्व आकाश काळ्याभोर मेघांनीं आच्छादित झालेलें होतें; व त्या ढगांत पाणी अतिशयच सांचून राहिल्यामुळें ते भरलेल्या मधाच्या पोळ्याप्रमाणें आकाशांतून खालीं ओथंबलेलें दिसत होतें. संध्याकाळची पांच वाजण्याची वेळ होती. व सूर्य हळूहळू पश्चिम क्षितिजाजवळ येत चाललेला होता. भरउमेदींतील त्याचें प्रखर तेज नाहींसें होऊन त्याच्यावर ह्या वेळीं वृद्धाप-काळाची झांक मारूं लागली होती. वानप्रस्थाश्रमाचा त्यानें अंगीकार केला आहे असें त्या वेळीं वाटत होतें. त्याच्या तेजावर वार्धक्यावस्थेमध्यें साहजिकच उत्पन्न होणाऱ्या शांतरसाचा अंमल पूर्णपणें बसलेला दिसत होता. त्याचा प्रकाश पृथ्वीवर पसरला होता व आकाशांतील ढगांवरही प्रतिबिंबित झालेला

होता. त्या वेळीं पृथ्वीवर जो सर्वत्र हिरवा रंग पसरलेला दिसत होता, तो परमेश्वराच्या सदय अंतःकरणाचा कोंवळेपणा आणि लुसलुशितपणाच पर्जन्याच्या धारांबरोबर आकाशांतून ह्या मृत्युलोकावर उतरून चोहोंकडून पसरला आहे कीं काय असें वाटत होतें. कारण, त्या हिरवेपणानेंच भरलेला चारा खाऊन गाईच्या पोटांमध्यें आपल्या वांसरांबद्दल आणि पक्ष्यांच्या मनांमध्यें आपल्या पिलांबद्दल अमर्याद प्रेम उत्पन्न झालें होतें. सूर्याचे किरण ढगांवर पडून तेथून परावर्तन पावल्यामुळें त्यांनीं त्या देखाव्याला एक अप्रतिमच शोभा आणून दिलेली होती. त्या ठिकाणीं कोणत्याही योद्ध्यानें हातांत न धरलेलें असें एक भव्य आणि विस्तीर्ण इंद्रधनुष्य उत्पन्न झालेलें होतें. त्याचा कांहीं भाग नदीपलीकडील टेकडीवर पडलेला होता आणि बाकीचा भाग आकाशावर टेंकून राहिलेला होता. सीतास्वयंवराच्या वेळीं शिवधनुष्याचे जर रामानें तुकडे तुकडे केलेले कोणाला माहीत नसते तर प्रत्येक पाहणाराला परशुरामाला ज्या धनुष्याबद्दल अत्यंत अभिमान होता तेंच हें शिवधनुष्य आहे असें वाटलें असतें. परंतु हें दुसरेंच धनुष्य होतें. जो वर्षाकालरूपी राजा जगाला झालेल्या संतापाचें आणि जुलमाचें प्रशमन करण्याकरितां बाहेर निघालेला होता त्यानें इष्टकार्य बरेंचसें शेवटास नेऊन संध्याकाळच्या प्रहरीं आपल्या भुजदंडावरून खालीं ठेविलेलें हें धनुष्य आहे, अशी त्या वेळीं कोणाचीही कल्पना होणें अगदीं साहजिक आहे. त्या वेळीं कोंवळें कोंवळें ऊन पडलेलेंच होतें. तरी पण आकाशांतून मधून मधून पावसाचे अगदीं बारीक तुषार वाऱ्यानें उडत असलेले दृष्टीस पडत होते. पण त्यांच्यासाठीं छत्रीचा आश्रय करण्याची गरज नव्हती. ते आपल्या अंगावर येऊन पडण्यांतच मजा वाटण्यासारखे ते मनोहर होते. त्याला पावसाचे तुषार म्हणण्यापेक्षां आकाशांतील बर्फाच्छादित मार्गांतून मेघराजांची स्वारी चालली असतां त्यांच्या चरणाघातापासून उठलेली ती बर्फाची धूळच होती असें म्हटलें तर जास्त शोभेल. एक दोन तासांच्या पूर्वींच त्या मैदानांत पावसाची एक सर पडून गेली होती. पण ती सर जरी या वेळीं निघून गेलेली होती तरी तिनें प्रत्येक झाडाच्या गळ्यामध्यें अनेक मोत्यांचे सर अडकवून ठेविलेले होते. झाडांच्या पानांवरून कोठें एक एकच थेंब अवशिष्ट राहिलेला होता; व त्याच्यावर संध्याकाळच्या सूर्याचे किरण पडून तो थेंब

एखाद्या उत्कृष्ट आणि पाणीदार मोत्याप्रमाणें चमकत होता. जमिनीवरील गवतावर पडलेल्या जलबिंदूंमध्यें ईषद्रारक्त सूर्यरश्मि प्रविष्ट झाल्यामुळें, ते सर्व बिंदु थोडथोडे लाल दिसत होते. ते पाहून कोणी तरी कृपावत्सल अंतःकरणाच्या मनुष्यानें डाळिंबें फोडून ताजे व लाल दाणे आपल्याकरितां या तृणभूमीवर फेकले आहेत, असें वाटून आसपासच्या झाडांवरील पोपट ते टिपून खाण्यासाठीं जवळ येऊन हिरमुसलेले होऊन अनेक वेळां माघारे जात होते. सायंकाळची वेळ जवळ जवळ येत चालली असल्यामुळें, दूरवरच्या डोंगराच्या कडचांतून शेतकीच्या कामाकरितां गेलेले शेतकरी लोक हळूहळू आपल्या घराकडे येण्याकरितां निघालेले होते; व त्यांच्या मागून टोपलीमध्यें एखाद्या रकटच्याखाली झांकून ठेविलेलीं आपलीं तान्हीं मुलें डोक्यावर घेऊन—आपली इहलोकची सर्व संपत्ति आपल्या डोक्यावर घेऊन—त्यांच्या स्त्रिया त्यांच्या मागून चालल्या होत्या. व ज्यांना मुलें नव्हतीं अशा स्त्रिया आपल्या पोटच्या मुलांइतकीच ज्यांच्यावर त्यांची ममता आहे अशा आपल्या घरच्या गाईंच्या वांसरांसाठीं कोंवळ्या कोंवळ्या गवताचे भारे डोक्यावर घेऊन तोंडापुढें आलेल्या त्या गवताच्या पातींमधून वाटेनें जाणाऱ्या एखाद्या तरुणाकडे कुतूहलकटाक्ष फेंकीत फेंकीत आपल्या घराकडे चालल्या होत्या. नांगरकीचें काम आटपून आपले नांगर आपल्या खांद्यावर टाकून शेतकरी लोक आपल्या शेताकडे पाठ फिरवून निघाले होते व त्यांचीं मुलें मधून मधून गाणीं म्हणत आणि मधून मधून बैलांच्या पाठीवर हात टाकीत आपल्या बैलांना घराकडे हांकून आणण्यांत गुंतून गेलेलीं होतीं. गांवांतल्या गाई डोंगरावर चरावयाला गेल्या होत्या त्या घराकडे येण्यासाठीं माघाऱ्या वळल्या होत्या, व त्यांचीं वांसरें त्यांच्या मागून उड्या मारीत येत होतीं. तीं गाईवांसरें आणि त्यांचे गोवारी संध्याकाळच्या वेळीं पलीकडच्या डोंगरावरून हळूहळू खालीं उतरत असतांना त्यांची शोभा फारच विलक्षण दिसत होती. त्या डोंगराच्या पायथ्याशीं एका बाजूला जेथें नदीचा मोठा डोह होता तेथेंही एक प्रकारचें विलक्षण काम चाललेलें होतें. त्या नदीच्या पाण्यामध्यें हुबेहूब चित्रें काढणारे कोणी कारागीर बसलेले होते व बाहेर नदीच्या कांठावर जें जें दिसत होतें त्या सगळ्यांचीं हुबेहूब चित्रें त्यांनीं त्या नदीच्या पृष्ठभागाच्या चित्रपटावर काढिलीं होतीं. तीं फार पाहण्या-

सारखीं होतीं. नदीच्या कांठच्या पवित्र दर्भाचीं बेटें, दुर्वांचे ताणे, सापांची वारुळें, वेलींचे कुंज, फुलांच्या पाकळ्या, एकापेक्षां एक उंच वाढलेले वृक्ष, त्यांच्यावरचीं फळें आणि त्यांच्याही वर आकाशामध्यें भ्रमण करणाऱ्या घारी, ह्या सगळ्यांचीं चित्रें त्या नदीच्या शांत पृष्ठभागावर दिसत होतीं. त्या नदीच्या कांठीं आपल्या वांसरांसह चरत असतांना त्यांचीं प्रतिबिंबें नदीच्या पाण्यामध्यें पडलेलीं पाहून या ठिकाणीं अनेक गाईनीं अनेक वेळां हंबरडे फोडलेले आहेत. व ते ऐकून जवळ येऊन स्तनपान करूं लागलेल्या आपल्या वांसरांचें अंग आपल्या जिभेनें प्रत्यक्ष चाटल्यानंतरच त्यांचे ते हंबरडे बंद झालेले आहेत. अशा प्रकारच्या त्या रमणीय स्थानामध्यें सृष्टिदेवतेनें त्या वेळीं आपल्या सौंदर्याची केवळ उधळपट्टीच मांडली होती.

याप्रमाणें त्या ठिकाणीं सृष्टींतील सर्व निरुपद्रवी वस्तूंची शोभा एकवट लेली होती. परंतु सर्व निरुपद्रवी प्राण्यांमधील जे राजे ते मात्र त्या ठिकाणी आलेलें नव्हते. कारण, तो सुट्टीचा दिवस नसल्यामुळें शाळा सुटून अजून मुलें तेथें आलीं नव्हतीं. पण इतक्यांतच तेथील शांततेंतून शाळेंतील सुट्टीच्या घंटेचा आवाज ऐकूं येऊं लागला. व तो आवाज तेथें आला नाहीं, तोंच मुलेंही तेथें येऊन दाखल झालीं. ती गांवच्या मुलांची खेळण्याचीच जागा होती. तेथें थोड्याच वेळांत सर्व मुलें गोळा झालीं. फुटक्या पाट्या, फाटकीं बुकें, रिकाम्या दौती, शाईचे डाग पडलेले अंगरखे, बंद तुटलेल्या बाराबंद्या, बटणें हरवलेले कोट, दगड, पेन्सिली, खिळे, खोटे पैसे चेंदूल इत्यादिकांनी भरलेले खिसे, विजोड झालेले जोडे आणि अंगठे तुटलेल्या वाहणा, गळत आलेल्या टोप्या आणि सुटत आलेल्या लंगोट्या, विलायती छत्र्या, आणि स्वदेशी विरलीं, उसवलेल्या बंड्या, आणि फाटलेले रुमाल, इत्यादि बालपणच्या अनेक अमूल्य चिजा त्या ठिकाणीं गोळा झाल्या. गण्या, गोंद्या, केश्या, गोप्या, नाऱ्या, विठ्या, पांड्या, महाद्या, त्रिंब्या, सद्या, विष्ण्या, बाळ्या वगैरे नांवांच्या हाकांच्या कलकलाटानें तेथील प्रदेश अगदीं दुमदुमून गेला. त्या वेळीं मात्र तेथील निरुपद्रवी सृष्टिदेवता आनंदाच्या पूर्ण भरामध्यें येत असलेली दिसूं लागली होती. सगळीं मुलें जमल्याबरोबर निरनिराळ्या प्रकारच्या खेळांना सुरवात केली. चेंडू, विटीदांडू, खोखो, आट्यापाट्या, कुस्त्या, धांवाधांवी वगैरे

अनेक प्रकारचे खेळ सुरू झाले. मुलांच्या त्या खेळण्यासाठीं जमिनीनें हिरवागार गालिचा पसरला होता. आकाशानें त्यांच्यावर छत्र धरिलें होतें. वायु त्यांच्या-वर पंखा वारीत होता. पक्षी त्यांच्यासाठीं मंजुळ गाणी गात होते आणि सूर्य त्यांच्याकडे सहास्य मुद्रेनें पाहत होता. अशा स्थितींतील त्या मुलांचें तें खेळणें कोणाच्या मनांत आनंदाची परमावधि उत्पन्न करणार नाहीं !

त्या वेळीं सर्व सृष्टि आनंदामध्यें निमग्न झालेली होती. त्या ठिकाणच्या प्रत्येक कोनाकोपऱ्यांतून आनंद भरलेला दिसत होता. पशु, पक्षी, झाडें, माणसें सर्व कांहीं आनंदाच्या चिखलांनींच बनविलेलीं आहेत असें वाटत होतें. पृथ्वी हंसत होती, वृक्ष डुलत होते, पक्षी गात होते, गाईच्या स्तनांतून आपल्या वत्सांसाठीं पान्हे वाहत होते, सूर्य क्षणभर स्तब्ध होऊन ती शोभा पाहण्यामध्यें निमग्न झाला होता, मासे नदीच्या पाण्यामध्यें उड्या मारीत होते आणि मुलें जमिनीवर खेळत होतीं. सर्वत्र आनंद नांदत होता. पण एका ठिकाणीं मात्र अशा वेळींही दुःख दडून राहिलेलें होतें. तें दुसरीकडे कोठें नव्हतें. तें माझ्याच अंतःकरणांत प्रस्तुतच्या आनंदाच्या भाराखालीं खोल-खोल दडपून गेलेलें होतें. तरी पण तें तेथें होतें यांत शंका नाहीं; व त्याला थोडीशी संधि मिळ्ल्याबरो-बर सर्व आनंदाला बाजूला ढकलून तें पुढें सरसावलें. व त्यानें माझ्या सर्व आनंदाचा विरस करून टाकला.

तेथें जमा झालेल्या मुलांपैकीं कांहीं खो खो खेळत होतीं. खेळतां खेळतां त्यांतील एका मुलावर हार येऊन पुढें खेळण्याच्यापूर्वी थोडा वेळ विश्रांति घेण्यासाठीं सर्वजण त्या गवताच्या मैदानावर निरनिराळ्या ठिकाणीं बसले. ज्याच्यावर हार आली होती त्याला ' तुझ्यावर आतां राज्य आलें आहे ' असें म्हणून बाकीचीं मुलें चिडवीत होतीं ते शब्द ऐकून माझ्या मनामध्यें कांहीं निराळ्याच प्रकारचे विचार एकदम उद्भवूं लागले. व जेथें जेथें म्हणून सुख दिसत होतें, तेथें तेथें तेथें सर्वत्र दुःखच भरलेलें दिसूं लागलें. ह्या वेळीं ते बाकीचे मुलगे त्या हार आलेल्या मुलाला चिडवीत होते. त्यांना मीं म्हटलें 'अरे, मुलांनो, त्याला काय चिडवितां ! तुमच्यावर देखील राज्य आलेलें आहे.' हे माझे शब्द ऐकतांक्षणींच 'आमच्यावर कोणानें राज्य नाहीं' असें ते मोठ्यानें ओरडले. मीं त्यांना फिरून म्हटलें कीं, 'अरे बाबांनो, तुमच्यावर

राज्य आहे, तुम्ही नाहीं कसें म्हणतां ?' तरी ते ती गोष्ट कबूल करीनात. मी त्यांना फिरून तेंच सांगितलें. परंतु फिरूनही ते कबूल करीनात. कांहीं वेळ असें झाल्यावर ते खेळूं लागले व मी या गोष्टीनें उत्पन्न झालेल्या विचारामध्यें निमग्न झालों. मीं आपल्यापाशीं म्हटलें, 'अजून हीं कोंवळीं मुलें आहेत, ह्यांना राज्य म्हणजे काय हें काय माहीत असणार ? परंतु हीं मोठीं झालीं म्हणजे आपल्यावर राज्य आलें आहे किंवा नाहीं ह्याची यांना कल्पना येऊं लागेल. हे मोठे होऊन यांच्यावर जेव्हां जबर कर देण्याची पाळी येईल, अंगीं गुण असूनही मोठी जागा मिळण्याची यांची आशा निष्फळ होईल, कितीही काबाडकष्ट केले तरी हरिश्चंद्राच्या रांजणाप्रमाणें आपली पिशवी नेहमीं रिकामीच राहत असलेली जेव्हां यांच्या दृष्टोत्पत्तीस येईल, थोडासा पाऊस कमी पडल्याबरोबर आपल्या भोंवतालचे लोक रिलीफ कामाच्या यात्रेवर चाललेले जेव्हां हे पाहतील, तेव्हां आपल्यावर राज्य आलेलें आहे ही गोष्ट यांच्या लक्षामध्यें येईल. पण तोंपर्यंत तरी बिचारे जे हे आनंदामध्यें आहेत त्यांच्या आनंदाचा भंग मी काय म्हणून करूं ? पुढें यांच्याही कपाळीं दुःख लिहिलेलेंच आहे. तोंपर्यंत हीं बापडीं सुखाचा अनुभव घेईनात ! यांच्यासारखीं दुसरींही मुलें आपल्या देशांत काय थोडीं आहेत ! तीं वयानें जरी मोठीं झालेलीं आहेत तरी ह्या बाबतीत तीं या मुलांच्या इतकींच सुखी आहेत. तीं यांच्यासारखेंच आपले सर्व दिवस नाचण्याबागडण्यामध्यें चालवीत आहेत. व आपल्यावरही राज्य आलेलें आहे याची त्यांना त्या मुलांप्रमाणेंच बिलकुल दाद नाहीं. ते लोकही एका दृष्टीनें सुखी आहेत, व हीं मुलेंही सुखी आहेत. ज्यांना समजतें आहे असेच काय ते लोक दुःखी. असें जर आहे, तर मीही या मुलांसारखा लहान झालों तर किती तरी चांगलें होईल बरें ? देवा, मला बालपणांतच तूं कां ठेविलें नाहींस ? माझी बाल्यावस्था मला कोणी परत देईल काय ? ती सर्व सुखाची जनयित्री माझी बाल्यावस्था मला परत कोठें मिळेल ? ' असे विचार मनांत येऊन मी चोहोंकडे पाहूं लागलों. एकदां त्या मुलांमध्यें मिसळून त्यांच्याबरोबर खेळण्याचाही प्रयत्न केला. परंतु माझ्या मनांतील आत्मस्थितीबद्दलचे विचार कांहीं केल्यानें जाईनात, व तो आनंदमय प्रदेश मला दुःखमय दिसूं लागला.

संध्याकाळ झाला. मुलें आपल्या घरोघर गेलीं. गाईवांसरें आपल्या गोठ्यांत गेलीं. सूर्य अस्तास गेला. नदीच्या पृष्ठभागावरील चित्रपट अदृश्य झाला. वाढत चाललेल्या काळोखामध्यें डोंगर आणि मैदान एक होत चाललीं. आकाशांतील ढगांवर जास्त जास्त काळिमा येऊं लागली. पक्षीही आपल्या घरट्यांतून निःशब्द झाले. त्या शून्य आणि अंधकारमय मैदानामध्यें मी एकटा पुष्कळ वेळपर्यंत उभा राहिलों. वर खालीं कोठेंच कांहीं प्रकाशाचें चिन्ह उरलें नाहीं. तेव्हां दीर्घ श्वास टाकीत मी आपल्या घराकडे वळलों !

---

# आनंदाची गोष्ट : : : ६

काळ : अग्रलेख, ता. १९-७-१९०२

राज्यारोहणाच्या पूर्वीं आपल्या राजेसाहेबांची प्रकृति जी एकाएकी बिघडली होती, ती हल्लीं दिवसेंदिवस बरी होत चालली आहे ही आजकालची आनंदाची गोष्ट आहे. व अशाच प्रमाणानें प्रकृतीची सुधारणा होत गेली तर ऑगस्ट महिन्याच्या पंधराव्या तारखेच्या आंतच तहकूब राहिलेला राज्यारोहणाचा विधि उरकून घेण्याचाही विचार घाटत आहे. इतक्या झपाट्यानें राजेसाहेबांच्या प्रकृतीमध्यें सुधारणा होत असलेली पाहून कोणालाही समाधान वाटल्यावांचून राहणार नाहीं. परंतु ह्या प्रकृतीच्या सुधारणेबद्दल असा एक प्रश्न उपस्थित होतो कीं, राजेसाहेबांच्या प्रकृतीमध्यें ही सुधारणा कोणत्या कारणामुळें घडून आली ? हा कशाचा परिणाम आहे ? हें कशाचें फळ आहे ? ह्या प्रकृतीच्या सुधारणेबद्दलचें श्रेय कोणाकडे आहे ? हे प्रश्न विचार करण्यासारखे आहेत. राजेसाहेबांची प्रकृति सुधारण्याला कारण कोण, असा प्रश्न उत्पन्न झाल्याबरोबर 'मी, मी, मी, मी' म्हणून पृथ्वीच्या चारी टोंकांपासून गोंगाट उत्पन्न होऊं लागतो. मी अमुक केलें म्हणून राजेसाहेब बरे झाले आणि मी तमुक केलें म्हणून राजेसाहेब बरे झाले असें म्हणत प्रत्येक हक्कदार पुढें येऊं लागतो. ज्यानें राजेसाहेबांचें गळूं कापलें तो डॉक्टर म्हणतो मी राजेसाहेबांना वांचविलें. तें गळूं कापण्याचें शस्त्र ज्या शस्त्रकारानें तयार केलें होतें तो म्हणत असेल कीं, मीं शस्त्र चांगलें तयार

केलें होतें म्हणून राजेसाहेब वांचले. त्यांचें अन्न शिजविणारा बटलर म्हणत असेल कीं, मी पथ्यापाण्याची चांगली तजवीज ठेवितों म्हणून राजेसाहेबांची प्रकृति बरी होत चालली आहे. त्यांचा आंथरूण घालणारा नोकर म्हणत असेल कीं, मी चांगल्या रीतीनें बिछाना तयार करितों म्हणून राजेसाहेबांना रात्रीची झोंप लागते. आणि प्रार्थना करणारे लोक म्हणतात कीं, आम्ही प्रार्थना करीत आहों म्हणून राजेसाहेबांना आराम पडत चालला आहे. अशा रीतीनें प्रत्येकजण आपल्या हक्काविषयीं खुशीत गाजरें खात असतील. परंतु सगळ्यापेक्षां वास्तविक आपलाच हक्क जास्त आहे असें प्रार्थनावाल्या लोकांना वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. म्हणून या प्रार्थनांचा खरोखरच कांहीं परिणाम झाला आहे कीं काय, ह्याबद्दल आपण थोडासा विचार करूं. ह्या प्रसंगीच्या प्रार्थनेचें सामान्य स्वरूप म्हटलें म्हणजे 'देवा, एडवर्डसाहेबांना आराम वाटूं दे,' अशाच अर्थाचें असलें पाहिजे. आतां हेंच प्रार्थनेचें सामान्य स्वरूप आहे, असें घेऊन आपण चाललों, तर ह्या प्रार्थनेचा दोघांशीं संबंध येतो. एक एडवर्डसाहेबांशीं आणि दुसरा देवाशी. कारण, ही प्रार्थना एडवर्डसाहेबांसंबंधानें आहे व ती देवाला उद्देशिलेली आहे, ह्याशिवाय तिसऱ्या कोणाच्या मनावर ह्या प्रार्थनेचा परिणाम होणें शक्य नाहीं. तेव्हां ह्या प्रार्थनेचा परिणाम अर्थात् एडवर्डसाहेब आणि देव ह्या दोघांच्या मनांवर कांहीं तरी झाला असला पाहिजे. त्यांपैकीं देवाच्या मनावर काय परिणाम झाला असेल ह्याबद्दलचा विचार आपण मागाहून करूं. प्रथमतः या प्रार्थनेचा एडवर्डसाहेबांच्या मनावर काय परिणाम होणें संभवनीय आहे हें आपण पाहूं.

एडवर्डसाहेबांच्या साम्राज्याचा विस्तार त्याच्या पूर्वजांनीं इतका दूरवर करून ठेविला आहे कीं, त्यामध्यें स्वाभाविकपणेंच अनेक धर्मांच्या लोकाचा समावेश झालेला आहे. ह्या सर्व लोकांनीं राजेसाहेबांच्या आरोग्यासाठीं प्रार्थना केल्या. ख्रिस्ती, ज्यूइश, मुसलमानी, बौद्ध, जैन, हिंदु वगैरे सर्व धर्मांतील लोकांनीं राजेसाहेबांना आराम पडावा म्हणून प्रार्थना केल्या. परंतु ह्या प्रार्थनांचा अर्थ काय ? ह्या प्रार्थनांचा उपयोग काय ? ह्या प्रार्थनांचा राजेसाहेबांच्या मनावर काय परिणाम झाला असेल ? ह्या प्रश्नांचे निकाल लावण्याकरितां निरनिराळ्या धर्मांतील लोकांनीं प्रार्थना केली म्हणजे काय केलें, हें आपण पाहूं. बौद्धधर्मी,

जैमधर्मी, हिंदुधर्मी वगैरे लोक हे मूर्तिपूजक आहेत ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. तेव्हां ह्या धर्मांतील लोकांनीं प्रार्थना केली म्हणजे काय केलें? ज्यामध्यें एखादी दगडाची मूर्ति मांडिलेली आहे अशा ठिकठिकाणच्या मोठमोठ्या देवळांतून या धर्माचे कांहीं लोक जमले असतील आणि त्यांपैकीं कोणी टाळ वाजविला असेल, कोणी तंबुरा वाजविला असेल, कोणी तबला वाजविला असेल, कोणी पेटी वाजविलेली असेल, कोणी गायिलें असेल, कोणी टाळ्या वाजविल्या असतील आणि कोणी बुक्का लाविला असेल. ह्या अनेक लहान लहान कृत्यांमिळून जें एक प्रार्थना म्हणून महत् कृत्य बनलें, त्याबद्दल एडवर्डसाहेबांना काय वाटलें असेल हें आतां आपण पाहूं. पण हें पाहूं लागण्याच्या पूर्वी आपण एक गोष्ट लक्षांत बाळगिली पाहिजे. आणि ती ही कीं, एडवर्ड ख्रिस्ती धर्मापैकीं प्रॉटेस्टंट पंथाचे आहेत. प्रॉटेस्टंट पंथाला मूर्तिपूजा कबूल नाहीं. प्रॉटेस्टंट मनुष्य देवाची मूर्ति म्हणजे दगड म्हणून मानतो. एखाद्या देवाची मूर्ति तांब्याची, पितळेची, चांदीची, सोन्याची, असली तर तो तांबें, पितळ, चांदी किंवा सोनें या धातूचा एक गोळा आहे असें तो मानील पण ह्याच्यापेक्षां जास्त किंमत तो त्याला देणार नाहीं. कोणत्याही प्रॉटेस्टंट मनुष्याला ह्याच्यापेक्षां जास्त किंमत देतांच यावयाची नाहीं. जर त्यानें एखाद्या दगडाला किंवा धातूच्या गोळ्याला देव म्हणून मानलें तर तो प्रॉटेस्टंटच नव्हे. त्यानें असें मानलें तर त्याला आपल्या धर्मापासून पतितच व्हावें लागेल.

ह्यावर कोणी अशी शंका काढील कीं, साहेब लोकांसंबंधानें हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण त्यांनीं हिंदुस्थानामध्यें पुष्कळ वेळां आपल्या देवांना मान दिलेला आढळून येतो. साहेब लोक एखाद्या देवळांत गेले तर ते मोठ्या अदबीनें दूर उभे राहतात व आपली पूज्यबुद्धि प्रदर्शित करण्याकरितां आपल्या डोक्यावरील टोपीही काढून हातामध्यें घेतात. साहेब लोक आपल्या देवांना इतका मान देत असतां ते देवळांतील देवांना दगड किंवा धातूचे गोळे समजतात, असें म्हणणें जुळत नाहीं. हा आक्षेप सकृद्दर्शनीं खरा आहेसा वाटतो. परंतु ह्याचा खोल विचार करून पाहिलें असतां हा आक्षेप भ्रममूलक आहे, अशी कोणाचीही खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं साहेब लोक देवळांत गेले असतां जो मान दाखवितात तो तेथील देवाला दाखवीत नाहींत. तो देव ज्या लोकांचें पूज्य दैवत आहे त्या लोकांचा तो मान आहे. देवळांतील सिंहासनावर उभ्या केलेल्या

दगडाला किंवा धातूच्या गोळ्याला ते देव मानतात असें बिलकुल नाहीं. त्यांच्या दृष्टीनें तो दगडच किंवा धातूचा गोळाच असतो. तर मग ते टोपी कां काढतात, असा प्रश्न येतो. पण ह्याचें कारण अगदीं निराळें आहे. त्यांना हिंदुस्थानांतील लोकांचीं मनें दुखवावयाचीं नाहींत. तेथें जो दगड उभा आहे तो देव आहे, व आपण टोपी काढली नाहीं तर त्याचें मन दुखवेल, म्हणून ते टोपी काढतात असें नव्हे. देवाच्या मनापेक्षां लोकांच्या मनाला राग न यावा यासाठीं साहेब लोक जास्त दक्ष असतात. हिंदुस्थानांत आपलें राज्य राहावें व शुष्क कारणां-साठीं आपण तें गमवूं नये अशी त्यांची इच्छा आहे, व त्यासाठीं ही युक्ति आहे. औरंगजेब बादशहासारखी आपली हिंदुस्थानांतील बादशाही त्यांना घालवावयाची नाहीं म्हणून हा थोडासा सामोपचाराचा प्रकार आहे. आपले दगड हे त्यांना देव वाटतात म्हणून ते आपल्या धर्मांत हात घालीत नाहींत असें नाहीं. तर आपल्यापासून त्यांना कर वसूल करावयाचे आहेत व हिंदु-स्थानांतील पैसा त्यांना अजून विलायतेला न्यावयाचा आहे म्हणून ते आपल्या धर्मांत हात घालीत नाहींत, हें आपण नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे. तुळजा-पुरची देवी आणि पंढरपुरचा विठोबा ह्यांची अफझुलखानाला जी किंमत वाटत होती त्याच्यापेक्षां जास्त साहेब लोकांना वाटत आहे असें नाही. परंतु अफझुलखान आचरट होता आणि हे धोरणी आहेत, एवढाच काय तो फरक. पण हा फरकच आज आपल्या पथ्यावर आहे. व ह्याबद्दल साहेब लोकांचे आपण आभार मानिले पाहिजेत. साहेब लोक आपल्या देवळांतून येतात ते आपल्याला तेथें परमेश्वराचें दर्शन होतें म्हणून येतात असें नव्हे. ते सीनरी पहाण्याकरितां येतील, देवळांतील कारागिरीच्या कामाचें आश्चर्य करण्या-करितां येतील, हवा खाण्याकरितां येतील, वाटेल त्यासाठीं येतील. पण देव-दर्शनासाठीं म्हणून आपल्या देवालयामध्यें ते कालत्रयींदेखील यावयाचे नाहींत.

ह्या वर दिलेल्या व इतरही अनेक प्रमाणांवरून आपण ज्यांना देव मानतों त्यांना साहेब लोक अंतःकरणांतून दगड मानतात, हें अगदीं उघड होतें. बौद्ध, जैन किंवा हिंदु लोकांच्या देवांबद्दल प्रॉटेस्टंट साहेब लोकांची काय कल्पना असली पाहिजे हें यावरून उघड होत आहे व एडवर्डसाहेब प्रॉटेस्टंट पंथाचे आहेत हें वर सांगितलेंच आहे तेव्हां त्यांचीही अशीच कल्पना असली पाहिजे हें उघड सिद्ध होतें. तेव्हां त्यांना आपल्यांसाठीं बौद्ध, जैन व हिंदु

धर्मातील लोक प्रार्थना करीत आहेत असें ऐकून काय बरें वाटेल ? एखाद्या दगडासमोर उभें राहून टाळ आणि मृदंग वाजविणारे हे लोक वेडपे असले पाहिजेत असें त्यांच्या धर्माच्या दृष्टीनें त्यांना वाटणार नाहीं काय ? त्यांचें सौजन्य त्यांच्या तोंडून असें स्पष्ट न वदवो. परंतु त्यांच्या धर्माप्रमाणें हें असेंच असलें पाहिजे. एखाद्या दगडासमोर टाळ, मृदग आणि टाळ्या ह्यांचा कलकलाट उसळून देणें हा प्रॉटेस्टंट पंथांतील लोकांच्या दृष्टीनें प्रार्थना नसून केवळ वेडपणाचें प्रदर्शनच आहे, असें सिद्ध होत नाहीं काय ?

असल्या प्रार्थना ह्या ख्रिस्ती धर्मातील लोकांच्या दृष्टीनें प्रार्थना नसून कांहीं तरी खुळचटपणा आहे असें मानण्याला आणखी एक कारण आहे. देवळांत जमून प्रार्थना करण्याची चाल ही मूळची ख्रिस्ती धर्मातील. तिचें हल्लीं आम्ही अनुकरण करीत आहों. आमच्यामध्यें जर कांहीं सार्वजनिक संकट प्राप्त झालें तर त्या प्रसंगीं रुद्राचीं आवर्तनें वगैरे करण्याचा संप्रदाय आहे. आपल्या इकडे पूर्वीं कोणी राजे आजारी पडले नव्हते असें नाहीं. पण त्यांच्या वेळीं सर्वांनी, बूट, स्टाकिंग, विजार, पाटलुणी घालून देवळांत येऊन कथा करविल्याचा वगैरे कोठेंही उल्लेख नाहीं. पाऊस पडेनासा झाला किंवा अशीच कांहीं दुसरी आपत्ति सर्व लोकांवर आली तर पवित्र ब्राह्मण पवित्र संकल्प करून पवित्र हेतूसाठीं अनुष्ठानाला बसतात. परंतु अशा प्रसंगीं कथेचा संप्रदाय नाहीं. कथा म्हणजे हरिकीर्तन होय. आणि हरिकीर्तन म्हणजे हरिकीर्तनच; तें मनुष्यकीर्तन नव्हे. अलीकडे राणीसाहेबांची ज्युबिली आली करा कथा, राजेसाहेबांचें राज्यारोहण आलें करा कथा, आणि राजेसाहेब आजारी पडले तरीही करा कथाच, असा संप्रदाय पडत चालला आहे. पण हें मनुष्यकीर्तन होतें हरिकीर्तन होत नाहीं. तुकाराम आणि नामदेव ह्यांनीं ज्या कीर्तनांची सुरुवात केली तीं मनुष्यांचीं कीर्तनें नव्हतीं, तीं ज्युबिली उत्सवाचीं कीर्तनें नव्हतीं, हरीची कीर्तनें होतीं. त्या तुकारामाचे आणि नामदेवाचे अनुयायी म्हणून आपल्याला मानणारे हल्लींचे हरिदास हरिकीर्तनाचा मनुष्यकीर्तनाकडे उपयोग करून मूळचे हरिदास जन्मून आपल्याला मनुष्यदास बनवून घेत आहेत ! कोणी चिदागी देतों म्हटलें कीं हरिदास उठलाच कथा करावयाला ! ह्यामध्यें पूर्वींच्या आपल्या संप्रदायाला विरोध येतो इतकेंच नव्हे, तर असल्या ह्या कीर्तनांमधून निर्लज्जपणाचाही दोष उत्पन्न होतो. सार्व-

जनिक प्रार्थना करण्याची ख्रिस्ती लोकांची चाल असल्यामुळें निरनिराळ्या प्रसंगांकरितां अनुरूप अशीं त्यांच्या धर्मपुस्तकांतील गीतें ठरवून ठेवलेलीं असतात. आपल्या वेदांतील कोणत्या ऋचा किंवा कोणतीं सूक्तें कोठें म्हणावीं ह्याच्याबद्दल कल्पसूत्रादिकांमधून ज्याप्रमाणें नियम करून ठेवलेले आहेत, त्याप्रमाणेंच त्यांच्यामध्येंही व्यवस्था आहे. व शिवाय अमुक प्रसंगीं कोणतीं अनुरूप गीतें गाऊन प्रार्थना करावी हें त्यांचे धर्माधिकारी सर्वांच्या माहिती-करितां प्रसिद्ध करीत असतात, त्यामुळें त्यांची प्रार्थना योग्य असते. परंतु आपलें तसें होत नाहीं. कोणी तरी झालेला किंवा होणारा रावबहादुर किंवा रावसाहेब किंवा निदान एखादा ऑनररी मॅजिस्ट्रेट एखाद्या बुभुक्षित हरिदासाला बोलावून आणतो आणि सांगतो कीं, " राजेसाहेब आजारी पडले आहेत, आतांच्या आतां सगळ्यांच्या आधीं आपल्या कीर्तनाची तार टाइम्सकडे गेली पाहिजे, बिदागी इतर ठिकाणीं दहा मिळत असली तर येथें पंधरा मिळेल ! " बिचारा रात्रीचीं उपोषणें करीत असलेला हरिदास होय म्हणतो आणि शुक-रंभासंवादाचें आख्यान लावितो ! किती हा विसंगतपणा ! प्राप्त झालेला प्रसंग आणि लाविलेलें आख्यान ह्यांच्यामध्यें कांहीं तरी संबंध आहे काय ? वास्त-विक पाहिलें तर असल्या कीर्तनांचा प्राप्त झालेल्या प्रसंगाशी निदान अर्थ-वादाचा तरी संबंध असावा. पण तो असतो आहे कोठें ! व तो असणें शक्यही नाहीं. सारांश, प्राप्त झालेल्या प्रसंगाच्या दृष्टीनें पाहिलें असतां असलीं कीर्तनें म्हणजे निव्वळ बडबड होते, ती धड प्रार्थनाही होत नाहीं, आणि हरिकीर्तनही होत नाहीं; कारण, या दोहोंपैकीं कोणत्याही एका गोष्टीसंबंधानें त्याच्या ठिकाणीं अनुरूपता नसते. अशा प्रकारची अननुरूप बडबड करण्याला कोणी हर-दामानें आपलें तोंड दोनतीन तासपर्यंत भाड्यानें द्यावें ही समजदार मनुष्याला मोठी लाजिरवाणी गोष्ट आहे. सामान्य युक्तीच्या दृष्टीनें असलें कीर्तन म्हणजे तालसुरावरची एक बडबड होय, हें पाहिजे त्या मनुष्याच्या लक्षांत येण्या-सारखें आहे. त्याचप्रमाणें तें एडवर्डसाहेबांच्या लक्षांत येणें अशक्य नाहीं. व असें त्यांच्या लक्षांत आलें तर त्यांना ह्या प्रार्थनेबद्दल काय वाटेल ? एखाद्या दगडासमोर निरर्थक बडबड करणें असा ह्या ख्रिस्ती धर्माच्या दृष्टीनें प्रार्थने-चा अर्थ होतो. आणि दगडासमोरील बडबडीला प्रार्थना असें कोणी म्हण-णार नाहीं. मग एडवर्डसाहेबांला तरी ती प्रार्थना म्हणून कशी वाटेल ?

त्यांच्या दृष्टीला हा सगळा खुळचटपणाच दिसणार. आणि असला खुळचट-पणा दाखविण्याला कारणीभूत होण्यांत आपण पुरुषार्थ मानून घेतों हें चांगलें नव्हे. आपण अशा प्रसंगीं राजनिष्ठा जरूर दाखवावी. पण ती दाखवितांना आपण आपला खुळचटपणाही दाखवावा असें कोठेंही शास्त्र नाहीं. एखाद्या गुळगुळीत, तकतकीत, किंवा रंगविलेल्या दगडापुढें कांहीं लोकांनीं गलबला केला, म्हणजे त्या गलबल्यानें आपल्या गळवाची जखम भरून येईल असें या विसाव्या शतकामध्यें मानणारा विलायतेमध्यें एकादा भिकारीही मिळावयाचा नाहीं; मग एडवर्डसाहेबांची गोष्ट कशाला पाहिजे !

काणी म्हणेल कीं देवळांतील दगड हा दगड नसून देव आहे, व त्या दग-डाच्या मधून हरिदास विष्णु, शंकर इत्यादिकांना हांका मारूं शकतो. हें म्हणणें हिंदुधर्मातील लोकांसंबंधानें ठीक आहे; पण ख्रिस्ती धर्मातील मनुष्यांना ह्या म्हणण्याचा काय उपयोग ! त्यांना विष्णु, शंकर आणि दगड हे सगळे सारखेच. त्यांच्या दृष्टीनें एक येशुख्रिस्तच मनुष्यांची प्रार्थना ऐकण्याला आणि परिपूर्ण करण्याला समर्थ आहे. बाकी सब झूट आहे. ते विष्णुबिष्णु कोणी जाणत नाहींत. आणि त्यांच्या दृष्टानें विष्णु, शंकर, विठोबा हे जर देवच नव्हेत तर तुमच्या हरिदासानें त्यांना छपन्न हजार हांका मारल्या म्हणून काय व्हावयाचें आहे ? हरिदासानें हाका मारल्या तर तो विनाकारण आपला कंठ कोरडा करून घेत आहे असेंच त्याच्याबद्दल ख्रिस्ती लोक म्हणणार. असल्या उपहासाला आपल्याला पात्र करून घेण्यामध्यें कोणाला तरी भूषण वाटावें काय ? आपल्या राजासंबंधानें राजनिष्ठा प्रदर्शित करण्यामध्यें आपल्याला जरूर भूषण वाटलें पाहिजे. परंतु तसें करतांना इतर धर्मातील लोकांच्या दृष्टीनें आपण उपहासास्पदतेलाही गेलेंच पाहिजे असें नाहीं. म्हणून अशा प्रसंगीं अनुरूप अशाच गोष्टी करणें जरूर आहे.

परंतु येथें ख्रिस्ती धर्मातील मनुष्यांना विचारण्यासारखा एक प्रश्न उत्पन्न होतो. कोठल्याशा एका वर्तमानपत्रामध्यें असें प्रसिद्ध झालें होतें कीं राजेसाहेबांच्या आरोग्यासाठी कोल्हापुरास देवीच्या देवळामध्यें भजन-कीर्तन वगैरे चाललें होतें. तें पाहण्याकरतां कोणी युरोपियन गृहस्थ तेथें आले होते. ते तेथील प्रकार पाहून फार खूष झाले. ख्रिस्ती लोकांच्या असल्या ह्या वर्तना-

मध्येंही विसंगतपणा दिसून येतो. हिंदु देवांची आराधना करून ख्रिस्ती मनुष्याच्या प्रकृतीला आराम वाटेल असें कोणी ख्रिस्ती मनुष्य मानतो कीं काय, असा प्रश्न आहे, जर हिंदु देवांच्या आराधनेनें ख्रिस्ती मनुष्याच्या प्रकृतीला आराम वाटेल असें ख्रिस्ती लोक मानीत असतील तर हिंदु देवांच्यामध्यें कांहीं सामर्थ्य आहे, तो धर्म खरा आहे, त्याची निंदा करणें बरोबर नाहीं, त्या धर्मांतील लोक पतितच आहेत असें नाहीं, व त्यांचा उद्धार करण्याकरितां त्यांना बाटवून ख्रिस्तीधर्मांतच आणिलें पाहिजे असें नाहीं, ह्या गोष्टी ख्रिस्ती लोकांना मान्य करणें भाग आहे. परंतु हिंदु देवांच्या आराधनेनें ख्रिस्ती मनुष्याच्या प्रकृतीला आराम वाटेल असें ख्रिस्ती लोक मानीत नसतील तर हिंदूंनीं केलेल्या प्रार्थनेबद्दलचें ख्रिस्ती धर्मांतील लोकांनीं केलेलें गौरव हें खोटें असलें पाहिजे. हिंदु लोकांनीं केलेल्या प्रार्थनेच्या उपयुक्ततेबद्दल मनांतून यत्किंचितही महत्त्व नसतां बाहेरून मात्र खोटा आनंद प्रदर्शित करण्यांत येत असला पाहिजे. ह्या दोहोंपैकीं एक कोणती तरी गोष्ट कबूल केल्यावांचून ख्रिस्ती लोकांची सुटका नाहीं. अन्य प्रसंगीं हिंदु देवांची निंदा करावयाची आणि राजा आजारी पडला असतां हिंदु लोकांनीं हिंदु देवांची प्रार्थना केली म्हणजे त्या प्रार्थनेचें अभिनंदन करावयाचें ह्या वर्तुणुकींतील दुटप्पीपणा, खोडसाळपणा अथवा विसंगतपणा हा एका ख्रिस्ती लोकांनाच क्षम्य आहे.

येथपर्यंत हिंदु, बौद्ध, जैन वगैरे मूर्तिपूजक लोकांच्या प्रार्थनेचा विचार झाला. व ह्यावरून प्रॉटेस्टंट पंथांतील मताप्रमाणें एखाद्या दगडापुढें केलेल्या साध्या किंवा संगीत कलकलाटांचा राजेसाहेबांच्या मनावर किंवा जखमेवर, खरें बोलावयाचें असेल तर, कांहीं परिणाम होण्याचा संभव आहे असें दिसत नाहीं. आतां बाकी जे धर्म राहिले आहेत त्यांच्याबद्दल विचार करतां त्यांच्या मध्येंही अशाच प्रकारचे दोष उद्भवतात. मुसलमानी, यहुदी आणि ख्रिस्ती ह्या धर्मांमध्यें बरेंच साम्य आहे. तरी त्यांच्यामध्यें साम्यापेक्षां हल्लीं वैषम्यच जास्त आहे. ह्या तिन्ही धर्मांचा कांहीं पूर्वभाग एकच आहे. तरी पण देवानें अभिवचन दिलेला 'प्रॉफेट' कोण ह्याच्याबद्दल ह्या तिन्ही धर्मांतील लोकांमध्यें मतभेद उत्पन्न होऊन ते एकमेकांपासून अगदीं विभक्त झालेले आहेत. मुसलमानांच्या मतानें महमद पैगंबर हा जगाचें तारण करण्याकरतां आला, परंतु ख्रिस्ती लोक त्याला मानीत नाहींत. त्यांच्या मतानें

ख्राइस्ट हाच खरा पैगंबर होय. असें जर आहे तर मुसलमानांच्या प्रार्थनेपासून तरी ख्रिस्ती धर्मातील मनुष्याला काय फायदा ? मुसलमान प्रार्थना करणार म्हणजे काय ? ते आपल्या महंमद पैगंबराशीं राजाला आरोग्य देण्याविषयीं रदबदली करणार. परंतु राजा जर आपल्याला आरोग्य देण्याचें काम महंमद पैगंबराकडे नाहीं, असेंच मानीत असेल तर मग मुसलमानांच्या प्रार्थनेचा तरी उपयोग काय ? ह्याशिवाय हिंदु धर्मातील प्रार्थनेसंबंधानें जे आक्षेप वर घेण्यांत आले आहेत ते मुसलमानी धर्मातील प्रार्थनेवरही आल्यावांचून राहावयाचे नाहींत. परंतु त्यांचें सविस्तर निरूपण स्थलसंकोचास्तव शक्य नसल्यामुळें त्यांचा अतिदेश करून व इतर धर्मांबद्दलही अशीच स्थिती आहे हें लक्षांत बाळगून आपण आतां दुसऱ्या मुद्द्याकडे वळूं.

राजेसाहेबांच्या मनावर असल्या असंमत धर्मातील प्रार्थनांचा काय परिणाम होणें स्वाभाविक आहे ह्याच्याबद्दल आपण एवढा वेळपर्यंत विचार केला. आतां देवाच्या या प्रार्थनांचा कांहीं परिणाम होणें शक्य आहे किंवा नाहीं, हें आपण पाहूं. पूर्वींचा प्रश्न धर्मसंबंधींचा होता, परंतु हल्लींचा प्रश्न तत्त्वज्ञानाचा आहे, शास्त्राचा आहे. तत्त्वज्ञानासंबंधींही अनेक शास्त्रें आहेत आणि अनेक मतें आहेत. त्यांतील सर्वांचे सिद्धान्त सारखेच आहेत असें नाहीं. त्यामुळें ह्या प्रश्नासंबंधानें एकवाक्यता होणें शक्य नाहीं. सर्व शास्त्रांतील सिद्धान्ताप्रमाणें परमेश्वराची उपासना करावी, आराधना करावी, प्रार्थना करावी हें अगदीं उचित आहे. पण त्याच्याचबरोबर सर्व शास्त्रें असेंही सांगतात कीं, सर्व उपासना निष्काम असावी. सकाम प्रार्थना कोणी करीत नाहींत असें नाहीं, परंतु निष्काम उपासना करावी असें शास्त्रांनी सांगण्यामध्यें एक मुद्दा आहे. प्रत्येक मनुष्य हा आपआपल्या कर्मानें बद्ध झालेला आहे. त्याला पूर्वकर्मानुरूप सुखदुःखादिकांचा भोग मिळत असतो. पूर्वींचीं कोणाचीं चांगलीं कर्में असलीं आणि त्याबद्दल त्याला चांगलें फळ मिळूं नये म्हणून कोणी प्रार्थना केली तरी त्याला चांगलें फळ मिळाल्यावांचून राहत नाहीं. त्याप्रमाणेंच दुःखाचीही गोष्ट आहे. सारांश, मनुष्य हा कर्मबद्ध असल्यामुळें तेथें रदबदलीचा, वशिल्याचा किंवा भीडभाडेचा फारसा उपयोग होत नाहीं. रदबदली ही मनुष्यापाशीं चालते; देवापाशीं तिचा काय उपयोग ? शिवाय अशा प्रसंगीं प्रार्थना हें जरी चांगलें कर्म असलें तरी तें दुसऱ्याचें कर्म होय. कर्म हें ज्याचें त्याला. 'अ' नें

प्रार्थना केली तर त्याचें फळ 'अ' लाच मिळणार. 'ब' ला कसें मिळावें ? एकानें कष्ट करावे आणि त्याच्यावर दुसऱ्यांनीं श्रीमंत व्हावें, असला प्रकार जो पृथ्वीवरील कांहीं देशांत चालतो तो आकाशांतील देशांत चालत नाहीं, इत्यादि कर्मसंबंधीं अनेक आदिसिद्धान्त ठरले गेलेले असल्यामुळेंच निष्काम उपासना करावी असें शास्त्रकारांना प्रतिपादन करणें भाग पडलेलें आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां असल्या प्रार्थनांचा देवाच्या मनावरही फारसा परिणाम होत असेल असें दिसत नाहीं आजपर्यंत पुष्कळ राजे होऊन गेले. व त्यांत कित्येक साम्राज्यवालेहीं असतील व त्यांच्या पदरीं कोणी तोंडपुजे नसतील असें नाहीं. किंवा त्यांची प्रजा त्यांच्यावर प्रेम करीत नव्हती असेंही नाहीं. तेव्हां जर असल्या प्रार्थनांचे कांहीं परिणाम होत असते तर त्यांनीं खात्रीनें आपले प्रियकर राजे मरूं दिले नसते. जर असल्या प्रार्थनेचा वशिला देवापाशीं चालता तर आजपर्यंत कोणीही आजारी पडला किंवा मरणही पावला नसता. पण तसें होत नाहीं. ह्यावरून असल्या प्रार्थनांचा देवाच्या मनावर कितपत परिणाम होतो हेंही उघड दिसून येत आहे

शिवाय देव रदबदली ऐकतो असाही एक पक्ष जो आहे तो क्षणभर घेऊन आपण चाललों तरी असा प्रश्न येतो कीं, देव रदबदली कोणाची ऐकतो ? आपल्याच निस्सीम भक्ताची रदबदली देव कदाचित् ऐकेल ! पण देवाचें अस्तित्व नाशाबीत करण्यासाठींच ज्यांची जिव्हा आणि नास्तिकपणाचीं तत्त्वें सांठवून ठेवण्यासाठींच ज्यांचीं अंतःकरणें त्यांच्याही रदबदलीला देवानें मान द्यावा ? देवाची आणि ज्यांची कित्येक वर्षांत गांठ नाहीं ते संकटसमयीं तबला वाजवूं लागल्या बरोबर देवानें कळवळून धांव घ्यावी ? दुसऱ्यांच्या गरिबीवर ज्यांची श्रीमंती, दुसऱ्यांच्या उपासमारीवर ज्यांच्या मेजवान्या आणि दुसऱ्यांच्या भोळेपणावर ज्यांची सत्ता असे लोक प्रसंगापुरतें ढोंग करून देवाचा धांवा करूं लागल्याबरोबर असल्या लोकांच्यासाठींही त्यानें आपल्या सृष्टीचे, कर्मांचे, पापपुण्याचे, न्याया-न्यायाचे वगैरे सर्व नियम गुंडाळून ठेऊन धांव मारीत यावें ? देव आला तर तो पाहिजेच आहे. साधारण विचारानें पाहिलें तर मोलानें रडावयाला घेतलेल्या ठिकाणीं तो येईल असें दिसत नाहीं. सारांश, आपल्या प्रार्थनांचा राजेसाहेबां-च्या किंवा देवाच्या कोणाच्याच मनावर तादृश परिणाम होत असल्याचें ह्या परीक्षणावरून दिसून येत नाहीं. निष्काम बुद्धीनें परमेश्वराची प्रार्थना करणें हा

मनुष्याचा धर्म आहे, व आपल्या राजाच्या आरोग्यासाठीं खटपट करणें हा त्या राजाच्या प्रजेचा धर्म आहे. त्याप्रमाणें आपण आपल्या राजेसाहेबांच्या स्वास्थ्यासाठीं प्रार्थनादिक शिष्टसंप्रदाय करणें अत्यंत आवश्यक आहे परंतु धर्मदृष्ट्या किंवा शास्त्रदृष्ट्या त्याचा फारसा उपयोग होईल असें नाहीं. राजकीयदृष्ट्या असले प्रयत्न आवश्यक आहेत. म्हणून ते अवश्य करावेत. परंतु धर्मदृष्ट्या किंवा शास्त्रदृष्ट्या त्यांमध्यें कांहीं विशेष उपयुक्ततेचा भाग असेल असें विचाराअंती दिसून येत नाहीं.

तेव्हां राजेसाहेबांच्या प्रकृतीला आज जो आराम वाटत आहे तो सर्वत्र झालेल्या प्रार्थनांचा परिणाम आहे, असें सहसा म्हणतां यावयाचें नाहीं. तो राजेसाहेबांच्या पूर्व सुकृताचा व डाक्तरांच्या स्वकार्यकुशलतेचा परिणाम आहे. परंतु हा झालेला परिणाम कोणापासूनही झालेला असला तरी त्याबद्दल वाद करण्यांत विशेष अर्थ नाहीं. राजेसाहेबांची प्रकृति सुधारत चालली आहे, ही आज मुख्य मुद्द्याची गोष्ट आहे व त्याबद्दल सर्वांना सारखाच आनंद वाटेल ह्याबद्दल शंका नाहीं. असाच त्यांना उत्तरोत्तर आराम वाटत जाऊन अंतरलेला राज्यारोहणसमारंभ फिरून साजरा व्हावा हीच सर्वांची—आणि विशेषेंकरून जागयाचें भाडें बुडत असलेल्या विलायतेंतील लोकांचा इच्छा आहे.

---

# उत्प्रेक्षेसाठीं अर्थान्तरन्यास : : : ७

काळ : अग्रलेख ता. २५।७।१९०२

★ ग्रंथमालाकारही आश्रयदात्याच्या मायावी मानाला भाळले.

ग्वाल्हेर आणि कोल्हापूर येथील महाराजांस एल्एल्. डी. चे किताब केंब्रिज युनिव्हर्सिटीनें दिल्याची बातमी हिंदुस्थानांत प्रसिद्ध झाल्यापासून ह्या किताबाबद्दल इकडील लोकांना बरेंच आश्चर्य वाटत आहे. परंतु त्या सगळ्यांचें समाधान करण्याकरतां जून महिन्यांतली ग्रंथमाला पुढें आली आहे. व ह्या दोन महाराजांना ही पदवी कां देण्यांत आली या गोष्टीबद्दल जेवढीं शक्य आणि अशक्य कारणें होतीं तीं सगळीं तिनें सारभूतच आहेत असें समजून आपल्या संग्रहालयामध्यें प्रदर्शनासाठीं जगाच्या पुढें मांडलीं आहेत. अप्रयुक्त शब्दांनीं वेड्यावांकड्या वाक्यरचनेनें दुर्बोध भाषेमध्यें बहुतेक ' कॉपी टु कॉपी 'चे भारदस्त लेख लिहिण्यापलीकडे ग्रंथमालेची धांव अजूनपर्यंत फारशी जात नसे. परंतु ज्यांच्या महनीय आश्रयच्छ ( छ नव्हे ) त्राखालीं ग्रंथमाला प्रसिद्ध होत असते त्या श्रीमंत महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर ह्यांना एल्एल्. डी. ची पदवी मिळाली असून त्याबद्दल जग आनंदप्रदर्शन न करितां उलट साशंक होत आहे असें पाहून जगाची खात्री करण्याकरितां ग्रंथमालेला आपला नेहमींचा व्यवसाय सोडून थोडीशी वांकडी वाट करून पुढें येणें भाग पडलें आहे. ज्यांच्या आश्रयाच्या छत्रीखालीं ( मग तो आश्रय चालू असो किंवा बंद असो) ग्रंथमालेला पावसापाण्याची भीति नाहीं, त्यांच्याबद्दल कैवार घेण्यासाठीं तिनें

पुढें येणें हें अगदीं रास्तच आहे. कोल्हापूरचे महाराज हे हिंदुस्थानांतील ए राजे आहेत. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां त्यांचा जर कोठें खरा गौर झाला तर त्याबद्दल ग्रंथमालेलाच काय, परंतु हिंदुस्थानांतील प्रत्येः मनुष्याला आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. परंतु हल्लीं इंग्लंडांत आमच्य राजांना जे मानमरातब मिळत आहेत त्यांच्याबद्दल मात्र हिंदुस्थानांती लोकांनीं आनंद मानतेवेळीं फार सावध असलें पाहिजे राजकीय दृष्टचा पाहि तर हे खरे मान नसतात. म्हणून असला शिंपेचा तुकडा एखाद्यानें आपल्य अंगावर फेंकल्याबरोबर आमच्या अंगामध्यें तसे अलौकिक गुण होते म्हणू आम्हांला हें रुप्याचें पदक त्यांनीं नजर केलें असें बडबडत सुटणें शहाणपणाचें नव्हे. अशा गोष्टींमध्यें राजकीय हेतु असतात ही गोष्ट आपण भोळसर नेटिव लोक पुष्कळ वेळां विसरतों. परंतु इंग्रजांचें धोरण कांहीं निराळेंच असतें. आणि आंवळा देऊन कोहळा काढणारांना असें धोरण ठेवावेंच लागतें. अशा प्रसंगी त्यांनीं दिलेल्या देणग्यांची खरी किंमत ओळखण्याला आपण फार दक्ष असलें पाहिजे. त्यांनीं आपल्या पदरामध्यें एखादी गारगोटी बांधावी, आणि तो चिंता मणि आहे असें समजून हा चिंतामणि त्यांनीं आपल्या पदरामध्यें बांधिला त्य अर्थीं आपल्यामध्यें आपल्याला अजूनपर्यंत माहीत नाहींत असे कांहीं तरी अजब गुण असले पाहिजेत असें वाटून मग आपल्या त्या गुणांचा तपास करण्याकरितां आपले हात, पाय, नाक, कान इत्यादिकांची लांबी रुंदी आपण मोजूं लागावें, हें धूर्तपणाचें लक्षण नव्हे. उत्प्रेक्षेचें अर्थान्तरन्यासानें समर्थन करण्याप्रमाणेंच कोल्हापुरच्या महाराजांना मिळालेल्या मायावी मानाबद्दलची कारणें सांगण्याचा ग्रंथमालेनें प्रयत्न केलेला आहे. असलीं कारणें आपलें कार्य कितपत सिद्ध करूं शकतात हें आम्हीं सांगावयाला पाहिजे असें नाहीं. परंतु ग्रंथमालेंतील अनेक बायफळ कारणांपैकीं एक तर फारच मासलेवाईक आहे. कोल्हापुरच्या महाराजांना एल्एल. डी. ची पदवी कां मिळाली माहीत आहे ? “ हिंदुस्थानांतून आलेल्या राजेरजवाड्यांची यादी वाचली म्हणजे श्रीशिवाजी महाराजांच्या वंशांतील कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याची उत्कंठा झालीच पाहिजे. ज्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्या शूर व पाणीदार लोकांच्या राज्याचा संस्थापक शिवाजी होता व त्याचा वंश अद्यापि सुरू आहे कीं नाहीं अशी चौकसबुद्धि-नाहीं असा एकहि इंग्रज नसेल ( असेल

कीं नसेल ! ) असें आम्हांस वाटतें. त्या यादींत आमच्या महाराजसरकारांचें नांव सांपडल्याबरोबर त्यांचे मनांत सानंद आदर उत्पन्न होणें साहजिक आहे. अशा पिढीजाद् गादीचा आपण बहुमान करावा असें केंब्रिजच्या लोकांस वाटल्यावांचून राहणें शक्य नाहीं. " म्हणून कोल्हापुरचे महाराज एल्एल्. डी. झाले ! कसें कसें ? शिवाजी महाराजाच्या वंशांतील कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याची उत्कंठा झाली ! ती कां झाली, तर ज्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्या शूर व पाणीदार लोकांच्या राज्याचा संस्थापक शिवाजी होता ! यादींत ग्रथमालेच्या महाराजसरकाराचें नांव सांपडलें ! त्याबरोबर इंग्लिशांच्या मनांत सानंद आदर उत्पन्न झाला ! आणि अशा पिढीजाद् गादीचा आपण बहुमान करावा असें केंब्रिजच्या लोकांना वाटलें ! अगदीं बरोबर वाटलें !

आतां ह्या कारणपरंपरेमध्यें तथ्य कितपत आहे हें आपण पाहूं. इंग्लिश लोकांनीं शिवाजीला लुटारू तर म्हटलें आहे, दरवडेखोर तर म्हटलें आहे, वाटमाऱ्या लोकांचा पुढारी म्हणून तर म्हटलें आहे, जवढें कांहीं त्याच्याबद्दल वाईट म्हणून म्हणतां येण्यासारखें होतें तेवढें सर्व म्हटलें आहे. आणि तेंही कोणी तरी गोमाजींनीं किंवा सोमाजींनीं म्हटलेलें नव्हे. इंग्लंडमधील प्रतिष्ठित ग्रंथकारांनीं—ज्यांचे ग्रंथ केंब्रिजसारख्या युनिव्हर्सिटींतून महत्त्वाचे मानिले जातात अशा ग्रंथकारांनीं—शिवाजीबद्दल आपली सानंद आदरबुद्धि अशा रीतीनें व्यक्त केलेली आहे. शिवाजीबद्दलचे धडे इकडील क्रमिक पुस्तकांतून असलेले काढून टाकण्यांत आले आहेत. शिवाजीचे उत्सव होऊं लागल्याबरोबर तळव्याची आग मस्तकाला जाऊं लागते. कलकत्त्यास कोणी शिवाजीउत्सव सुरू करूं लागले तर तेथील बाबूंना ' मराठा डिच 'ची आठवण करून देऊन शिवाजीउत्सवापासून त्यांचें परावर्तन करण्याचा मनापासून प्रयत्न करण्यांत येतो. इतका शिवाजीबद्दल इंग्लिशांच्या मनामध्यें आदर असल्यामुळें त्याच्या वंशांतील राजाचा आपण बहुमान केलाच पाहिजे असें त्यांना कसें बरें वाटणार नाहीं ! त्याचा मान करीपर्यंत इंग्रजांना जेवण देखील गोड लागलें नसेल ! शिवाजीच्याबद्दल ग्रंथमालेच्या मतानें आणखीही एक शिफारस आहे. " ज्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्या शूर व पाणीदार लोकांच्या राज्याचा संस्थापक शिवाजी होता ! " सर्वांना त्याच्याबद्दल आदर वाटावा

इतका शिवाजी कां मोठा ? तर त्यानें ज्या लोकांचें राज्य स्थापिलें त्यांनीं हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांच्या हवालीं केलें म्हणून ! हा कार्यकारणभाव सामान्य बुद्धीच्या लोकांना समजण्याला जरा जड जाण्यासारखाच आहे. आणि शिवाजीनें ज्यांचें राज्य स्थापून दिलें ते लोक शूर व पाणीदार कां? तर त्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें ! जे लोक आपल्या देशाचें स्वामित्व दुसऱ्यांच्या हवालीं करितात ते लोक शूर ! आणि ते लोक पाणीदार ! ज्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्यांना शूर व पाणीदार हीं विशेषणें ! हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांच्या हातीं दिलें म्हणून शूर आणि पाणीदार हीं विशेषणें ! हिंदुस्थानचें स्वामित्व दुसऱ्यांच्या हवालीं करणें यांत शूरत्व व पाणीदारपणा आहे ! असलीं खोटीं विशेषणें, असलीं खोटीं वाक्यें, असली खोटी भाषा आणि असल्या खोट्या कल्पना ह्यांनीं कोणत्याही राष्ट्राचें कधींही खरें कल्याण व्हावयाचें नाहीं. त्या पवित्र शिवाजीच्या वंशजांच्या राजधानीमध्यें किंवा देशामध्यें जर कोणाच्या डोक्यांत असल्या खोट्या कल्पना असल्या तर त्या काढून टाकण्याविषयीं प्रत्येकानें झटलें पाहिजे. असल्या खोट्या भाषेचा आणि कल्पनांचा प्रसार करून कोणतें-ही खरें हित साधावयाचें नाहीं. आपण सहज भुरळतों, मोहांत पडतों, मृग-जळांत बुडतों आणि मायेच्या बाजारांत फसले जातों, हें चांगलें नव्हे. इंडि-यन राजांना हल्लीं कितपत मान आहे, हें आपल्या सगळ्यांना ठाऊक आहे ! पाहुणचाराचा खर्च हिंदुस्थानावर लादून हिंदुस्थानांतील राजांचा इंग्लंडमध्यें किती सन्मान होत आहे, ह्याचें उदाहरण प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांपुढें आज आहे ! हल्लींच्या कोल्हापुरच्या शाहू छत्रपति महाराजांच्या आधींच्या छत्रपति महाराजांचे कोल्हापुरच्या शहरांत, दौंडच्या स्टेशनवर आणि नगरच्या किल्ल्यांत काय काय मानपान झाले—ज्यांच्यापासून हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांना प्राप्त झालें त्या शूर व पाणीदार लोकांच्या राज्याचा संस्थापक जो शिवाजी त्याच्या पिढीजाद गादीचे मानपान इ. स. १८८० च्या सुमारास काय काय झाले—ह्या गोष्टी कोणाच्याही मनामधून अजून गेल्या नसतील ! अशी वस्तुस्थिति असतां शिवाजीच्या वंशावळींतील महाराजांचें नांव सांपडल्या-बरोबर सानंद आदर उत्पन्न झाला आणि पिढीजाद गादीचा बहुमान करण्याची इच्छा केंब्रिजच्या लोकांच्या मनांत उसळली असें आपण म्हणावें हें ठीक नव्हे.

पिढीजादपणा, जुना वंश वगैरे गोष्टींमध्यें एक प्रकारचा पुरुषार्थ असतो. पण तो सार्थ केव्हां होतो ? सुस्थितीमध्यें. पारतंत्र्याच्या अवस्थेमध्यें आपला पिढीजादपणा पुढें आणणें हें भूषण नसून दूषण होतें. अशा प्रसंगीं शहाण्या माणसांनीं आपला पिढीजादपणा असला तरी तो झांकून ठेवावा. आपल्याला प्राप्त झालेल्या सद्यःस्थितीनें आपल्या प्रख्यात पूर्वजाच्या नांवाला कालिमा लागेल; त्यांचीं कृत्यें केवढीं, आणि आपलीं कर्में काय, इत्यादि गोष्टी मनांत आणून शहाणा मनुष्य मुकाट्यानें बसेल. शिवाजीचें आणि आपलें रक्त एकच अशी बढाई मारण्याची ही वेळ नव्हे, हें त्यानें समजावें. अशा प्रसंगीं पूर्वजांचें नांव काढणें म्हणजे त्यालाही आपल्या दुःस्थितीमध्यें ओढण्यासारखें आहे. स्वतंत्रता स्थापन करणाऱ्या शिवाजीला परतंत्रतेमध्यें आणण्यासारखें आहे. त्यांच्या परिश्रमाचें चीज कांहीं झालें नाहीं असें त्यांना सांगण्यासारखें आहे. त्या पूर्वजांची कीर्ति गाऊन यांना काय करावयाचें आहे ? ते कोणीकडे आणि हे कोणीकडे ! शिवाजी तर नुकताच होऊन गेला. पण कित्येक लोक तर आपली वंशावळ थेट सूर्यापर्यंत आणि चंद्रापर्यंत नेऊन भिडविण्याचा प्रयत्न करीत असतात, पण ह्या प्रयत्नापासून काय फायदा ! आपला मोठेपणा हा आपल्या प्रस्तुतच्या महत्कृत्यांवर आहे. सूर्यचंद्रावर किंवा शत्रूंचा सूर्य गोब्राह्मणांचा चंद्र जो शिवाजी त्याच्यावर अवलंबून नाहीं, ही गोष्ट लक्षांत बाळगली पाहिजे. कृत्य मोठें, वंश मोठा नव्हे. ह्या गोष्टी हल्लींच्या राजांना आणि त्यांच्या आश्रयाच्या कागदी छत्रीखालीं बसणाऱ्या लोकांना समजल्या पाहिजेत.

ग्रंथमाला आणखी एक वाक्य असें लिहिते कीं, “ सर्व हिंदुस्थानांत उच्चतम म्हणून दोन घराणीं नांवाजलेलीं. त्यांच्या वंशजांचे चरणरज आपल्या नगरीस लागावेत व आपल्या पीठांत त्यांचीं नांवें दाखल व्हावींत, अशी इच्छा केंब्रिज युनिव्हर्सिटीनें प्रग ( क ) ट केली. ” एखाद्याचे चरणरज आपल्या नगरीस लागावेत ही भाषा हिंदुस्थानांतील जिंकलेल्या लोकांची होय. व्हाइसरॉय साहेबांचे, गव्हर्नर साहेबांचे, पोलिटिकल एजंट साहेबांचे किंवा दुसऱ्या एखाद्या भिनहुद्द्याच्याही साहेबांचे चरणरज आपल्या नगरीस लागावेत अशी इच्छा हिंदुस्थानांतील राजांच्या मनामध्यें नेहमीं प्रकट होत असते. व तें कालमानानुरूपच आहे. परंतु अशी इच्छा इंग्लिश लोकांना राजकीय हेतू-

शिवाय होण्याचें काय कारण ? हिंदुस्थानचे राजे हे जिंकलेले आहेत आणि त्यांना इंग्लंडनें जिंकलेलें आहे. इंग्लंडच्या बुटांचे रज नेटिवांच्या पगडीतील तुऱ्यांवर विराजमान होत आहेत अशा राजांचे चरणरज आपल्या येथें केव्हां पडतील असे उत्सुक होण्याला इंग्लिश लोक हे कांहीं इंडियन प्रिन्सेस नव्हेत. त्यांच्या बुटांचे रजःकण आपल्या माथ्यावर झळकत असतांना आपले चरण-रज त्यांच्या येथें पडावे म्हणून ते उत्सुक होते असल्या खोटया कल्पनांनीं आपण आपल्याला वृथा गौरवून घ्यावयाचें, ह्यापेक्षां आमच्या खोटया कल्पनां-ची धाव आणखी कोठपर्यंत जावयाची उरली आहे ? मान कशाला म्हणावें आणि अपमान कशाला म्हणावें, ह्याच्या कल्पनाच आम्ही विसरून गेलों आहों ! जे महादजी पूर्वीच्या हिंदुस्थानच्या बादशहाला आपल्या मुठीमध्यें बाळगीत होते त्यांचेच वंशज हल्लींच्या हिंदुस्थानच्या बादशहाचे आपण नाम-धारी कर्नल झालों हा आपला बहुमान झाला असें समजतात, आणि जे शिवाजी व राजाराम दिल्लीपासून जिंजीपर्यंत सारें हिंदुस्थान हलवून सोडीत होते, त्यांचे वंशज केंब्रिज युनिव्हर्सिटीचे नामधारी एल्एल्. डी. झाले हा त्यांचा बहुमान झाला असें 'फ्रीमन'च्या यूरोपच्या इतिहासांतील उच्च तत्त्वें मराठी वाचकांना शिकवणारे गृहस्थ मानतात ! हें केवढें आश्चर्य आहे ! हा मान कसला ! आणि मग आमचा अपमान तरी कधीं होणार ! आमच्या मानापमानाच्या कल्पना कांहीं विलक्षण दिसतात ! दुर्दैवानें त्या इतक्या बदलल्या आहेत कीं, आमच्या पायांत प्रत्यक्ष कोणी खोडा घातला तरीदेखील त्यांनीं आम्हांला घोडयावरच बसविलें आहे असेंसुद्धां म्हणावयाला आम्ही चुकणार नाहीं ! आमच्या राजांचे चरणरज तेथें पडावे अशा त्यांना उत्कंठा व्हावी इतकीं महत्कृत्यें आपण अजून कोठें केलीं आहेत ! चरणरजांनाही महत्त्व असतें, नाहीं असें नाहीं. पण तें कोणाच्या चरणरजांना ? जे चरण अदृश्य शृंखलांनीं गुलामगिरीच्या अस्पर्श-नीय बिडयांनीं--जखडून गेलेले आहेत त्या चरणांच्या रजांला असलें महत्त्व कोठून येणार ! आणि तें वास्तविक नसतांना कोरडें मानून घेण्यांत काय फायदा !

शिवाय हा मानापमानाचा वाद मुख्य प्रयोजनावरून ठरविला पाहिजे. नेटिव राजांना पदवी देणें हा त्यांचा बहुमान करणें आहे असें म्हटलें तरी ह्या राजांना विलायतेस कशाकरतां नेलें होतें हा प्रश्न येतो. त्यांचा बहुमान करण्यासाठीं त्यांना आगबोटींत घालून विलायतेस नेलेलें नाहीं, तर हे इंग्लंडनें

जिंकलेले राजे आहेत ही गोष्ट स्पष्ट होईल अशा ठिकाणीं आणि अशा रीतीनें इंग्लंडच्या राजाच्या मिरवणुकीमध्यें त्यांना चालविण्यासाठीं नेलेलें होतें. ही अपमानाची स्थिति आहे. व यासाठींच त्यांना येथून नेलेलें होतें. इंडिया ऑफिसच्या दरबारामध्यें नेटिव राजांकडून इंग्लंडच्या व इतर ठिकाणच्या लोकांच्यादेखत जी क्रिया करवली तीही जितपणाची आणि अपमानाचीच होती, असेंच अनेक वर्तमानपत्रकारांचें मत आहे. सारांश, अपमान हा नेटिव राजांना तिकडे नेण्यामध्यें मुख्य उद्देश होय, बहुमान हा नव्हे. म्हणून त्याच्याच अनुषंगानें बाकीच्या सर्व क्रियेचा अर्थ केला पाहिजे, हें मीमांसा-शास्त्रांतील एक अगदीं प्राथमिक तत्त्व आहे. परंतु तें आपण पुष्कळ वेळां विसरतों, तें आपण विसरूं नये. खरी स्थिति जाणावी आणि खऱ्या गोष्टीला खऱ्याच शब्दांनीं व्यक्त करावें हा आपला सगळ्यांचा मार्ग असावा.

ग्रंथमालेंत सगळ्या कारणांमध्यें एक कारण सांगितलें आहे तें मात्र चांगलें आहे. ‘ वस्तु असली तरी तिला प्रकट करणारा प्रकाश लागतो, तो नसला तर ती दिसत नाहीं.’ ‘ त्यांत सर वुइल्यम लिवॉर्नरसारख्या माहीतगारां-च्या सूचनांचाही कांहीं भाग असला तरी नवल नाहीं.’, इत्यादि वाक्यांच्या द्वारानें वाशिल्याबद्दलचें व्यंग फार मार्मिकपणानें आणि सहृदयतेनें सूचित करण्यांत आलेलें आहे. शिवाजीच्या वंशांतील पिढीजाद गादीला हा बहुमान देण्याच्या कामांत लिवॉर्नरसाहेबांच्या ओळखीचा कदाचित् उपयोग करून घेण्यांत आला असेलही. ही बातमी कोल्हापूरच्या राजकीय वर्तुळाच्या परिघा-च्या बाहेर फारशी कोणाला अजूनपर्यंत माहीत नव्हती. ती ग्रंथमालेनें जगापुढें आणली ह्यामुळें सत्यान्वेषणाच्या कृत्यावर तिचे बरेच उपकार झालेले आहेत. असो. आमच्या राजांचा खरोखरच सन्मान होईल तर आम्हांलाही ग्रंथमालेच्या इतकाच आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. पण जेथें मानच नाहीं तेथें आनंद कशाचा ? मिथ्यामानाबद्दल, झांकलेल्या अपमानाबद्दल, कोणीही आनंद मानूं

नये. किंवा त्याच्याबद्दल कारणें दाखविण्याचेही श्रम घेऊं नयेत. ह्यांतच आपल्या राष्ट्राचें खरें कल्याण आहे, व तेंच आपण सर्वांनीं करावें. खरें असेल तेंच बोलावें. उदात्त असेल तेंच लिहावें. उपयोगी असेल तेंच शिकवावें. देशाचें हित ज्यांत असेल तेंच करावें आणि परमेश्वराचें जें सत्यस्वरूप असेल तेंच चिंतीत जावें. हें आपलें सगळ्यांचें आज कर्तव्यकर्म आहे. इतकें सांगून हा ग्रंथमालेचा बराच लांबलेला ग्रंथ येथें समाप्त करूं.

---

# स्वदेशाभिमान आणि साम्राज्य : : : ८

काळ : अग्रलेख, ता. १-८-१९०२

ह्या जगांत कांहीं गोष्टी स्वभावसिद्ध असतात. त्यांपैकींच स्वदेशाभिमान ही एक गोष्ट आहे. स्वभावसिद्ध या शब्दाचा अर्थच असा आहे कीं, त्याचें कारण कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. परंतु जरी कारण सांगतां आलें नाहीं तरी, त्या गोष्टीचें अस्तित्व नाकबूल करितां यावयाचें नाहीं. स्वदेशाभिमान ही स्वभावसिद्ध गोष्ट आहे म्हणा, किंवा ती चीज परमेश्वरानें मनुष्याचें अंतः-करण घडविते वेळींच त्यामध्यें घालून ठेविलेली आहे म्हणा; परंतु स्वदेशाभिमान ही एक वस्तु आहे यांत संशय नाहीं. आपला देश स्वतंत्र असो किंवा जिंक-लेला असो, त्याबद्दल प्रत्येक मनुष्याला अभिमान वाटल्यावांचून राहत नाहीं; व त्याबद्दल प्रत्येक मनुष्याच्या मनामध्यें प्रीति उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. मनुष्य उत्पन्न झाला म्हणजे त्याला दोन हात, दोन पाय, नाक, डोळे, कान, इत्यादि ज्याप्रमाणें उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें त्याच्या जन्माबरोबर त्याच्या अंतःकरणामध्यें ही स्वदेशप्रीति उत्पन्न होते. त्या मनुष्याला जर कोणी शत्रु असला तर तो त्याचे हातपाय तोडील, नाक कापील, किंवा डोळे फोडील, ह्या बाह्य वस्तूंचें तो काय पाहिजे तें करूं शकेल. परंतु त्याच्या अंतः-करणामध्यें जी ही स्वदेशप्रीतीची ईश्वरी देणगी असते, तिच्यावर कोणत्याही शत्रूचा—तो कितीही जुलमी असला तरी—अंमल चालावयाचा नाहीं. तिला तोडण्याचा कोणी प्रयत्न केला तर ती दुप्पट जोरानें वाढेल. अशा प्रकारची

ही विलक्षण वल्ली त्या त्रैलोक्याच्या बागवानानें मनुष्याच्या अंतःकरणरूपी आळ्यामध्यें लावून ठेविलेली आहे !

आतां साम्राज्य म्हणजे काय हें आपण पाहूं. साम्राज्य म्हणजे ह्या दिव्य वल्लीच्या उच्छेदाचा एक जंगी प्रयत्न होय. देशाच्या मर्यादा ईश्वरनिर्मित खुणांनीं बहुतेक ठरून गेल्यासारख्या झालेल्या आहेत. आपल्याकडे रेव्हिन्यू सर्व्हे झाली म्हणजे अमक्याचें शेत अमकें, त्याची मर्यादा अमुक, इत्यादि गोष्टी स्पष्ट करण्याकरितां प्रत्येक क्षेत्राच्या सीमेवर सर्व्हे नंबरचे दगड पुरण्यांत येत असतात. त्याप्रमाणें पर्वत, डोंगर, समुद्र आणि नद्या ह्या परमेश्वरानें सर्व्हे केलेल्या पृथ्वीच्या पाठीवरील क्षेत्रांतील हद्दींच्या खुणा आहेत. त्या त्या हद्दींप्रमाणें आपापल्या देशामध्ये प्रत्येक देशांतील लोकांनीं आनंदानें राहावें असा मूळचा ईश्वरी संकेत दिसतो. परंतु हा ईश्वरी संकेत साम्राज्याच्या मानवी संकेतानें अनेक प्रसंगीं विफळ होतो. साम्राज्य म्हणजे ईश्वरानें देशांच्या ज्या मर्यादा घालून दिलेल्या आहेत त्या मोडून टाकणें होय. परंतु असले प्रयत्न— ईश्वरी संकेता-विरुद्ध चालविलेले असले प्रयत्न— कधींही यशस्वी होत नाहींत, हा एक सृष्टीचा सिद्धान्त सर्वांनीं लक्षांत ठेविला पाहिजे फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली त्या वेळीं नवीन अधिकार प्राप्त झालेल्या दीडशहाण्या लोकांनीं ईश्वरी हद्दी मोडून टाकून कृत्रिम हद्दी लोकांना घालून देण्याचा वेडगळ प्रयत्न चालविला होता. नैस-र्गिक हद्दी ह्या वेड्यावाकड्या असतात. कारण डोंगरांच्या रांगा आणि नद्यांचे प्रवाह हे नेहमींच सरळ रेषेमध्यें असतात असें नाहीं, म्हणून ते जुने विभाग रद्द करून फ्रान्सच्या नकाशावर आंखणी घेऊन पेन्सिलीनें सरळ रेषा काढून त्यांचे जसे चौकोन पडतील तशा फ्रान्स देशांतील परगण्यांच्या हद्दी असें ठर-विण्यांत आलें होतें. तो जसा एक वेडगळपणाचा प्रयत्न होता त्याचप्रमाणें साम्राज्य पसरविणारांचेही प्रयत्न चाललेले असतात. इंग्लंड कोणीकडे, आयर्लंड कोणीकडे, कानडा कोणीकडे, न्यूझीलंड कोणीकडे, ऑस्ट्रेलिया कोणीकडे, केप कॉलनी कोणीकडे, हिंदुस्थान कोणीकडे, सीलोन कोणीकडे आणि माल्टा कोणीकडे ? ईश्वरनिर्मित हद्दींकडे पाहिलें असतां ह्यांचा एकमेकांशीं अर्थाअर्थीं कांहीं एक संबंध येण्याचें कारण नाहीं; व असा संबंध येऊंही नये अशी ईश्वराची इच्छा. परंतु इंग्लंडमधील मनुष्यें म्हणतात, ह्या सगळ्यांचा मिळून

एक मोठा थोरला प्रदेश झाला पाहिजे. या सगळ्या निरनिराळ्या देशांच्यामध्यें असलेले समुद्र वाळले पाहिजेत आणि पर्वतांचें पीठ झालें पाहिजे. ईश्वरी मर्यादांचा तिरस्कार करून आम्ही हे सगळे अनेक प्रांत मिळून एक साम्राज्य बनविणार. परंतु तें बनतें कसें ? ईश्वरनिर्मित मर्यादा मनुष्याला फार वेळपर्यंत मोडतां येणें शक्यच नाहीं. ह्या कारणासाठीं साम्राज्य ही कधींही टिकाऊ वस्तु होत नाहीं.

देवानें घालून दिलेल्या सरहद्दी मोडून साम्राज्य वाढविणारा मनुष्य देवाचें मन तर क्षुब्ध करतोच, परंतु त्याच्या हातून मनुष्यांचीं मनें क्षुब्ध करण्या-सारखींही कृत्यें होत असतात. साम्राज्य म्हटलें म्हणजे त्यामध्यें वर दाख-विलेल्या रीतीनें ज्याप्रमाणें पर्वत आणि समुद्र यांचा नाश होतो त्याचप्रमाणें प्रत्येक निरनिराळ्या देशांमध्यें जे स्वदेशाभिमानाचे पर्वत असतात आणि जे स्वदेशप्रीतीचे समुद्र असतात, त्यांचाही समूळ नाश होतो. एक साम्राज्य म्हणजे अनेक स्वदेशप्रीतींचा उच्छेद होय. साम्राज्यांत सामील झालेल्या प्रत्येक देशांतील लोकांनीं आपली स्वदेशभक्ति विसरून गेलें पाहिजे आणि दुसऱ्याच्या देशावर भक्ति करावयाला लागलें पाहिजे. पण हें तरी होणार कसें ? असें कधीं होत नाहीं म्हणूनच साम्राज्यें टिकत नाहींत. स्वदेशाभिमान ही परमे-श्वरानें दिलेली दिव्य वस्तु दुसऱ्याच्या साम्राज्यासाठीं मनुष्याच्या अंतःकरणा-मधून त्याच्या प्राणाच्या आधीं नाहींशी होण्यासारखी नाहीं !

निरनिराळ्या देशांतील लोकांचा आपापल्या देशांबद्दलचा स्वदेशाभिमान हा साम्राज्याला मोठा घातक होय फ्रान्सचा पहिला बादशहा नेपोलियन ह्यानें सर्व यूरोपखंडामध्यें आपलें साम्राज्य स्थापित केलें होतें. परंतु त्यानें जिंक-लेल्या प्रत्येक लोकांमध्यें स्वदेशभक्ति जागृत होती. ऑस्ट्रियन लोकांना ऑस्ट्रिया-बद्दल प्रीति होती. स्पेन हें स्पॅनिश लोकांकरितांच आहे, असें स्पॅनियर्ड्सना वाटत होतें. रशियाचा अफाट प्रदेश हा फ्रान्सच्या राजाकरितां नाहीं, तर त्यावर आपली मालकी आहे, हा विचार साऱ्या रशियन लोकांच्या मनामध्यें पेटलेला होता. ह्यामुळें निरनिराळ्या देशांतील स्वदेशाभिमान वाटर्लूच्या मैदानावर एकत्र झाले आणि त्यांनीं फ्रान्सच्या अफाट साम्राज्याला सेंट हेलिनाच्या एका

लहानशा बेटामध्यें कोंडून टाकलें. ऑस्ट्रियाचें साम्राज्य इटली देशावर कित्येक वर्षेपर्यंत चाललेलें होतें. ऑस्ट्रियन साम्राज्यानें इटलीच्या स्वातंत्र्याचा दिवा कधींच मालवून टाकलेला होता परंतु तेथील लोकांच्या मनांतील स्वदेशाभिमानाची ज्योत मालवलेली नव्हती. म्हणून काऊंट केव्हर, मॅझिनी, आणि गॅरिबाल्डी ह्यांच्या युक्तीनें, शहाणपणानें आणि साहसानें इटॅलियन लोकांना यश येऊन ऑस्ट्रियाच्या साम्राज्याची छत्री इटलीच्या संरक्षणासाठीं म्हणून ऑस्ट्रियानें जी इटलीच्या डोक्यावर धरली होती ती ऑस्ट्रियाला मुकाट्यानें मिटून घ्यावी लागली. दुसरा नेपोलियन आणि ऑस्ट्रियाचा मॅक्झिमिलियन ह्यांनीं आपलें साम्राज्य अमेरिकेंतील मेक्सिको देशावर स्थापित करण्याचा प्रयत्न चालविला होता. परंतु फ्रान्सचा आणि मेक्सिकोचा काय संबंध? एकाच पर्वतांनीं आणि एका समुद्रांनीं हे दोन देश वेष्टिलेले होते काय? किंवा ह्या दोन्ही देशांतील लोकांची स्वदेशप्रीति एकच प्रकारची होती काय? फ्रान्सचा मेक्सिकोशीं कोणत्याही दृष्टीनें अर्थाअर्थीं संबंध नव्हता. यामुळें मेक्सिकोंतील लोकांची स्वदेशप्रीति जागृत झाली आणि तिनें आपल्यावरील फ्रेंच साम्राज्याचा विध्वंस करून टाकिला. ज्वारझ, एस्कोबेडो, पारफीपिरियो डायस वगैरे शूर आणि स्वदेशाभिमानी लोक मेक्सिकोमध्यें निर्माण झाले आणि त्यांनीं फ्रेंच साम्राज्याचें प्राबल्य कमी केलें. क्यूबा बेटावर स्पेनचें साम्राज्य आज कैक वर्षें चाललेलें होतें. परंतु क्यूबन लोकांची स्वदेशभक्ति आणि स्पॅनिश लोकांची स्वदेशभक्ति ह्या एक तऱ्हेच्या नसल्यामुळें दोघांमध्यें खटका उडून स्पेनला आपलें साम्राज्याचें जाळें अटलांटिक महासागरांतून काढून घेऊन क्यूबा बेट मोकळें करून देणें भाग पडलें. ह्याप्रमाणें साम्राज्याच्या पोटांतील लहान लहान स्वदेशाभिमानांनीं त्या साम्राज्याचें पोट फाडल्याची अनेक उदाहरणें इतिहासामध्यें दिसून येतात.

ह्यासाठीं साम्राज्य टिकाऊ करण्याला दोन गोष्टींकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे असें वरील विवेचनावरून कोणालाही दिसून येईल. एक ईश्वरी मर्यादा मोडतां कामा नयेत; व दुसरी गोष्ट ही कीं, साम्राज्यांतील सर्वांची स्वदेशभक्ति एकच तऱ्हेची बनली पाहिजे. आगगाड्या, तारायंत्रें, आगबोटी इत्यादि नवीन शोधांनीं दूरदूरचे देश जवळ जवळ आल्यासारखे झाल्याकारणानें सांप्रतकाळीं

पहिली गोष्ट बरीच साध्य झाली आहे. परंतु दुसरी स्वदेशाभिमानाच्या ऐक्यतेबद्दलची गोष्ट, जिच्यापासून हल्लींच्या आपल्या ब्रिटिश साम्राज्याला जोर आणि आणि टिकाऊपणा येऊं शकणारा आहे ती गोष्ट, मुख्यतः घडवून आणली पाहिजे; व ती घडवून आणणें इंग्रजांच्या उदार राजकीय धोरणावर अवलंबून आहे. म्हणून हिंदुस्थानासंबंधानें त्यांनीं त्या उदार धोरणाचा स्वीकार करावा असें साम्राज्याचें हित चिंतणारा कोण म्हणणार नाहीं ?

---

# पोपट आणि परशुराम : : : ९

काळ : अग्रलेख, ८-८-१९०२

परशुरामाचा बाप एक मोठा श्रीमंत सावकार होता. त्याचें सर्व लक्ष पैसे मिळविण्यामध्यें गुंग होऊन गेलेलें असे. परंतु परशुरामाच्या मनाची प्रवृत्ति कांहीं निराळ्या प्रकारची होती. त्याला बापाच्या इतका पैशाचा हव्यास नव्हता. त्याची बापाच्या इतकी संसाराकडे प्रवृत्ति नव्हती. ह्या जगांतील दुःखें पाहून त्याचें मन बरेंच विटलेलें होतें. तरी पण कोणी दैन्य दाखविलेलें त्याला खपत नसे. तो सदोदित सर्व प्राण्यांवर उपकार करण्यामध्येंच आपला वेळ खर्च करीत असे. ह्या जगांत सगळ्यांना सदोदित सारखेंच सुख मिळण्याचा संभव नाहीं ही गोष्ट त्याच्या मनावर बिंबून तो उदास आणि खिन्न झालेला होता. व त्याच दिशेनें त्याचे बहुतेक विचार चाललेले असत.

एके दिवशीं सकाळीं परशुराम आपल्या सज्जांतील कठड्यावर टेकून उभा राहिला होता. इतक्यांत तेथेंच टांगून ठेविलेल्या एका पोपटाच्या पिंजऱ्याकडे त्याचें लक्ष गेलें. तो पिंजरा फारच रमणीय दिसत होता. त्याच्या पितळेच्या तारा नुकत्याच साफ केलेल्या असल्यामुळें व त्यांजवर सकाळच्या सूर्याचे कोंवळे किरण पडलेले असल्यामुळें त्या तारा लखलख करीत होत्या. पिंजऱ्याच्या आंतमध्यें पोपटाला बसण्याकरितां एक आडवी काठी बसविलेली होती. व त्या पिंजऱ्यांत स्वच्छ पाण्यानें भरलेली एक लहानशी वाटी होती. व कांहीं खाण्याचे पदार्थही आंतमध्यें ठेविलेले होते. व एक सुंदर पोपट या पिंजऱ्यामध्यें कोंडून

ठेविला होता. त्याला पाहून परशुरामाच्या मनामध्यें अनेक विचार उभे राहिले व तो त्यां पोपटाला म्हणाला:—अरे पोपटा! परमेश्वरानें ह्या सृष्टीमध्यें जे जे प्राणी निर्माण केले आहेत त्या सर्वांमध्यें तूं अत्यंत नीच असला पाहिजेस. तुझ्यासारखा अधम प्राणी दुसरा कोणी नसेल. देवानें तुझें शरीर फार सुंदर बनविलें आहे पण त्या शरीराला शोभेल असें मन त्यानें तुला दिलें नाहीं. सुंदर स्वरूप मात्र देऊन त्यानें तुला फसविलें! कारण सुंदर मन नसेल तर त्यावांचून सुंदर स्वरूपाची काय शोभा? ज्या तुझ्या मनाला तुझ्या बद्ध स्थितीबद्दल यत्किंचितही वाईट वाटत नाहीं तो तूं कितीही सुंदर असलास म्हणुन काय उपयोग? तुझ्या कंठामध्यें प्रत्यक्ष पंचमस्वराची मूर्ति बसविलेली असली तरी काय उपयोग? आणि तुझा सर्व पिसारा प्रत्यक्ष हिरव्यागार पाचे-च्या खड्यांचें चूर्ण करून त्याच्या योगानें जरी ईश्वरानें बनविलेला असला तरी त्याचा काय उपयोग? तूं पूर्वीं स्वतंत्र होतास, तुला पाहिजे तिकडे फिरण्या-ची पूर्वीं मोकळीक होती. अरण्यांतील झाडांवर जें जें म्हणून फळ येईल तें तें तुझें होतें. तुझ्या मर्जीस वाटेल त्या फळावर तूं चोंच मारावीस आणि तें खावेंस अशी तुझी स्थिति होती. वाटेल त्या ठिकाणचे स्वच्छ जलबिंदु मोत्या-च्या दाण्याप्रमाणें आपल्या चोंचीनें टिपून घेण्याची तुला मोकळीक होती. तुझ्या पंखांत शक्ति आहे तोंपर्यंत वाटेल त्या दिशेकडे भराऱ्या मारीत जाण्याची पूर्वीं तुला मुभा होती. श्रांत झाल्यासारखें वाटल्यास जवळच्या वृक्षाग्रावर बसावें आणि विश्रांति घेतल्यावर फिरून वाटेल तिकडे उड्डाण करावें, अशा प्रकारची तुझी गति पूर्वीं अव्याहत होती. सर्व आकाश तुझें होतें. तूं जिकडे उडत जाशील तिकडे तुझी सत्ता होती. तूं येथें उडूं नकोस असें तुला म्हणावयाला कोण होतें? ह्या आकाशरूपी सरोवरामध्यें एखाद्या माशाप्रमाणें चाहील तिकडे पोहत जाण्याला तूं पूर्वीं मुखत्यार होतास. एखाद्या अश्वाप्रमाणें चपल वेगाच्या वायूच्या पाठीवर बसून जो भाग आक्रमण करण्याची तुला इच्छा होईल तो करण्याला पूर्वीं तुला कोठेंही प्रतिबंध नव्हता. तुला वाऱ्याच्या बरोबरीनें आकाशामध्यें उडतांना पाहून, वाऱ्याला कोंडतां येईल, पण ह्या पक्षाला कधींही कोंडतां यावयाचें नाहीं, असेंही कित्येकजणांना वाटलें असेल. अशी तुझी पूर्वींची स्थिति होती. ती सगळी नाहींशी झाली आणि तूं ह्या पिंजऱ्यांत कोंडला गेलास. ह्या तुझ्या पूर्वींच्या स्थितीची तुला क्वचितच आठवण येत असेल. तुला

पूर्वींचें कांहीं तरी स्मरतें काय ? कित्येकांना पूर्व जन्मांचीही आठवण असते म्हणून म्हणतात. पण तुला ह्या एकाच जन्मांतल्या गोष्टींची तरी कांहीं आठवण आहे काय ? तूं क्षितिजाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत भराऱ्या मारीत असस, ह्याची तुला कांहीं आठवण आहे काय ? उदय पावणाऱ्या सूर्याला तूं सामोरा जात असस आणि अस्तास जाणाऱ्या सूर्याला तूं पोंहोचवावयाला जात असस, ह्या पूर्वकालच्या गोष्टींपैकीं तुला हल्लीं कांहीं स्मरतें काय ? निरनिराळ्या अरण्यातील झाडांच्या फळांच्या चवींची तुझ्या जिभेला हल्लीं कांहीं स्मृति आहे काय ? ह्या पिंजऱ्यांतून आपण सुटलों तर आपल्याला चार पावलें तरी उडतां येईल किंवा नाहीं अशी शंका उत्पन्न व्हावी इतका तुला तुझ्या पूर्वस्थितीचा विसर पडला आहे. तेव्हां तुला मागचें काय आठवणार ? तूं ह्या पिंजऱ्यांत कोंडला गेलास ह्यांत तुझा फारसा अपराध नाहीं. प्रसंगविशेषीं सिंह, वाघ इत्यादिक अत्यंत बलाढ्य प्राणीदेखील कधीं कधीं तुझ्यासारखे पिंजऱ्यामध्यें सांपडतात. तू पिंजऱ्यांत सांपडलास म्हणून मी तुला नीच किंवा अधम म्हणत नाहीं. पण तूं पिंजऱ्यात कोंडला गेला असूनही नाचतोस आणि उड्या मारतोस म्हणून तूं नीच आणि अधम आहेस. तूं रडत असतास, तुझ्या डोळ्यांतून दिवसरात्रीं घळघळ अश्रु वाहत असते, तुझें तोंड सुकलेलें दिसत असतें, तूं दीर्घ श्वास टाकीत असतास, आणि तुझ्या अंगावरची सतेज कांति निस्तेज झाली असती तर तूं मला कधींही अप्रिय झाला नसतास ' देवा, मला ह्या यातनांतून सोडीव ' अशा प्रकारचा त्या गजेंद्राप्रमाणें आक्रोश करून तूं भगवंताचा धांवा करीत असतास तर मीं तुला अत्यंत पूज्य समजून साष्टांग प्रणिपात केला असता. परंतु तुझें मन अगदींच निराळ्या तऱ्हेचें आहे. तुला बंदिवासामध्यें नाचणें सुचतें ! माझ्या बापानें तुझ्या पायांमध्यें आपल्या हौसेकरितां बारिक बारिक घुंगुर बांधले आहेत आणि त्यांच्या तालावर तूं सदोदित नृत्य करीत असतोस, जणूं काय तुला पिंजऱ्यांत कोंडून ठेविलें आहे हें तुला स्वर्गांत नेऊन सोडल्याप्रमाणेंच वाटत आहे. अरे अधमा, ज्या ठिकाणी असतांना जगांतील सर्व प्राण्यांच्या अंतःकरणाचें संतापानें पाणीच होऊन गेलें पाहिजे अशा पिंजऱ्यामध्यें तूं कोंडला गेला असतांनाही तुला नाचण्याची स्फूर्ति होते तेव्हां तुझें काळीज खरोखर उलटेंच असलें पाहिजे. जेथें इतरांच्या पायांमध्यें हालचाल करण्याची असलेली शक्ति दुःखामुळें विगलित होते त्या

ठिकाणीं — त्या पिंजऱ्यांत — त्या तुरुंगांत — त्या बंदिवासांत — तुझे पाय नाचण्यासाठीं प्रसरण पावतात तरी कसे! बंदिवासांत असून नाचणें ही अधमपणाची गोष्ट होय, ती तुझ्यानें कशी करवते ? अशी गोष्ट जगाच्या निदर्शनाला न येईल तर बरी ! असलें उदाहरण जगांत नसेल तर बरें ! पिंजऱ्यामध्यें नाच करणारा तुझ्यासारखा पक्षी परमेश्वरानें ह्या जगांत निर्माणच केला नसता तर फार बरें झालें असतें. जगांतील प्रत्येक वस्तु ही जगाला कांहीं तरी चांगला धडा शिकविण्यासाठीं जगामध्यें आहे. असला चांगला धडा जर ती जगाला शिकवीत नसेल तर तिनें येथें असूं नये. मग तिचें येथें कांहीं एक प्रयोजन नाहीं. असला चांगला धडा, अरे पिंजऱ्यांत नाच करणाऱ्या अधम प्राण्या, तूं जगाला काय शिकवीत आहेस, कीं ज्यामुळें तुला ह्या जगामध्यें राहण्याचा हक्क आहे ? तूं जगाला गुलामगिरीमध्यें आनंद मानण्याला मात्र शिकवीत आहेस ! तूं गुलामगिरीचा पक्षी आहेस ! तूं पारतंत्र्याचा मदतगार आहेस ! तूं बंदिवासाचा उपदेशक आहेस ! तूं परवशतेचें चित्र आहेस ! अशा तुझें दर्शन देखील नसावें. तुझ्या ह्या चित्रापासून आणि तुझ्या ह्या उपदेशापासून मनुष्यांना जितकें दूर राहतां येईल तितकें त्यांनीं राहिलें पाहिजे. लहान मुलांच्या दृष्टीस तुझें उदाहरण पडलें तर तीं मोठेपणीं गुलाम होतील आणि गर्भिणी स्त्रियांनीं हें तुझें उदाहरण पाहिलें तर त्यांच्या पोटीं उपजणारीं मुलेंही गुलामच झालीं पाहिजेत. बहुतकरून देवानें तुला आधीं निर्माण केलें आणि नंतर मग ह्या जगामध्यें गुलामगिरी पसरली ! बहुधा तुला पिंजऱ्यामध्यें नाचतांना पाहून मनुष्यांना गुलाम करून ठेवण्याची युक्ति जुलमी राज्यांच्या डोक्यांत आली असावी. तूं क्रूर मनुष्यांना जुलूम शिकविलास आणि तूं गरीब मनुष्यांना गुलाम केलेंस ! सगळें जग सुखानें नांदलें असतें, पण त्या सुखामध्यें तूं माती कालविलीस ! इतकें तुझें उदाहरण वाईट आहे. असें वाईट उदाहरण लोकांना कां घालून देतोस ? तुझ्या हातूनही ह्या परमेश्वराच्या जगामध्यें कांहीं सत्कर्म होणार नाहीं असें नाहीं. बंदिवासांत आनंद मानून जो तूं नाचत सुटला आहेस तो तूं तें नाचणें सोडून देऊन जरा आत्मविवेक करशील तर तूंही ह्या परमेश्वराच्या सृष्टींतील अगदीं टाकाऊच प्राणी आहेस असें नाहीं. हा तुझा पिंजरा एवढेंच जग नाहीं. तुझा पिंजरा फार मोठा आहे. जिकडे जिकडे आकाश, वायु, इत्यादिक पंचमहाभूतें पसरलेलीं आहेत तिकडे तिकडे तुझा पिंजरा आहेच. झाडां

च्या अग्रभागांवर प्रत्यक्ष भगवान् सूर्यनारायण तुझें अन्न शिजवून ठेवीत आहे ! तूं जेथें जेथें उडत जाशील आणि तुला जेथें जेथें तृषा लागेल तेथें तेथें तुझ्या त्या तृषेचें शमन करण्यासाठीं प्रत्यक्ष मेघराज ठिकठिकाणीं तुझ्याकरितां निर्मल पाण्याचे पेले भरून ठेवीत आहे. तुझीचशी काय, परमेश्वरानें सर्वच प्राण्यांची ह्याप्रमाणें तरतूद करून ठेविली आहे. मग तूं या पिंजऱ्यामध्यें काय म्हणून राहतोस ? ह्या जगामध्यें तुला आणि मला राहण्याला पुष्कळ जागा आहे. तुला पिंजऱ्यांत कोंडून ठेविल्यावांचून मला राहवयाला जागा नाहीं, इतकी देवाची सृष्टि संकुचित नाहीं. मग मीं तरी तुला काय म्हणून कोंडून ठेवावें ?

असें म्हणून परशुरामानें पिंजऱ्याचें दार उघडलें. पोपट उडून गेला. आणि परशुरामानें तो पिंजरा जवळच्या खांबावर आपटून दूर झुगारून दिला.

---

# हिंदुस्थानांतील प्रतिनिधींच्या महत्त्वाकांक्षा १०

काळ : अग्रलेख, ता २९-८-१९०२

★ आमचे प्रतिनिधि जे राजे महाराजे ते हुजरे झाले !

राज्यारोहणाकरितां हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्यें कांहीं लोक गेलेले आहेत. ह्यांना तिकडे हिंदुस्थानचे प्रतिनिधी ( Representatives ) असें अनेक वेळां म्हणण्यांत येत असतें, पण हे प्रतिनिधी कोणाचे ? ह्यांना हिंदुस्थानांतील लोकांनीं कधीं निवडून दिलें होतें ? हिंदुस्थानांतील सरकारकडून ह्यांचीं नांवें नेमण्यांत आलीं. आणि त्याप्रमाणें हे लोक विलायतेस गेलेले आहेत. हे हिंदुस्थानांतील लोकांच्या वतीचे प्रतिनिधी नव्हेत. हे सरकारच्या वतीचे तोंडपुजे होत. तिकडे जाऊन जे आपल्या तंत्राप्रमाणें वागतील अशाच प्रकारचे लोक ह्या कामाकरितां सरकारनें नेमलेले आहेत. हे लोक तिकडे जाऊन आपल्या अनेक प्रकारच्या महत्त्वाकांक्षा तिकडील लोकांपुढें मांडीत आहेत. ह्या हिंदुस्थानांतील प्रतिनिधींपैकीं एका प्रतिनिधीच्या मनामध्यें एके दिवशीं अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली कीं, राज्यारोहणाच्या वेळीं राजाच्या डोक्यावर एक प्रकारचें छत्र धरण्याचा इंग्लंडमधील ज्या 'नाइट्स ऑफ धि गार्टर' या हुद्द्याच्या लोकांना अधिकार आहे, त्यांच्याप्रमाणें आपल्याला राजाच्या डोक्यावर छत्र धरण्याचें काम मिळावें, किंवा निदान राणीसाहेबांच्या झग्याचा घोळ उचलून धरण्याचें जें एक प्रतिष्ठित काम आहे तें तरी करण्याची आपल्याला परवानगी मिळावी. हिंदुस्थानच्या प्रतिनिधीनें ही आपली महत्त्वाकांक्षा

आपल्या मनांतच ठेविली नाहीं, तर ती टाईम्स पत्रामध्यें प्रसिद्ध करून सर्व जगाला कळविली आहे. हिंदुस्थानांतील कित्येक राजे इंग्लंडच्या राजाचे एडि-क्यांप आधींच झालेले आहेत; व कित्येक दिल्ली दरबारच्या वेळीं कर्झनसाहेबांचे हुजऱ्ये होण्याच्या बेतांत आहेत. अशा रीतीनें चोहोंकडे नेटिव राजांच्या मनामध्यें महत्त्वाकांक्षेच्या लाटा उसळत आहेत. त्यापैकीं महाराज प्रद्योतकुमार टागोर याच्याही मनामध्यें एक महत्त्वाकांक्षा प्रगट झाली आहे. हे एक हिंदुस्थानांतील लोकांच्या प्रतिनिधींपैकींच आहेत. ह्यांना लॉर्ड मीथ ह्यांनीं एक पत्र लिहिलें होतें. त्यांतील सारांश असा होता कीं, हिंदुस्थानचें ब्रिटिश साम्राज्य हल्लीं फार मोठें झालें आहे. याची आठवण हिंदुस्थानांतील सर्व लोकांना यावी म्हणून ‘ साम्राज्याचा दिवस ’ असें एका दिवसाला नांव देऊन त्या दिवशीं हिंदुस्थानां-तील सर्व सरकारी शाळांतील मुलांना सुटी देण्यांत यावी. महाराज प्रद्योतकुमार टागोर ह्यांना ही सूचना पसंत पडली. असें कांहीं तरी झालें पाहिजे असें महाराजांना वाटतच होतें. त्यामुळें महाराजसाहेबांनीं लॉर्ड मीथ ह्यांना उलट पत्र लिहून असें कळविलें आहे कीं, आपली सूचना मला सर्वथैव मान्य आहे. ब्रिटिश साम्राज्य किती मोठें झालें आहे ह्याचा कल्पना हिंदुस्थानांतील मुलांच्या मनावर ठसविण्याकरितां, त्या साम्राज्याचा मोठेपणा कायम राखण्याची जबाबदारी आपल्यावर किती आहे हें त्यांच्या मनावर बिंबविण्याकरितां हिंदुस्थानांतील मुलांना वर्षांतून एक दिवस सुटी देणें फारच जरूरीचें आहे. टागोरसाहेबांच्या ह्या म्हणण्यां-तील कार्यकारणभाव कसा काय आहे हें मात्र परमेश्वर जाणें. ब्रिटिश साम्राज्याच्या मोठेपणाचा आणि सुटीचा काय संबंध ? मुलांना सुटी दिली म्हणजे ब्रिटिश साम्राज्याचा मोठेपणा त्यांना कसा कळणार ? शिवाय ब्रिटिश साम्राज्याचा मोठेपणा कायम राखण्याची जबाबदारी हिंदुस्थानांतील मुलांवर काय आहे ? आणि तीं मुलें एक दिवस शाळेंत गेलीं नाहींत म्हणजे ती जबाबदारी त्यांना कशी ओळखितां येणार ? ब्रिटिश साम्राज्याचा मोठेपणा कायम राखण्याची जबाबदारी हिंदुस्थानां-तील लोकांवर आहे म्हणजे काय ? ज्यांना लढण्याची हौस असेल त्यांना लढण्याची परवानगी नाहीं, हिंदुस्थानांतील लोकांच्या हातांत कोणताही अधिकार नाहीं, किंवा त्यांनीं कांहीं सूचना केल्या तर त्यांच्याकडे कोणी ढुंकून पाहत नाहीं. मग हिंदुस्थानांतील लोकांनीं ब्रिटिश साम्राज्याचा मोठेपणा कायम राखावयाचा तो कसा ? हिंदुस्थानांतील लोकांनीं आपले कष्टार्जित पैसे इंग्लिशां-

च्या हातीं द्यावे आणि त्यांच्या सल्लयावांचून त्या पैशाचा विनियोग इंग्लिशांनीं वाटेल तसा करावा, हीच हिंदुस्थानांतील लोकांवर ब्रिटिश साम्राज्यासंबंधानें जबाबदारी आहे कीं नाहीं ? असल्या प्रकाराची कुचकामाची आणि अपमानाची जबाबदारी हिंदुस्थानांतील मुलांनी आपल्या डोक्यावर घेऊन ती पुढें चालवावी अशी टागोरसाहेबांची इच्छा आहे काय ? असल्या पोकळ आणि बिनलाभाच्या जबाबदारीचें ओझें हिंदुस्थानांतील जुन्या पिढींतील अजागळ लोकांनीं जें आजपर्यंत आपल्या डोक्यावर वाहिलें तेंच त्यांच्या पुत्रपौत्रादिकांनीं वंशपरंपरेनें वाहावें अशी या महाराजांची इच्छा आहे काय ? नवीन पिढीनें ब्रिटिश साम्राज्याबद्दल अभिमान बाळगावयाला पाहिजे असेल तर त्या पिढींतील लोकांना नवीन हक्कच दिले पाहिजेत. जुन्या पिढींतील लोकांची नुसत्या थापांवर जशी समजूत झाली तशी इतःपर होणें शक्य नाहीं. नवीन पिढीला खरोखरच कांहीं हक्क मिळाले पाहिजेत. त्यांचा राज्यकारभारामध्यें खरोखरच कांहीं तरी हात शिरकला पाहिजे. त्यांचें लष्करी खात्यामध्यें खरोखरच कांहीं तरी जास्त पाऊल पुढें पडलें पाहिजे. आणि त्यांच्या सूचनांना कायदे करणाऱ्या मंडळींच्या सभांतून खरोखरच कांहीं तरी जास्त महत्त्व मिळालें पाहिजे. सुट्या देऊन पुढल्या पिढींतील मुलें ब्रिटिश साम्राज्याकडे वळतील असा जर भ्रम टागोरसाहेबांना, लॉर्ड मीथसाहेबांना किंवा दुसऱ्या कोणा साहेबांना असला तर तो भ्रम बाजूला ठेवण्याचे दिवस जवळ येत चालले आहेत. खाऊचे पुडे, पदकें, बक्षिसें आणि सुट्या ह्यांनीं अज्ञान पोरांना आजन्म गुलाम करून ठेवण्याच्या युक्त्या ह्याच्यापुढें हिंदुस्थानांतील तोंडपुज्या लोकांना आणि त्यांच्या धन्यांना फारशा उपयोगीं पडतील असें नाहीं हिंदुस्थानच्या पैशानें हिंदुस्थानांतून विलायतेस नेलेले टागोरसाहेब तिकडे कांहींही म्हणोत, रयतेच्या पैशावर विलायतेस जाऊन तिकडील अधिकाऱ्यांची खुशामत करण्याला आणि तिकडील अधिकाऱ्यांच्या तोंडासारखें बोलण्याला ह्या लोकांना कांहीं खर्च पडत नाहीं. पण हिंदुस्थानांतील उपाशी मरणाऱ्या गरीब लाकांचे हाल अगदीं पराकाष्ठेला जाऊन पोंहोचण्याच्या बेतांत आलेले आहेत. अशा लोकांना ब्रिटिश साम्राज्य कितीही मोठें झालें तरी, जोंपर्यंत अन्नान्न करून मरण्याची पाळी येत आहे तोंपर्यंत त्यांच्या मुलांना सुट्या दिल्या म्हणून त्या मुलांचे आईबाप दुःखानें आणि उपासमारीनें मेल्यावांचून

राहणार आहेत काय ? अशा लोकांना तुमचें साम्राज्य मोठें झालें म्हणून करावयाचें आहे काय ? लॉर्ड मीथसाहेबांनीं ह्या सुट्टीच्या दिवसाला 'साम्राज्याचा दिवस' असें नांव द्यावयाचें योजिलें होतें. टागोरसाहेबांनीं त्यांत सुधारणा करून 'एडवर्डसाहेबांच्या साम्राज्याचा दिवस' असें नांव सुचविलें आहे. लॉर्ड मीथसाहेबांचें म्हणणें होतें कीं, फक्त सार्वजनिक पैशानें चालविलेल्या शाळांनाच ह्या दिवशीं सुटी द्यावी. पण स्वदेशहितचिंतक टागोरसाहेब असें म्हणतात कीं, फक्त एवढ्याच शाळांना काय म्हणून, मी हिंदुस्थानांत गेल्या-वर खासगी शाळांना देखील सुटी देण्याविषयीं खटपट करीन. लॉर्ड मीथ आणि टागोरसाहेब ह्यांच्यामध्यें साम्राज्याच्या राजनिष्ठसंबधानें जी ही चढाओढ लागलेली आहे ती मोठी कौतुक करण्यासारखी आहे हिंदुस्थानचे जे हे अद्वितीय प्रतिनिधी विलायतेस नेण्यांत आलेले आहेत त्यांच्या महत्त्वाकांक्षेची ही वर दिलेली याद वाचून हिंदुस्थानचे प्रतिनिधी आणि हिंदुस्थानचे पुढारी म्हणजे कसली वस्तु असते हें कोणाच्याही लक्षांत येईल. लहान मुलें हीं कोंवळीं झाडें आहेत, तीं जशीं वळवावीं तशीं वळतात. त्यांना चांगलें वळण लावणें हें त्यांच्या आई-बापांचें काम आहे. परमेश्वराच्या बागेमध्यें लहान मुलांच्या रूपानें आपल्या ह्या हिंदुस्थान देशांत जीं कोंवळीं लुसलुशित झाडें उगवलीं आहेत त्यांना नीट रीतीनें वळण लावणारे त्यांचे आईबाप हे एक प्रकारचे माळी आहेत बापांनीं आपल्या मुलाना चांगलें वळण लावावें हें बापांचें कर्तव्यकर्म आहे. बाप चुकले असतील, पण आपल्या मुलांनीं तरी आपल्यासारखें चुकूं नये अशी त्या बापांची, जर ते खरे बाप असतील तर, इच्छा असली पाहिजे. बाप बुडाले असतील; पण आपल्या मुलांनीं तरी आपल्यासारखें बुडूं नये अशी त्या बापांची, जर ते खरे बाप असतील तर, इच्छा असली पाहिजे. मुलांना खरा मार्ग दाखविला पाहिजे. सुट्या देवून आपण गिरविलेला तोंडपुजेपणाचाच धडा पुढें आपल्या मुलांकडून गिरविणें ही बापांची खरी महत्त्वाकांक्षा नव्हे. इंग्लिशांनीं आपल्या-करितां काय केलें आहे तें आपल्या मुलांना सांगा. इंग्लिशांनीं आपल्याकरितां काय केलें नाहीं, तेंही आपल्या मुलांना सांगा. इंग्लिशांनीं जें चांगलें केलें आहे तेंही आपल्या मुलांना अवश्य कळलें पाहिजे. पण इंग्लिशांनीं हिंदुस्थानांत जें केलें नाहीं, किंवा जें वाईट केलें आहे तें आपल्या मुलांपासून छपवून ठेवणें चांगलें नाहीं. ह्या पिढीनें हिंदुस्थानाकारितां काय केलें हें दिसतच आहे. असाच छाप पुढील

पिढीवर उठवावयाचा असेल तर गोष्ट निराळी. पण तिनें आपल्या जन्मभूमी-करितां आणि आपल्या देशबांधवांकरितां तोंडपुजेपणापेक्षां कांहीं जास्त करावें अशी इच्छा असेल तर खाऊचे पुडे आणि सुट्या ह्यांचें आमिष लावलेले गुलामगिरीचे गळ शाळेच्या स्वच्छ पाण्यामध्यें स्वतंत्रपणें पोहणाऱ्या लहान लहान माशांच्या गळ्याला टोंचणें बरोबर होणार नाहीं. हिंदुस्थानांतील लहान मुलांना साम्राज्याचा अभिमान, राजनिष्ठा वगैरे गोष्टी पाहिजेतच परंतु त्यांना त्यांच्या देशाबद्दलचा अभिमानही अवश्य असला पाहिजे. व अशा प्रकारचें धोरण सर्व प्रसंगी ठेवलें गेलें तर तें जसें हिंदुस्थानाला हितावह होईल तसें इंग्लंडलाही झाल्यावांचून राहणार नाही.

---

## देशभक्ति आणि राजनिष्ठा : : : ११

काळ : अग्रलेख, ता. ५-९-१९०२

★ यांत विरोध होईल तेव्हां सर्वांच्या कल्याणाला साधनीभूत अशी देशभक्तीच अंगिकारिली पाहिजे.

हे दोन शब्द आहेत. ह्या दोन वस्तु आहे. ह्या दोन कल्पना आहेत. हे दोन मनोविकार आहेत. हे दोन अंतःकरणाचे उमाळे आहेत. ह्यांच्याबद्दल आपण थोडासा विचार करूं.

देशभक्ति आणि राजानिष्ठा ह्यांची परस्परतुलना करून त्या तुलने प्रमाणें जर आपण ह्यांची किंमत ठरवूं लागलों तर आपल्याला देशभक्तिच जास्त किंमतीची आहे असें म्हणावें लागतें. आणि किंमतीवरून जर जागा ठरवावयाची असेल, तर राजानिष्ठेपेक्षां देशभक्तीलाच श्रेष्ठ स्थान दिलें पाहिजे. देशभक्ति आणि राजानिष्ठा हे दोन्ही शब्द एका प्रकारच्या विशिष्ट स्थितीला येऊन पोंहोचलेल्या समाजाचेच आहेत. रानटी स्थितीमध्यें राहणाऱ्या मनुष्याला देशभक्ति आणि राजानिष्ठा हे शब्दही माहीत नसतात तो रानांतील पशूंची शिकार करून थकल्यानंतर जेवढ्या जागेवर निजेल तो त्याचा स्वदेश. आणि राजाबद्दल म्हटलें तर त्याचा तोच राजा. त्याला दुसरा राजा ठाऊक नाहीं. तो प्रजेवांचून राजा असतो. आणि तो जेथें जेथें चालत जातो तेथें तेथें त्याचा स्वदेश त्याच्याबरोबर चालतो. अशा मनुष्याला देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्यांची काय परवा आहे ? परंतु मनुष्य ह्या स्थितींतून वर निघाला, अनेक मनुष्यें एकत्र

राहूं लागलीं, कुटुंबांची संस्था अस्तित्वांत आली, अनेक कुटुंबांतील माणसें कांहीं सामान्य नियमांनीं एकत्र निबद्ध झालीं, त्यांना कांहीं स्थायिकपणा प्राप्त झाला, आपलें घर आपलें दार, आपली जमीन आपलें शेत, अशा प्रकारच्या विचारांनीं आपल्या सभोंवतालच्या वस्तूंवर आपलें प्रेम वाढत जाऊन दृढ झालें, व जें आपलें म्हणून वाटतें तें आपल्यापाशीं चिरकाल सुरक्षित राहावें अशी इच्छा मनाला वाटूं लागली, म्हणजे समाज एका विशिष्ट स्थितीला येऊन पोंहोचतो व त्या वेळीं स्वदेशभक्तीचा विचार मनामध्यें प्रादुर्भूत होतो. स्वदेशभक्ति कशी उत्पन्न होते हें वरील वाक्यांत एका तऱ्हेनें दाखविलें आहे. परतु आजकाल आपल्या डोळ्यांपुढें असणाऱ्या कित्येक उदाहरणांवरून ह्या वरील विवेचनाची प्रचीति आपल्याला पाहतां येण्यासारखी आहे. हॉलंड-मधील कांहीं लोक, ( जे आपल्याला हल्लीं बोअर या नांवानें परिचित झालेले आहेत, ) प्रथमतः दक्षिण आफ्रिकेमध्यें गेले. त्या वेळी त्यांच्या मनामध्यें त्या दक्षिण आफ्रिकेविषयीं देशभक्ति होती असें म्हणतां यावयाचें नाहीं. दक्षिण आफ्रिकेंत गेल्यावर ज्याला जेथें सोय वाटली तेथें त्यानें आपल्याला जागा घेतली. तेथें त्यानें आपलें घर बांधलें. त्याच्या भोंवतीं त्यानें शेतवाडी केली, चार गुरेंढोरें बाळगिली व तो आपल्या उदरनिर्वाहासाठीं आपलें शेत नांगरूं लागला. पुढें त्याला तेथेंच संतति झाली. त्या संततीच्या पोटींही संतति झाली व त्याला वाटूं लागलें कीं, आपण जसे ह्या जमिनीवर सुखानें नांदलों तसेच आपले नातू-पणतूही येथें सुखानें नांदावेत. असल्या प्रकारच्या बंधनांनीं प्रत्येक बोअर मनुष्याची आपल्या लहानशा जमिनीच्या तुकड्यावर अत्यंत ममता उत्पन्न झाली हेच मनोविकार इतर बोअर लोकांच्या मनामध्यें प्रबळ झाले व सर्वांच्याचें हितासाठीं सर्वांना असें वाटूं लागलें कीं, ज्या ठिकाणीं आपण सर्व सुखानें नांदत आहों तें ठिकाण आपलें आहे व तें आपल्याकडेच कायम राहण्याविषयीं आपण प्रयत्न केला पाहिजे. ह्या विचारामध्येंच स्वदेशभक्तीचीं मुळें आहेत. जी स्थिति दक्षिण आफ्रिकेमध्यें दृष्टीस पडते तीच अमेरिकेमध्यें होती व ऑस्ट्रेलियामध्यें आहे सारांश, समाज एका विशिष्ट पायरीपर्यंत येऊन पोंहोचला आणि त्यांतील कौटुंबिक स्थितीचा ग्रामसंस्थास्थितिपर्यंत पूर्ण विकास झाला म्हणजे तेथें देशभक्ति लोकांच्या मनामध्यें उत्पन्न होते.

अशा रीतीनें देशभक्तीचें जनन प्रथमतः होतें, व राजनिष्ठा मागाहून

येते. आपण अमुक अमुक लोक इतक्या इतक्या भागामध्यें राहतों, हा आपला देश आहे, आणि तो आपल्याकडेच राहिला पाहिजे. अशी स्वदेशभक्ति उत्पन्न झाल्यानंतर हा आपला देश आपल्याचकडे कसा राहील, हा प्रश्न लोकांच्या मनामध्यें उद्भवतो. या प्रश्नाचा त्या लोकांना निकाल लावावयाचा असतो. हा प्रश्न बिकट आहे; व निरनिराळ्या लोकांनीं हा प्रश्न निरनिराळ्या रीतीनें सोडविलेला आहे. आपलें व आपल्या देशाचें संरक्षण व्हावें हाच सगळ्यांचा मुख्य मुद्दा असतो. परंतु हा मुद्दा निरनिराळे लोक निरनिराळ्या मार्गांनीं साधून घेतात आपला जो देश आपल्या सगळ्यांचा आहे, त्याचें संरक्षण कसें करावें, ह्या प्रश्नाचें पहिलें आणि स्वाभाविक उत्तर मनुष्याच्या मनाला जें सुचतें तें हें होय की, जर हा आपल्या सगळ्यांचा देश आहे तर त्याचें संरक्षण आणि त्याची व्यवस्था आपण सगळ्यांनीं मिळूनच केली पाहिजे. हें उत्तर सगळ्यांच्या मनाला पटून जेथें याप्रमाणें व्यवस्था होते तेथें तोच लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचा प्रारंभ होय असें समजावें. ह्याप्रमाणें आपल्या देशाच्या संरक्षणाची वगैरे सर्व व्यवस्था करण्याचा अधिकार त्या देशांतील ज्या लोकांच्या हातांमध्यें असतो तेच त्या देशाचे खरे राजे, तेंच त्या देशाचें खरें सरकार, आणि तेच त्या देशाचे खरे बादशहा. मूळचे खरे राजे हे व ह्या मूळच्या खऱ्या पद्धतीप्रमाणें जर सर्व जगावर राज्यकारभार तेथील तेथील लोकांच्याच हातून चालविण्यांत आला असता, तर ही पृथ्वी इतकी दुःखमय कधींही झाली नसती; इतिहासाच्या पुस्तकांची संख्या पुष्कळ कमी झाली असती; खऱ्या शांततेची वाढ अतिशय झाली असती; शेंकडों राज्यक्रांत्या टळल्या असत्या; हजारों लढाया जागच्या जागीं जिरल्या असत्या; लक्षावधि लोकांचे प्राण घेण्याला यमाला दुसरें कांहीं तरी साधन योजण्याची चिंता पडली असती; आणि कोट्यवधि रुपये ज्यांचे त्यांच्याच खिशामध्यें राहिले असते. पण ह्या जगामध्यें राजा हा पदार्थ आला, आणि त्यानें हें सर्व जग दुःखमय करून सोडलें. देशांतील लोकांनीं आपल्या देशावर अधिकार चालवावा आणि आपल्या देशांतील व्यवस्था ठेवावी, हा सरळ मार्ग. परंतु मनुष्यजातीच्या दुर्दैवामुळें तो मार्ग सुटला, लोकांना वाटूं लागलें कीं, आपण स्वतः इतकी सगळी दगदग करण्यापेक्षां कोणी तरी नोकर नेमावा आणि त्याच्याकडून आपल्या देशाच्या संरक्षणाचें वगैरे काम करवून घ्यावें. मनुष्यप्राणी हा स्वभावतःच थोडासा आळशी आहे. त्याला चैनबाजीची ईश्वरा-

च्या सृष्टींतील इतर प्राण्यांपेक्षां जास्त हौस आहे. त्याला आपलें काम आपण करावयाला नको. तें दुसऱ्यांकडून करवून घेण्यांत आपला मोठेपणा आहे अशी एक खोटी कल्पना त्याच्या मनामध्यें प्रबळ झालेली आहे. सिंह हा पशूंचा राजा आहे तरी पण त्याला लागणारें सावज तो आपल्या हातानें मारून खातो. स्वसंरक्षणासाठीं तो आपल्याच नखांचा उपयोग करतो. आपलें संरक्षण करण्यासाठीं तो दुसऱ्यांचीं नखें भाड्यानें आणून ठेवीत नाहीं. सिंह हेंच सिंहाचें सैन्य. सिंहाचें सैन्य हें सिंहाच्या हातांत असतें. ज्याचें सैन्य दुसऱ्यांच्या हातांत गेलें त्याचें संरक्षण काय होणार, हें तत्त्व पशुराजालादेखील समजून त्यानें आपलें सर्व सैन्य नखांच्या रूपानें आपल्या हातामध्यें ठेविलें आहे. हें तत्त्व मनुष्यांनीं लक्षांत बाळगिलें असतें तर आज पृथ्वीवरील कोटयवधि लोकांना स्वसंरक्षणासाठीं जें दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहावें लागत आहे, किंवा गुलामगिरीमध्यें राहावें लागत आहे, तसें करण्याची त्यांना कधींही आवश्यकता उत्पन्न झाली नसती. परंतु मनुष्याचा स्वभाव मिजासखोर पडल्यामुळें त्यास असें वाटूं लागलें कीं, आपल्या देशाच्या सर्व प्रकारच्या व्यवस्थेकरितां आपल्याला कोणी तरी एक नोकर ठेविला पाहिजे. आणि याप्रमाणें कित्येक देशांतून नोकर ठेवण्यांत आले. व त्या नोकरांनाच त्यांनीं राजा असें नांव दिलें. सगळ्याच देशांतील लोक अशा प्रकारचे मिजासखोर नव्हते. रोमच्या लोकांनाही सीझरच्या वेळेपर्यंत असला मिजासखोरपणा सुचला नव्हता. फ्रान्स-मधील लोकांना आपल्या मिजासखोरीपणाबद्दलचीं इतकीं प्रायश्चित्तें मिळालीं कीं, त्यांना आपण कांहीं दिवस मिजासखोर बनलों होतों ह्याच्याबद्दल अत्यंत पश्चात्ताप झाला. व अशा रीतीनें डोळे उघडल्यावर त्यांनीं आपला मिजास-खोरपणा टाकून दिला, आणि आपल्या देशाचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. अमेरिकेंत वसाहत करावयाकरितां गेलेल्या कित्येक लोकांनीं दुसऱ्यांच्या अनुभवावरून शहाणपणा शिकून पूर्वीपासूनच मिजासखोरपणा आपल्यापासून दूर ठेविला होता. जगांत येऊन स्वदेशाच्या बाबतींत मिजासखोर न झालेल्या लोकांपैकीं वर दिलेलीं हीं कांहीं ठळक ठळक उदाहरणें आहेत. बाकी ठिकाण-च्या लोकांनीं आपलें कामकाज आपल्या चाकरावर सोंपविलें व आपण स्वस्थ झोंपीं गेले. ह्या व्यवस्थेचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला. देशाच्या मूळच्या खऱ्या धन्यांचीं गळसूत्रें हळूहळू आवळून टाकण्यांत आलीं आणि

जे चाकर होते ते अखेरीस रुद्राजीबुवा झाले. नंतर ह्यांचें प्रस्थ लोकांमध्यें कायम राहावें, ह्यांच्या दुर्गुणाबद्दलही लोकांमध्यें पूज्यभाव असावा, ह्यांनीं केलेल्या अन्यायाबद्दलही लोकांनीं 'न्याय, न्याय' म्हणून तारीफ करावी, आणि ह्यांनीं केलेल्या अत्यंत निष्ठुरपणाच्या जुलमाबद्दलही लोकांना गुद्गुल्या व्हाव्या, ह्यासाठीं त्या मूळच्या चाकरांनीं, परंतु पुढें बनलेल्या रुद्राजीबुवांनीं राजनिष्ठा म्हणून एक थोतांड निर्माण केलें. ह्या ऐंद्रजालिकानें सर्व लोकांचीं मनें भारून टाकल्यापासून राजांना वाटतील त्या गोष्टी करतां येऊं लागल्या. वाटेल त्या अन्यायावर आपोआप पांघरूण पडूं लागलें; आणि वाटेल तो जुलूम न्यायाच्या नांवाखालीं खपूं लागला. कारण, लोक राजांचा अन्याय दाखवूं लागतील तर ते राजनिष्ठा दाखवीत नाहींत अशा प्रकारची घोरपड आपल्यावर येईल अशा भीतीनें जे मूळचे देशाचे धनी होते ते राजनिष्ठेच्या दाबाखालीं दडपून गेले, आणि जे मूळचे देशाचे नोकर होते त्यांनीं आपलीं डोकीं सवाच्या वर काढलीं. राजनिष्ठा हें शस्त्र राजांच्या हातांत आल्याबरोबर राजांची निम्मी भीति कमी झाली; आणि ह्या राजनिष्ठेनें वाईट राजांना अन्याय आणि जुलूम करण्याची मोकळीक मिळाली. एखादा जादूगार ज्याप्रमाणें आपल्या प्रेक्षकाची नजर बद्द करून, मग त्यांच्यापुढें आपले वाटेल ते खेळ चालवितो, पैसा असला तर तो रुपया आहे असें दाखवितो किंवा रुपया असला तर तो पैसा आहे असें दाखवितो, ज्या पिशवींत कांहीं नसतें त्यांतून रुपये काढतो आणि आपल्या समक्ष आपल्या पिशवींत रुपये ठेवून ते नाहींसे करून टाकतो, त्याप्रमाणें राजनिष्ठेच्या मंत्रानें लोकांची नजर बंद करून राजांनीं आजपर्यंत अनेक प्रकारचे खोटे जादूचे खेळ करून लोकांना फसविल्याचीं उदाहरणें इतिहासामध्यें अनेक आहेत. अशा प्रकारची अनेक प्रसंगीं उपयोगी पडणारी राजनिष्ठा वाईट राजांनीं केवळ आपल्या फायद्याकरितां शोधून काढली आहे.

येथपर्यंत देशभक्ति आणि राजनिष्ठा यांची आदि उत्पत्ति कशी झाली ह्याच्याबद्दल थोडेंसें विवेचन केलेलें आहे. ह्या विवेचनावरून हें कोणाच्याही लक्षांत येईल कीं, देशभक्ति ही आधींची आहे व राजनिष्ठा ही नंतरची होय. देशभक्ति ही थोरली बहीण आणि राजनिष्ठा ही धाकटी बहीण होय. देशभक्ति ही सर्वांच्या मनामध्यें एकदम उत्पन्न होते. राजनिष्ठा लोकांच्या मनांत उत्पन्न व्हावी, अशी इच्छा राजाच्या मनांत प्रथमतः उत्पन्न होते आणि नंतर तो

भीतीच्या, कायद्याच्या वगैरे साधनांनीं ती लोकांच्या मनामध्यें उत्पन्न झाली आहे अशी आपल्या मनाची समजूत करून घेतो. देशभक्ति ही मनुष्याच्या मनांत स्वाभाविकपणें उत्पन्न होते. राजनिष्ठा लोकांच्या मनामध्यें उत्पन्न करण्याला कृत्रिम प्रयत्न करावे लागतात एक नैसर्गिक आहे, दुसरी मारून मुटकून आणावी लागते. एक सर्वांच्या फायद्याची आहे, दुसरी एकाच व्यक्तीच्या फायद्याची आहे. पूर्वीं जें विवेचन केलेलें आहे त्यावरून पाहिलें असतां हें दिसून येतें कीं, देश पहिला आणि राजा दुसरा. देशासाठीं राजा, राजासाठीं देश नव्हे. देशाचा सुरक्षितपणा व देशाची व्यवस्था नीट रीतीनें चालावी म्हणून राजा अस्तित्वांत आला. राजाला आपला अंमल गाजवितां यावा म्हणून देश अस्तित्वांत आला असें नव्हे. हा मूळ मुद्दा लक्षांत आणून देशांतील लोकांनीं देशावर किती भक्ति करावयाची आणि राजावर किती निष्ठा ठेवावयाची याचा विचार ठरविला पाहिजे. देशाचा फायदा होत आहे तथपर्यंत राजनिष्ठेला चिकटून राहणें अत्यंत आवश्यक आहे. व जेव्हां राजे चांगले असतात आणि त्यांच्या प्रत्येक कृतीनें त्यांच्या अमलाखालील देशाचें कल्याणच होत असतें, तेव्हां राजनिष्ठा हा अत्यंत उत्तम सद्‌गुण होय. परंतु मागील इतिहासाकडे पाहिलें तर सर्वच राजे चांगले झालेले आहेत असें नाहीं. राजामध्येंही वाईट आणि जुलमी राजे आहेतच. अशा प्रसंगीं जेव्हां त्या वाईट आणि जुलमी राजांच्या कृतीनें देश बुडूं लागतो, त्या वेळेला राजनिष्ठेला चिकटून राहणें हा उत्तम सद्‌गुण नव्हे, हें तत्त्व आजपर्यंतच्या इतिहासाच्या पर्यालोचनावरून सिद्ध होतें. देशासाठीं राजा आणि राजनिष्ठा; पण ज्याच्यासाठीं राजा आणि राजनिष्ठा, तो देशच जर त्या राजाच्या कृतीनें रसातळाला जाऊं लागेल तर मग त्या राजाबद्दल राजनिष्ठा बाळगून काय करायचें आहे ! जिच्यापासून इष्ट हेतु जो स्वदेशकल्याण तो साधत नाहीं, तर उलट बिघडतो, असली राजनिष्ठा काय कामाची ? लोक हे राजांवर, त्यांची कृति कशीही असली तरी, निष्ठा ठेवण्यासाठीं देवानें बनविलेले नाहींत. लोक हे राजांचे पुजारी म्हणून निर्माण केलेले नाहींत. लोकांना मुख्य स्वदेशकल्याण पाहिजे असतें, आणि त्यासाठीं त्यांनीं राजनिष्ठा हें एक राजालाही पसंत असलेलें असें साधन आपल्या हातांमध्यें घेतलेलें असतें. त्या साधनापासून जर साध्य साधत नसलें तर त्या साधनाचें ओझें हातांत बाळगून काय करावयाचें आहे ?

देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्या तत्त्वांमध्यें कधीं कधीं एकवाक्यता असते. परंतु वाईट राजांच्या कारकीर्दींत ह्या दोघांच्यामध्यें तुमुल युद्ध माजतें. इंग्लंडच्या गादीवरील पहिल्या चार्लसच्या कारकीर्दींत क्रॉमवेलच्या मनामध्यें देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्यांच्या दरम्यान कांहीं वेळपर्यंत भयंकर युद्ध जुंपलेलें होतें. परंतु अखेरीस देशभक्तींचेंच वर्चस्व झालें व इंग्लिश लोक क्रॉमवेलला आज जो मान देत आहेत तो त्याच्या देशभक्तीनें त्याच्या राजनिष्ठेवर जो जय मिळविला त्याच्याबद्दलच होय. १७८९ मध्यें सोळाव्या लुईच्या हातून किंवा १८४८ मध्यें लुई फिलिपच्या हातून फ्रेंच लोकांनीं राजाचे अधिकार काढून घेतले त्या वेळीं त्यांच्या मनामध्यें राजनिष्ठा नव्हती असें नाहीं. परंतु राजनिष्ठेपेक्षां देशभक्ति जास्त होती. राजाच्या खुशामतीसाठीं आपल्या देशाचा नाश करून घेण्याला ते लोक तयार नव्हते. ज्यांनीं लुई फिलिपच्या हातून राज्यसूत्रें खालीं ठेवविलीं आणि ज्यांनीं डचेस ऑफ आर्लियन्सची रीजन्सीही मान्य केली नाहीं, त्या फ्रेंच लोकांची अशी पक्की खात्री झालेली होती कीं, ह्या वेळीं राजनिष्ठा दाखविली तर आपल्या देशाचें सर्वस्वीं नुकसान होणार आहे. म्हणून त्यांनीं राजनिष्ठा बाजूला सारून देशभक्तीचा अंगीकार केला. सारांश, राजनिष्ठेला गौण मानून प्रसंगविशेषीं देशभक्तीच्या मार्गानें राष्ट्रेंच्या राष्ट्रें गेल्याचीं उदाहरणें इतिहासामध्यें अनेक आहेत. ह्यावरून देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्यांच्यामध्यें लढा पडला तर राजनिष्ठा सोडून देशभक्तीलाच वर्चस्व दिलें पाहिजे हें उघडपणें सिद्ध होतें.

देशभक्ति आणि राजनिष्ठा हीं दोन्हीही मनुष्याचीं कर्तव्यकर्में आहेत. परंतु त्या दोघांमध्यें जेथें विरोध उत्पन्न होईल तेथें तात्पुरत्या फायद्यासाठीं हातीं धरलेली राजनिष्ठा सोडून देऊन सर्वांच्या कल्याणाला साधनीभूत अशी देशभक्ति अंगीकारिली पाहिजे, हें वर दाखविलें आहे. आतां ह्या दोन्ही कर्तव्यकर्मांचे मनुष्याच्या मनावर काय काय निरनिराळे परिणाम होतात हें आपण थोडक्यांत पाहूं. देशभक्तीनें मनुष्याचें मन उदात्त होतें. परंतु राजनिष्ठेनें बऱ्याच प्रसंगीं मनुष्याचें मन तितकें उदात्त राहत नाहीं. राजनिष्ठा ही पुष्कळ प्रसंगीं कांहीं तरी हेतूनें उत्पन्न झालेली असते. राजनिष्ठा ही पहिल्यानें राजानें आपल्या फायद्याकरितां उत्पन्न केली हें खरें, परंतु पुढें पुढें प्रजेपैकींही कित्येक

लोक त्या राजनिष्ठेपासून आपला फायदा करून घेऊं लागले आणि अखेरीस तर सर्व लोक भीतीसाठीं किंवा नफ्यासाठीं राजनिष्ठ होऊं लागले, 'एक्सरेज' च्या नवीन निघालेल्या साधनानें शरीराच्या आंतील भागही ज्याप्रमाणें स्पष्ट पाहावयाला सांपडतात, त्याप्रमाणें मनुष्याच्या अंतःकरणामध्यें खरें काय आहे हें ज्याच्या योगानें दिसेल असें जर एखादें यंत्र कोणी शोधून काढलें असतें आणि तें जर आजपर्यंत होऊन गेलेल्या राजांच्या हातांमध्यें दिलें असतें आणि त्या यंत्रामधून त्या राजांनीं आपल्या सभोंवतालीं पायांत राजनिष्ठेचे चाळ बांधून नाचणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांकडे पाहिलें असतें, तर खरोखर त्यांना ह्या जगाचा वीट आला असता. त्यांना आपल्या सभोंवतीं किती घाण दिसली असती! आपल्या आसमंतात्भागीं किती घाणेरडे, तुच्छ आणि क्षुद्र मनोविकार भरलेले त्यांना दिसले असते. वर सांगितलेल्या प्रकारच्या यंत्रांतून त्यांनीं आपल्या राजानिष्ठ म्हणून म्हणवून घेणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांकडे पाहिलें असतें तर त्यांना खरी राजनिष्ठा कोठें दिसली असती! राजनिष्ठा हें आपलें कर्तव्यकर्म आहे म्हणून राजनिष्ठा, अशी निष्कलंक राजनिष्ठा त्यांना कोठें दिसली असती! कोणी तरी कांहीं तरी निमित्तानेंच राजनिष्ठ झालेले त्यांना दिसले असते. कोणी स्वतःला चाकरी मिळावी म्हणून राजनिष्ठ तर कोणी आपल्या मुलाला चाकरी मिळावी म्हणून राजनिष्ठ, कोणी जहागीर मिळविण्यासाठीं राजानिष्ठ तर कोणी मिळविलेलं इनाम कायम राखण्यासाठीं राजनिष्ठ, कोणी पैशासाठीं राजनिष्ठ तर कोणी पदवीच्या नुसत्या शब्दासाठीं राजनिष्ठ, कोणी लांच खाण्यासाठीं राजनिष्ठ तर कोणी खाल्लेला लांच पचविण्यासाठीं राजनिष्ठ, अशा प्रकारचीं राजनिष्ठेचीं हिडीस आणि विद्रूप स्वरूपें आपल्या सभोंवतीं जिकडे तिकडे पसरलेलीं पाहून त्या राजांना खराखर असलया राजनिष्ठेचा किळस आल्यावांचून राहिला नसता. सारांश, राजनिष्ठा ही बऱ्याच प्रसंगीं कांहीं तरी हेतूनें उत्पन्न झालेली असते, परंतु देशभक्तीची गोष्ट तशी नाहीं. राजनिष्ठा दाखवून राजाची मर्जी संपादन करण्यापासून तसें करणाराचा तात्कालिक फायदा होतो, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. परंतु देशभक्ति केल्यापासून ती करणाराला तसा काय फायदा आहे? आपल्या पुढें पुढें नाचणाराला किंवा आपल्या अतिशय उत्तम तोंडपुजाला राजा एखादा गांव इनाम देईल, किंवा मोठी पदवी बहाल करील. तसें देशभक्ति

करणाराला काय मिळावयाचें आहे? देश त्याला काय देणार? पण कांहीं घ्यावयाला नकोच असतें. देशानें आपल्याला कांहीं तरी द्यावें आणि त्यासाठीं आपण त्याच्यावर प्रीति करावी, ही बुद्धीच अशा मनुष्यांच्या मनामध्यें नसते. राजनिष्ठा जसा देवघेवीचा व्यापार मांडते तसा देशभक्ति मांडीत नाहीं. हा आपला देश आहे, एवढ्याचकरितां लोक त्याच्यावर प्रीति करितात. त्याच्यापासून कांहीं फलप्राप्ति होईल ह्या इच्छेनें करीत नाहींत. देशभक्ति ही निर्हेतुक असते, राजनिष्ठेसारखी ती सहेतुक नाहीं. ' अकिंचिदपि कुर्वाणः सुखैर्दुखान्यपोहति । तत्तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः ॥ ' ह्या भवभूतीच्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें देशभक्तीची स्थिति आहे; व ' आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ' ह्या बृहदारण्यकांतील वचनाप्रमाणें राजनिष्ठेची गोष्ट आहे. देशभक्ति ही निष्कामसेवा आहे, परंतु राजनिष्ठा ही सकाम उपासना आहे. हा ह्या दोहोंमध्यें मुख्य फरक असल्यामुळें एकानें मन उच्च होतें व दुसऱ्यानें नीचतेला जातें. देशभक्तीची वाट स्वतंत्रतेकडे जाते आणि राजनिष्ठेचा शेवट गुलामगिरीमध्यें होतो. चांगल्या राजांच्या ठिकाणीं राजनिष्ठा असली तर ती चांगलीच. परंतु वाईट राजांच्या ठिकाणीं राजनिष्ठा म्हणजे नीच कर्माला सुरवात. त्या स्थितींत तोंडपुजेपणाचा दुर्गुण लोकांच्या अंगांत विशेष भिनतो, सदसद्विवेकबुद्धीला झोंप लागते, स्वदेशबांधवांच्या खऱ्या हिताच्या कल्पनेवर पाणी पडतें, न्यायबुद्धि मलिन होते, आणि सन्मार्गानें उदरनिर्वाहाचें साधन संपादन करण्याची महत्त्वाकांक्षा लुप्त होते. परंतु देशभक्तीनें मनाची स्थिति ह्याच्या अगदीं उलट होते. अमुक फायदा होत आहे म्हणून अमुक कृत्य करावें असली क्षुद्र बुद्धि त्या ठिकाणीं बिलकुल नसते. आपल्या देशासाठीं आजपर्यंत जे हजारों लोक मेले आहेत ते काय फायदा पाहून मेले! त्यांचा कोणता फायदा झाला! जेथें फायदा मोजून त्याप्रमाणें कृत्य करण्यांत येतें तेथें महत्कृत्य व्हावयाचेंच नाहीं, म्हणून समजावें. असली क्षुद्र बुद्धि ज्या मनांत असेल तेथें रजोगुण किंवा तमोगुण आहे म्हणून समजावें, परंतु अत्यंत दृढ भक्ति आणि निःसीम प्रेम हे सत्त्वगुणाचे परिणाम आहेत.

वरील एकंदर विवेचनावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्यांच्यापेकीं देशभक्तीलाच अग्रस्थान दिलें पाहिजे. देशभक्ति ही प्रत्येक मनुष्याच्या मनामध्यें सदासर्वदा वास्तव्य करीत असली पाहिजे. राजा चांगला असेल त्या वेळेला ( हल्लींच्याप्रमाणें ) देशभक्ति आणि राजनिष्ठा ह्यांची एकवाक्यताच असते. कारण, त्या वेळीं राजावर निष्ठा ठेविल्यानेंच देश-भक्ति केल्याचें श्रेय प्राप्त होतें, परंतु जेव्हां राजा वाईट असेल त्या वेळेला राज-निष्ठेपेक्षां देशभक्तीचें महत्त्व जास्त आहें हे कोणीही विसरतां कामा नये.

———

# चांगला राजा व राजनिष्ठा : : : १२

काळ : अग्रलेख, ता. १९-९-१९०२

★ राजनिष्ठा वाईट राजांकरितां. चांगल्या राजांच्या कारकीर्दींत लोक कायद्यावांचून राजनिष्ठ असतात.

गेल्याच्या मागील अंकांत राजनिष्ठेच्या कल्पनेची उत्पत्ति आणि तिच्यापासून मनावर होणारे परिणाम ह्यांच्याबद्दल थोडासा विचार करण्यांत आलेला आहे. आज त्या राजनिष्ठेचा चांगले राजे किती उपयोग करितात याच्याबद्दल आपण थोडासा ऊहापोह करूं.

पूर्वीं केलेल्या विवेचनावरून वाचकांच्या हें लक्षांत आलेलेंच असेल कीं, राजनिष्ठा ही राजांनीं आपल्या संरक्षणाकरितां आणि आपल्या फायद्याकरितां नवीन उत्पन्न केलेली एक कल्पना आहे. अशा दृष्टीनें राजनिष्ठेकडे पाहिलें असतां राजनिष्ठा ही आपल्या आधारासाठीं राजांनीं आपल्या हातामध्यें घेतलेली एक यष्टि आहे. आपल्या राज्यकारभाराच्या विस्तृत प्रदेशावर चालतांना टेकण्यासाठीं राजांनीं आपल्या हातामध्यें धारण केलेली ही एक काठी होय. परंतु ह्यापुढें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, ह्या काठीवर अतिशय टेकतो कोण ? ह्या काठीच्या अतिशय आधाराची जरूर कोणत्या राजाला असते ? ह्या काठीवर वारंवार टेकण्याची अतिशय आवश्यकता कोणत्या राजाला उत्पन्न होते ? आणि ह्या काठीची यत्किंचितही मदत

घेतल्यावांचून आपण आपल्या राज्यकारभाराच्या प्रदेशांतून सर्वतोपरी सुखानें संचार करूं अशी धमक कोणत्या राजांच्या मनामध्यें असते, हे प्रश्न खरोखर विचार करण्यासारखे आहेत. राजांचे स्वाभाविकपणेंच दोन वर्ग होऊं शकतात. एक चांगले राजे आणि दुसरे वाईट राजे, असे राजांचे दोन वर्ग केले, तर ह्यांपैकीं राजनिष्ठेच्या काठीची आवश्यकता जास्त कोणाला आहे, ह्या प्रश्नाचें उत्तर प्रत्येक मनुष्याला कळण्यासारखें आहे. चांगल्या राजाचे पाय भक्कम असतात. परतु वाईट राजा हा पायांकडून लंगडा असतो, त्यामुळें वाईट राजाला राजनिष्ठेची विशेष आवश्यकता भासते. आपण असें पाहतों कीं, जो मनुष्य पायांनीं धट्टाकट्टा आहे त्याला चालावयाचें झालें तर तो आपल्या पायांच्या जोरावर चालूं शकतो. परंतु एखाद्या लंगड्या मनुष्याला चालावयाचें झालें तर त्याला काठीवांचून एक पाऊलही टाकतां येत नाहीं. वाईट राजे हे अशा प्रकारचे लंगडे माणूस आहेत. राजनिष्ठेची काठी हातांत धरल्यावांचून त्यांना एक पाऊलही पुढें टाकतां येत नाहीं. आपला सर्व भार त्या राजनिष्ठेच्या काठीवर घातल्यावांचून त्यांचें काम चालत नाहीं. जरा कांहीं हालचाल करावयाची झाली तरीदेखील पहिल्यानें आपली काठी कोठें आहे, याचा शोध लंगडा मनुष्य करितो, त्याप्रमाणें वाईट राजाला कांहीं गोष्ट कर्तव्य झाली तर तो जेथें तेथें आधीं राजनिष्ठेचें बुजगावणें पुढें करीत असतो.

एखादा अप्रबुद्ध मनुष्य म्हणेल कीं, वाईट राजे लंगडे असतात हा सिद्धान्त कोठला काढला आहे ? पुष्कळ वाईट राजे घोड्यावर चढतात, घोड्याला भरधांव पळवितात, शिकारीला जातात, श्वापदांच्या पाठीमागून प्रसंगविशेषीं स्वतःही भरधांव पळतात, आपल्या पायांनीं गरीब लोकांना लाथा मारतात, आणि शत्रूची डोकीं तुडवितात. सारांश, पायांनीं करावयाचें जें चलनात्मक कर्म तें सर्व ते आपल्या पायांनीं करीत असल्याबद्दलच्या हकीकती इतिहासांतून वाचण्यांत आलेल्या आहेत. असें असून वाईट राजांना पाय नसतात, आणि ते लंगडे असतात असें म्हणून कसें चालेल ? ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं, येथें पाय म्हणजे पायच नव्हेत. राजांचे पाय म्हणजे कातड्यांनीं झाकलेले मांसाचे गोळे नव्हेत. न्याय आणि नीति हे राजाचे पाय होत. गुडघ्यांतील बिजागरांनीं एकांत एक बसविलेलीं लांब लांब हाडें म्हणजे राजाचे पाय नव्हेत. तर ईश्वरीसूत्रानें

आणि मनुष्याच्या सदसद्विवेकबुद्धीनें सांगड घालून दिलेले न्याय आणि नीति हे राजाचे पाय होत. राजाच्या पायां पडण्याची चाल कित्येक देशांतून आहे, त्याचा खरा अर्थ न समजून मूर्ख लोक एखाद्या गुलामाप्रमाणें भलत्याच ठिकाणीं आपल्या पाठींचे कणे वांकवून, मानेचे कांटे मोडून, आणि नाकाच्या बोंडच्या झिजवून घेत असतात. पण राजांच्या पायांचें वंदन करावयाचें ह्यांचा हा अर्थ नव्हे. राजाच्या पाया पडणें म्हणजे त्याच्या पायाच्या नखाच्या टोंकांनीं आपल्या कपाळाच्या कातडीवर ओरखडे काढून घ्यावयाचे नाहींत. राजाच्या पाया पडावयाचें म्हणजे त्याच्या पायांतील हाडांवर आपल्या नाकांतील आणि कवटींतील हाडांचे जुडगे ठेवणें असा अर्थ नव्हे, किंवा त्याच्या पायावर सांचलेला धुरळा आपल्या डोक्यावर उधळून घेणें असाही अर्थ नव्हे. आपल्या डोक्यावर धुरळा उडवून घेण्यांत गाढव किंवा डुकरें यांना गम्मत वाटते. मनुष्यांना यांत फुशारकी वाटण्यासारखें कांहीं नाहीं. राजा हा एक मनुष्यच असतो आणि सर्व मनुष्यें येथून तेथून सारखींच. तेव्हां एकानें दुसऱ्याच्या पाया पडण्याचें वास्तविक कांहीं एक कारण नाहीं पण असें असूनही जर ही चाल पडलेली आहे तर ती अर्थात् केवळ पायाच्या कातड्यावर नाकाचें कातडें घांसण्याच्या उद्देशानें नव्हे. त्यांत ह्याच्यापेक्षां कांहीं तरी जास्त गूढ अर्थ असला पाहिजे. राजाच्या पायांचें वंदन म्हणजे राजाचे धर्म आणि नीति हे जे दोन पाय त्यांचें वंदन होय. राजाचें शरीर किंवा त्यांतील चरणादिक अवयव किंवा त्यांतील रक्तमांसादि घटक हे वंद्य नव्हेत, तर राजापासून प्रसव पावणारे जे न्यायनीति वगैरे सद्धर्म ते वंद्य होत. राजापासून उत्पन्न होणारीं न्याय, नीति, इत्यादिक जीं उदात्त तत्त्वें त्यांमध्यें आपल्या अंतःकरणतत्त्वाचें जें तल्लीनतेनें संमीलन होतें तें राजाचें खरें पादवंदन होय. स्वतंत्र लोक न्यायी राजाचें पादवंदन जें करितात तें अशा रीतीनेंच करितात. आतां पायावरील धुळीमध्यें एखाद्या गर्दभाप्रमाणें आपलें डोकें लोळवून घेण्याचा जो प्रकार आहे तो बहुधा पशुवर्गामध्यें मोडणाऱ्या गुलाम लोकांच्या ठिकाणीं मात्र दृष्टोत्पत्तीस येतो. ह्यावरून पाहिलें असतांही आपल्या सहज लक्षांत येईल कीं, वरीलसारख्या ठिकाणीं चर्माचे पाय हे राजाचे पाय आहेत असा अर्थ अभिप्रेत नाहीं. न्याय, नीति, इत्यादिकांना राजाच्या पायांची उपमा देण्यामध्यें आणखी असाही एक गर्भित अर्थ आहे कीं, मनुष्य जसा आपल्या पायांवर उभा राहून चांगल्या रीतीनें

चालूं शकतो, त्याप्रमाणें राजाला जर चांगल्या रीतीनें चालावयाचें असेल तर त्यानें न्याय, नीति, इत्यादि सद्धर्मरूपी पायांचाच उपयोग केला पाहिजे, व न्याय आणि नीति ह्या पायांवरच त्यानें उभें राहावयाला शिकलें पाहिजे.

अशा दृष्टीनें पाहिलें असतां हें उघड दिसून येतें कीं, न्याय आणि नीति हेच राजाला खरे आधार देणारे पाय होत. हे पाय ज्या राजाचे भक्कम आहेत त्या राजाला हातांत टेकण्याकरितां काठी धरण्याची बिलकुल आवश्यकता नाहीं. पण ज्यांचे हे पाय लंगडे झालेले आहेत, ज्यांच्या ह्या न्यायाच्या आणि नीतीच्या पायांवरून वारें गेलेलें आहे, त्यांना राजनिष्ठेच्या काठीच्या साहाय्यावांचून एकही पाऊल टाकितां आलें नाहीं तर त्यांत काय आश्चर्य आहे ! ज्याचे न्याय आणि नीति हे पाय दुर्बुद्धिरूपी वायूच्या विकारानें लुले पडलेले आहेत त्यानें राजनिष्ठेच्या काठीवर सर्वस्वीं आपला भार टाकिल्यावांचून त्याला कसें बरें चालतां येईल ? असला राजा कोठेंही जाऊं लागला किंवा कांहींही करूं लागला तरी आधीं आपली राजनिष्ठेची काठी सरसावून ठेवितो आणि मग तें कृत्य करण्याला प्रवृत्त होतो. चांगला राजा राजनिष्ठेच्या काठीची मुळींच अपेक्षा बाळगीत नाहीं. तो आपले बहुतेक व्यवहार राजनिष्ठेच्या काठीची यत्किंचितही मदत घेतल्यावाचून पूर्णपणें पार पाडूं शकतो. त्याची विचारसरणीच अगदीं भिन्न असते. वाईट राजाच्या विचारसरणीपेक्षां तिच्यामध्यें किती तरी निराळेपणा असतो ! तो आपल्या मनाशीं असें म्हणतो कीं, मजवर लोकांनीं प्रीति करणें किंवा अप्रीति करणें हें माझ्या न्यायावर किंवा अन्यायावर अवलंबून आहे. मी न्याय करण्याकरितां ह्या स्थानावर आरूढ झालों आहें. तो न्याय मी करीत असलों म्हणजे माझ्यावर प्रीति करण्याविषयीं लोकांना सांगावयाला पाहिजे असें नाहीं. न्यायावर प्रीति करणें हा मनुष्याच्या अंतःकरणाचा एक ईश्वरनिर्मितच धर्म आहे. त्याप्रमाणें मीं न्यायाचरण केलें तर लोक मजवर प्रीति करतीलच करतील मग त्यांनीं माझ्याबद्दल राजनिष्ठा दाखवावी असा मीं निर्बंध करून ठेवण्यांत काय विशेष फायदा आहे ? अशा रीतीनें खरा चांगला राजा असतो तो राजनिष्ठेसंबंधानें पूर्णपणें उदासीन असतो. पण तो राजनिष्ठेबद्दल उदासीन होऊनच राहत नाहीं; तर तो ह्याच्याही पुढें दोन पावलें जातो. तो राजनिष्ठा असलीच पाहिजे असें म्हणत नाहीं इतकेंच नव्हे, तर ह्याच्याहीपेक्षां जास्त बेपर्वाई तो राजनिष्ठेसंबंधानें दाखवीत असतो. कारण त्याच्या

विचाराची दिशाच निराळी असते. तो म्हणतो कीं, लोकांचें कल्याण करणें माझें कर्तव्यकर्मच आहे. मला ईश्वराच्या कृपेनें लोकांनीं जें ह्या गादीवर बस विलें आहे, तें मीं लोकांचें कल्याण करावें ह्यासाठीं बसविलें आहे. माझ्या हातामध्यें हें ऐश्वर्य आणि हे ऐषआराम चिरकाल राहावेत म्हणून त्यांनीं मल ह्या गादीवर बसविलेलें नाहीं. लोकांना मी पाहिजे आहे असें नाहीं, त्यांना त्यां कल्याण पाहिजे आहे. आणि तें माझ्या हातून होईल अशा समजुतीनें त्यांनीं मल ह्या गादीवर बसविलेलें आहे. तेव्हां त्यांचें कल्याण करणें हें माझें आद्य कर्तव्यक आहे. लोकांच्या कल्याणाच्या ज्या ज्या गोष्टी असतील त्या त्या मीं केल्य पाहिजेत व त्यांच्या कल्याणाच्या ज्या ज्या गोष्टी असतील त्या त्या मीं त्यांना कर दिल्या पाहिजेत. थड पाण्याच्या खालीं विस्तव लाविला असतां तें कढत हो किंवा जमिनीमध्यें एक दाणा पेरिला असतां त्याच्याप्रमाणें दहा दाणे उगवतात इत्यादि प्रकारचीं सहस्रावधि निरनिराळीं ज्ञानें जीं जगामध्यें पसरलेलीं आहेत, तीं मी का चालूं देतों ? तीं लोकांच्या उपयोगाचीं आहेत म्हणून. व ह्याप्रमाणे ह्या लोकोपयोगाच्या तत्त्वावर प्रत्येक प्रकारच्या ज्ञानाला या जगामध्यें प्रसृत होण्याचा अधिकार आहे. व असें जर आहे तर मग एखादें ज्ञान माझ्याविरुद्ध असूनही जर तें लोकोपयोगी असेल तर तें लोकांमध्यें प्रसृत होऊं लागल्यास त्याला मीं प्रतिबंध काय म्हणून करावा ? मी जर कांहीं अन्याय करीत असलों तर ते लोककल्याणासाठीं बाहेर येणें जरूर नाहीं काय ! परंतु ते माझे अन्याय उघडकीस येणें ही गोष्ट माझ्या विरुद्ध आहे, म्हणून एवढ्याचसाठीं जर मी माझ्या त्या अन्यायांबद्दल ज्ञानाच्या प्रसाराला प्रतिबंध करीन, तर मी एका रीतीनें लोककल्याणाला प्रतिबंध केल्यासारखें होणार नाहीं काय ? आणि मग मी लोककल्याणासाठीं म्हणून नेमला गेलेला असून त्याचा काय उपयोग झाला ? माझ्या अन्यायाबद्दलच्या ज्ञानाच्या प्रसाराला जर मीं प्रतिबंध केला, तर तें मीं माझें स्वतःचें कल्याण करून घेतलें असें होईल. पण माझें कल्याण होवो किंवा अकल्याण होवो, लोकांचें कल्याण मला कर्तव्य आहे. ह्याकरितां माझ्या अन्यायाबद्दलच्या ज्ञानाचाही प्रसार होत असला तरी देखील तो मीं होऊं दिला पाहिजे. अशा प्रसंगीं मी जर राजनिष्ठा आदिकरून शब्दांचा बाऊ दाखवून त्या ज्ञानाचा प्रसार होऊं दिला नाहीं, तर ज्या मीं लोककल्याण करावयाचें त्याच माझ्या हातून लोकांच्या कल्याणाला प्रतिबंध केल्याचें पातक घडल्या-

सारखें होईल. यासाठीं माझ्या व्यक्तीच्या विरुद्ध असूनही जर सार्वजनिक कल्याणाचें एखादें ज्ञान असेल तर तेंही ज्ञान प्रसृत होण्याला मीं अडथळा करितां कामा नये. अशा प्रकारचीं उदात्त तत्त्वें चांगल्या राजांच्या मनामध्यें घोळत असतात. व ज्यांचे विचार असे नाहींत ते चांगले राजे नव्हतच म्हणून समजावें. स्वार्थनिरपेक्षतेशिवाय असले उदात्त विचार मनामध्यें यावयाचेच नाहीत. चांगल्या राजांचें हेंच लक्षण कीं, ते नेहमीं लोककल्याणासाठीं दक्ष असतात. स्वार्थसाधनासाठीं लोलुप असणारे राजे हे चांगल्या राजांमध्यें कधींही मोडत नाहींत. चांगल्या राजांना राजनिष्ठेची आवश्यकताच भासत नाहीं. अमक्यानें असें केलें आणि तमक्यानें तसें विचारलें, हें त्यांनीं राजनिष्ठापूर्वक केलें नाहीं, असल्या शुष्क प्रश्नांमध्यें चांगले राजे आपला वेळ दवडीत नाहींत. आपण लोककल्याणासाठीं नीतीनें वागत आहों किंवा नाहीं, आणि लोककल्याणासाठीं न्याय केला आहे किंवा नाहीं, ह्या प्रश्नांचेंच चांगले राजे सदोदित चिंतन करीत असतात. राजनिष्ठेच्या दचकावणीशिवाय वाईट राजांचें एकही कार्य शेवटास जाणें शक्य नसतें. परंतु चांगल्या राजांच्या वेळीं राजनिष्ठा हा शब्दही जरी कोणाला माहीत झालेला नसता तरी देखील त्यांनीं आपली राज्यव्यवस्था अतिशय उत्तम प्रकारची ठेवून लोकांचें अतिशय कल्याण करून देण्यामध्यें अंतर पाडलें नसतें.

आणि वास्तविक पाहतां ह्या राजनिष्ठेच्या कल्पनेची जगाला आवश्यकता नाहींच. राजनिष्ठेचें अस्तित्व मानणें हें कल्पनेचें एक गौरव आहे. तर्क आदिकरून शास्त्रांमध्यें कल्पनेचें लाघव हा एक गुण म्हणून समजला जातो, व गौरव हा दोष असें मानण्याचा परिपाठ आहे. एखाद्या वस्तुस्थितीची उपपत्ति सांगण्याकरितां कांहीं कल्पना कराव्या लागतात. अशा कल्पना करण्याचा जेथें प्रसंग येतो तेथें कोणी थोड्या कल्पना करून उपपत्ति जुळवून देतात आणि कोणाला तीच उपपत्ति सांगण्याकरितां अनेक कल्पनांचा वृथा अंगीकार करावा लागतो. अशा ठिकाणीं थोड्या कल्पनेनें निर्वाह होत असतां उगीच जास्त कल्पना करणें हा गौरवनामक दोष होय, म्हणून मानतात तशा प्रकारच्या कल्पनागौरवाचा दोष ह्या राजनिष्ठेच्या कल्पनेवर येऊं शकतो. वास्तविक

लोकांची प्रीति कोणावर बसते ? आणि वास्तविक लोकांना काय आवडतें ? राजाच्या अंगचे न्याय, नीति इत्यादिक सद्‌गुण आवडतात, किंवा राजाचें अंगच आवडतें ? लोक प्रीति करितात ती राजाच्या अंगच्या सद्‌गुणांवर करितात, राजाच्या अंगावर खात्रीनें करीत नाहींत. कारण, जेथें जेथें राजा असेल, तेथें तेथें त्याच्यावर लोकांची प्रीति असेलच हा सिद्धान्त खरा ठरत नाहीं.कारण भरतखंडांतील वेन आणि रोम शहरांतील नीरो किंवा कॅलीग्युला हे जरी राजे होते तरी त्यांच्यावर लोकांची प्रीति होती असें नाहीं. तेव्हां वरील सिद्धान्त बाधित ठरतो. ह्या बाबतींत खरा सिद्धान्त म्हटला म्हणजे फक्त असाच मानतां येईल कीं, जेथें जेथें राजाच्या अंगीं चांगले गुण आहेत तेथें तेथें लोकांची त्या गुणांवर प्रीति असते; व जेथें चांगले गुण नाहींत, तेथें लोकांची प्रीति नसते. ह्या अव्यभिचरित अन्वयव्यतिरेकावरून कांहीं कार्यकारणभाव ठरवावयाचा असेल तर तो असा ठरविण्यांत येतो कीं, राजाचे अंगचे सद्‌गुण हें कारण होय, आणि लोकांच्या मनांतील प्रीति हें त्या कारणाचें कार्य होय. तेव्हां सद्‌गुणापासून प्रीति उत्पन्न व्हावी असा हा नैसर्गिक क्रम असतांना आणि हाच तर्कशास्त्रदृष्ट्या बरोबर कार्यकारणभाव ठरत असतांना मध्यें आणखी राजनिष्ठेचा प्रवेश कशाला पाहिजे आहे ? कारणापासून कार्योत्पत्ति होत असतांना आणखी राजनिष्ठेची कल्पना करणें अनावश्यक आहे. व हेंच कल्पनेचें गौरव होय. राजाच्या सद्‌गुणानें लोकांच्या मनामध्यें आपोआपच प्रीति उत्पन्न होत असतांना आणखी मध्यें राजनिष्ठेचें लोढणें कशाला पाहिजे आहे ? दोन आणि दोन एकत्र मिळविले म्हणजे चार होत असतांना ते चार होतच आहेत असें मानण्याला आणखी एक मध्यंतरीं कांहीं विशेष प्रकारची श्रद्धा लागत असते काय ? डोळे उघडले म्हणजे दिसतें, आणि सूर्य उगवला म्हणजे प्रकाश पडतो, ह्या गोष्टींतील कार्यकारणभाव सिद्धच आहे. तो साधित करण्याला जशी आणखी एखाद्या निराळ्या श्रद्धेची जरूरी नाहीं, त्याप्रमाणें राजाचे गुण आणि लोकांची प्रीति ह्यांच्यामध्यें आणखी तिसऱ्या एका निरुपयोगी राजनिष्ठेच्या कल्पनेचीही कांहीं आवश्यकता नाहीं. गणितशास्त्र, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, भूमिति, त्रिकोणमिति वगैरे अनेक शास्त्रें फक्त कार्यकारणभावावरून कोणत्याही प्रकारच्या श्रद्धेच्या मदतीशिवाय चाललेलीं आहेत. त्याचप्रमाणें हें दंडनीतिशास्त्रही राजनिष्ठेच्या मदतीशिवाय चालणार नाहीं असें नाहीं. राजांच्या अंगच्या गुणांनीं लोकांच्या मनामध्यें प्रीति

उत्पन्न होत असतांना व तेवढ्यानें सर्व कार्यभाग होत असतांना राजनिष्ठेची आणखी जास्त कल्पना करणें हें गौरव सदोष होय. अशा दृष्टीनें पाहिलें असतां राजनिष्ठेच्या कल्पनेची आवश्यकताच उरत नाहीं. पण अशी एक कल्पना मानलीं तरी देखील सद्गुण आणि प्रीति ह्यांच्या कार्यकारणभावामध्यें राजनिष्ठा ही अन्यथासिद्धीच्या दोषानेंही आणखी दूषित होते. गाईच्या स्तनापासून तिच्या वत्साचें समाधान होतें येथें गाईचे स्तन आणि वत्साचें समाधान ह्यांच्यामध्यें कार्यकारणभाव असतांना जर कोणी असें म्हणेल कीं त्या गाईला शिंगें आहेत म्हणून त्या वत्साचें समाधान होतें, तर ह्या ठिकाणीं गाईचीं शिंगें हीं अन्यथा-सिद्ध होत. कारण गाईचीं शिंगें असलीं किंवा नसलीं तरी गाईच्या स्तनांपासून तिच्या वत्साचें समाधान होतच असतें. त्याच प्रकारची प्रस्तुत उदाहरणामध्यें राजनिष्ठेची स्थिति होते. राजाच्या अंगच्या गुणापासून लोकांच्या मनामध्ये प्रीति उत्पन्न होत असतां ती प्रीति उत्पन्न होण्याला त्या राजावर असलेली निष्ठा कारणीभूत होते असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. सारांश, राजनिष्ठेचें अस्तित्व मानण्यामध्यें कल्पनागौरवाचा दोष येतो; व त्या राजनिष्ठेकडे लोकांच्या प्रीतीचें कारणत्व देण्यामध्यें अन्यथासिद्धीचा दोष उपस्थित होतो. ह्या सर्व गोष्टी चांगल्या राजांना पूर्णपणें कळत असतात आणि म्हणूनच ते राजनिष्ठेवर मुळींच भिस्त न ठेवतां सर्व भार ते आपल्या सद्गुणांवर टाकीत असतात. आपले सद्गुण ही लोकांची राजनिष्ठा आणि आपले अधर्म हाच लोकांच्या राजनिष्ठेचा अभाव असें ते मानितात व ह्याच उदात्त तत्त्वावर ते चालतात. चांगल्या राजांच्या कारकीर्दींत राजनिष्ठेचा परिघ संकोच पावत जातो. आणि वाईट राजांच्या कारकीर्दींत राजनिष्ठेच्या आवश्यकतेचें बंड फारच माजतें. रामचंद्राच्या किंवा युधिष्ठिराच्या कारकीर्दीचे जे इतिहास लिहून ठेविलेले आहेत त्यांमध्यें राजनिष्ठेच्या आवश्यकतेबद्दची तरफदारी केलेली आपल्याला कोठें तरी आढळून येते काय ? रामराजावर किंवा धर्मराजावर कोण प्रीति करणार नाहीं? आणि त्यांच्यावर प्रीति करा म्हणून दुसऱ्यानें सांगावयाला तरी कशाला पाहिजे ! जेथें अगची लीला नाहीं तेथें भांगटिळ्याची आवश्यकता भासूं लागते. राजनिष्ठा वाइट राजांकरितां. चांगले राजे, राजनिष्ठा असो वा नसो, तिची बिलकुल परवा करीत नाहींत. त्यांना फक्त सद्गुणांची परवा असते. आपण सद्गुणानें वागावें ही त्यांची महत्त्वाकांक्षा असते. न्याय आणि नीति यांच्या पाया-

वर उभे राहून आपण सदोदित चालत असावें अशी त्यांची उत्कंठा असते. अशा राजांच्या कारकीर्दींत लोक कायद्यावांचून राजनिष्ठ होतात आणि धाकदपटशावांचून त्यांच्यावर प्रीति करूं लागतात. त्या लोकांना राजनिष्ठेचें नांव ठाऊक नसतानांही ते राजनिष्ठ असतात आणि मध्यस्थांच्या मदतीवांचूनही सद्गुणांवर प्रीति करण्याकरितां त्यांचें मन ओढ घेत असतें. असे चांगले राजे ज्या लोकांना मिळतात ते धन्य होत !

———

## हक्काच्या नोंदणीचा कायदा : : : १३

काळ : अग्रलेख ता. २६-९-१९०२

★ राज्यें बुडवलीं, इनामदार बुडवले आतां रयत बुडणार !

मुंबई इलाख्यांतील लँड रेव्हिन्यु कोडमध्यें दुरुस्ती करण्याचा कायदा मुंबई इलाख्याच्या कायदेकौन्सिलमध्यें पास होऊन सुमारें एक वर्ष झालें नाहीं तोंच मुंबई इलाख्यांतील जमिनींवरील मालकीच्या हक्काची नोंद ठेवण्याविषयींचें बिल मुंबईच्या कायदेकौन्सिलपुढें आलें आहे. गुदस्त सालचा कायदा शेतकऱ्यांवर सावकाराचा जुलूम चालूं नये म्हणून होता; व यंदाचें बिल कोणत्या जमिनीची मालकी कोणाकडे आहे याची नोंद ठेवण्याकरितां आहे या झालेल्या आणि होणाऱ्या कायद्यांचीं बाह्यस्वरूपें पुष्कळ मोहक आहेत. व त्यांचीं अंतःस्वरूपेंही बाहेरच्या इतकींच मोहक असतील तर त्यांत हिंदुस्थानच्या लोकांचें कल्याणच आहे. परंतु झालेल्या कायद्याचें खरें खरें अंतःस्वरूप काय आहे याची पूर्वींच पुष्कळ चर्चा होऊन तें लोकांना पूर्णपणें समजून आलेलें आहे. हिंदुस्थानांतील शेतकऱ्याला सावकाराच्या तगाद्यापासून त्रास होऊं नये हा पूर्वींच्या कायद्यांतील सरकारचा हेतु होता. परंतु सावकाराच्या तगाद्यापासून शेतकऱ्याला त्रास होऊं नये असा सरकारचा हेतु असला, तरी कोणाच्याच तगाद्यापासून शेतकऱ्याला त्रास होऊं नये असा सरकारचा हेतु असल्याचें कोठें दिसून येत नाहीं. सरकारच्या पैशाबद्दलच्या तगाद्यापासून शेतकऱ्याला कितीही त्रास झाला तरी हरकत नाहीं, शेतकऱ्याला सरकारनें तगादा केला तरी हरकत

नाहीं, सावकारानें मात्र करतां कामा नये. सरकारदेणें न दिल्याबद्दल सरकारनें शेतकऱ्याची जमीन खालसा केली तरी हरकत नाहीं, परंतु आपलें देणें न दिल्याबद्दल सावकारानें मात्र शेतकऱ्याची जमीन जप्त करतां कामा नये, इत्यादि जीं अनेक ममताळुपणाचीं तत्त्वें सरकारनें मागील कायद्याच्या द्वारानें लोकांपुढें मांडिलीं आहेत त्यांवरून त्या कायद्यामध्यें सरकारचा काय हेतु आहे हें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहिलें नसेलच. त्या कायद्यानें कलेक्टर-साहेब हे थोड्याच दिवसांमध्यें आपापल्या जिल्ह्यांतील बऱ्याच जमिनीचे मालक होऊन बसतील असा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं, हें भाकित पुष्कळांनीं आधींच करून ठेविलेलें आहे. त्याच कायद्याचें हल्लीं हें जें भावंड जन्मास यावयाचें आहे — ज्याचें गर्भामध्यें बीजारोपण झालेलें आहे आणि ज्याचा प्रसूतिकाल लवकरच प्राप्त होणार आहे — त्याचे काय काय परिणाम होतात इकडे सर्वांचें लक्ष लागून राहणें अगदीं स्वाभाविक आहे. पहिला कायदा बऱ्याच जमिनींवर कलेक्टरसाहेबांची मालकी स्थापित करील असा संभव आहे. त्यांत हा दुसरा कायदा आणखी जास्त भर घालील कीं काय अशी भीति जर कोणाच्या मनामध्यें उत्पन्न झाली, तर ती केवळ अस्थानींच उत्पन्न झाली आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

ह्या जमिनीवरील हक्काच्या नोंदीसंबंधानें असा एक प्रश्न उत्पन्न होतो कीं, ज्या जमिनीबद्दलचा हक्क मालकाला शाबीत करून देतां येतो त्या जमिनीबद्दलची व्यवस्था ठीक होईल; परंतु ज्या जमिनीबद्दल मालकाला कांहीं विशेष पुरावा दाखवितां येत नाहीं, त्या जमिनीची वाट काय होणार? जमिनी-च्या मालकीबद्दलचा हक्क प्राप्त होण्याचे जे कांहीं मार्ग सरकारनें हल्लींच्या बिला-मध्यें नमूद केले आहेत, त्यांत मुख्यत्वेंकरून वारसा, वांटप, विक्री, गहाण, देणगी या गोष्टींचा समावेश केलेला आहे. पण अशा प्रकारच्या हक्काचा पुरावा जर एखाद्या जमिनीच्या मालकाला दाखवितां आला नाहीं, किंवा पुष्कळ दिवसां-च्या वहिवाटीशिवाय त्याच्यापाशीं कांहीं पुरावा नसला, तर ती जमीन कोणा-च्या मालकीची म्हणून सरकारच्या रजिस्टर बुकांत नोंदली जाणार? ज्यांच्यापाशीं पुरावा नाहीं त्याच्याच नांवावर ती जमीन सरकार नोंदील इतकें हल्लींचें सरकार भोळें नाहीं. किंवा त्या जमिनीवर कोणाचीच मालकी शाबीत होत नाहीं म्हणून ती जमीन त्या गांवांतील लोकांना सरकार देईल इतकें हल्लींचें सरकार उदारही

नाहीं. मागसलेल्या जातींतील गरीब लोकांना एखाद्या संस्थानानें शेंकडा पन्नास जागा द्याव्या, किंवा त्यांना ब्राह्मणांनीं वेदोक्तकर्माचा अधिकार द्यावा, असें परस्पर म्हणण्यामध्यें सरकार औदार्य दाखवील. पण त्याच मागसलेल्या लोकांना हल्लींचें सरकार अशा कांहीं बिनवारशी ठरलेल्या जमिनी देईल हें स्वप्नांतसुद्धां आणावयाला नको. मग ह्या जमिनींचें होणार तरी काय ? ह्या चौकशामध्यें कांहीं जमिनी खात्रीनें अशा निघतील कीं ज्यांच्यावर कोणाचीच मालकी स्थापित होऊं शकणार नाहीं. अशा जमिनी मग घेणार तरी कोण ? लोकांची मालकी नसल्यामुळें लोकांनाही देतां येत नाहींत; आणि सरकार तर पडलें न्यायी आणि निःस्पृही ! तेव्हां सरकार त्या जमिनी आपल्याकडे घेईल असें तरी कोणाच्यानें कसें म्हणवेल ? अशा अडचणीच्या वेळीं आपण थोडेसे मागील कांहीं गोष्टींकड वळूं.

लोकांचा आपापल्या मालमत्तेवर जो हक्क आहे त्या हक्काची चौकशी करण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे असें नाहीं. आजपर्यंत कांहीं वेळां सरकारनें अशीं कामें केलेलीं आहेत फार खोलांत न शिरतां अशा प्रकारचें अगदीं पहिलें काम पाहूं गेलें असतां लॉर्ड डलहौसी यांनीं आपल्या हातीं घेतलें होतें असें दिसतें. त्यांनीं ज्या जमिनींच्या हक्काबद्दलचा पुरावा पाहण्याचें योजिलें होतें त्या जमिनी लहानसहान नसून फार मोठ्या होत्या. त्यांना शेतें हें नांव नव्हतें. परंतु त्यांना राज्य असें म्हणत असत. हिंदुस्थानांतील ह्या राज्यरूपी शेतांवर कोणाचा कसा आणि कितीं हक्क पोंचतो ह्याच्याबद्दलचा तपास लॉर्ड डलहौसी यांनीं फार सूक्ष्म रीतीनें चालविला होता. त्या तपासाचा निकाल कशा प्रकारचा झाला हें सांगण्याची आज आवश्यकता आहे असें मुळींच नाहीं लॉर्ड डलहौसीच्या चोकस दृष्टीला पुष्कळ राज्यें बिनवारशी दिसलीं त्या वेळी त्या बिनवारशी मालाची सरकारनें काय वाट केली हें इतिहास प्रत्येकाला सांगतच आहे. ह्यानंतर मालकीच्या हक्काची तपासणी करण्याबद्दलचा दुसरा प्रयत्न म्हटला म्हणजे इनाम कमिशनचा होय. राज्यां-वरून हात फिरविल्यानंतर राज्यापेक्षां लहान अशा इनामांकडे दृष्टि वळणें हें साहजिकच आहे. इनाम कमिशनची चौकशी चालू झाली. सर्वांकडून सनदा मागविण्यांत आल्या. आपापल्या इनामावर आपले काय हक्क आहेत, ते शाबीत करण्याकरितां झाडून सर्व इनामदारांना पाचारण करण्यांत आलें, व ज्या कित्ये-

कांचे हक्क शाबीत आहेत असें कमिशनच्या दृष्टीला दिसलें त्यांचीं इनामें कायमही करण्यांत आलीं. पण ज्यांच्या सनदा कमिशनच्या अगर सरकारच्या मतानें योग्य ठरल्या नाहींत, त्यांच्या इनामांची काय वाट झाली ? तीं इनामें दुसऱ्या कोणत्या इनामदारांना मिळालीं ? किंवा त्यांचें उत्पन्न कोणत्या मागासलेल्या किंवा उपाशी मरणाऱ्या लोकांमध्यें वांटून दिलें ? आणि जर त्या इनामांची अशी कांहीं व्यवस्था झाली नसेल, तर मग तीं गेलीं कोठें ? ह्या प्रश्नांचीं कांहीं तरी उत्तरें असलींच पाहिजेत. आणि तसलेच प्रश्न हल्लींच्या ह्या जमिनीच्या हक्काच्या नोंदीसंबंधानेंही उपस्थित होणें साहजिक आहे. तेव्हां अर्थात् जर प्रश्न तेच तर त्याला उत्तरेंही तींच असलीं पाहिजेत. राज्यें, इनामें इत्यादि उंच उंच पायऱ्यांवरून हळूहळू खाली उतरत येणारा सरकारचा पाय अखेरीस लहान लहान जमिनींच्या हक्कावर येऊन पडणें हें पूर्वक्रमाला अनुसरून आहे. त्याप्रमाणें हल्लीं सरकारची दृष्टि जमिनीवरील लोकांच्या हक्काच्या नोंदी-कडे गेली आहे, हें ठीकच आहे त्यांत लोकांचा फायदाच आहे. पण सरकार जें एवढें लोकांच्यासाठीं खस्ता खात आहे, त्याचे सर्वच श्रम बिनफायदेशीर न व्हावेत एवढीच लोकांची ईश्वरापाशी प्रार्थना आहे. आजपर्यंतचे सरकारचे असले प्रयत्न अगदींच बिनकिफायतीचे झाले असें नाहीं राज्यांच्या हक्कांच्या चौकशीत हिंदुस्थानांतील दहा पांच राज्यें सरकारला खालसा करावीं लागलीं. इनाम कमिशनमध्यें सरकारनें इमानें इतबारें कित्येकांचीं इनामें कायम करून परत दिलीं. परंतु ज्यांच्या इनामांना कांहीं सबळ पुरावाच मिळेना, त्यांच्या ठिकाणीं मात्र सरकारची न्यायबुद्धि अगदीं कुंठित होऊन गेली. अशा प्रसंगीं कोणी झालें तरी काय करणार ! सरकारचा सर्वस्वी उपाय खुटला आणि मोठ्या कष्टानें कांहीं इनामें खालसा करण्याचें सरकारच्या कपाळीं आलें ! असा मागचा इतिहास आहे. आतां पुढें काय होतें तें पाहावें. कदाचित् मागच्यासारखेंच पुढेंही झालें तरी देखील त्यांत सरकारकडे कांहीं दोष येतो असें मात्र बिलकुल नाहीं. कारण, ज्याला कोणी वारस नाहीं त्याला सरकार वारस असें मुळीं शास्त्रच आहे. तेव्हां बिनमालकीच्या जमिनी जर सरकारकडे गेल्या तर त्या जिकडे जावयाच्या तिकडेच गेल्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या बिलाच्या संबंधानें दुसरेही कांहीं आक्षेप आहेत. जमिनीच्या हक्काची नोंदणी करण्याचें काम ज्यांच्याकडे सोंपविलें आहे त्यांच्या हातून तें बरोबर होईल किंवा नाहीं,

त्यांत लबाड्या होण्याचा संभव आहे किंवा नाहीं व त्यामुळें लोकांचें नुकसान होईल किंवा नाहीं, असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. तसेंच आपल्या जमिनीवर लोक जे निरनिराळ्या प्रकारचे हक्क दाखवितील ते सगळे सरकार अखेरीस मान्य करील किंवा अमान्य करील, हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. आज पुढें आलेल्या बिलामध्यें ह्या गोष्टींविषयींच्या आपल्या मताचा स्पष्ट उल्लेख सरकारनें केलेला नाहीं. पण एकदां एखाद्या गोष्टीच्या हक्काची चौकशी सुरू झाली, आणि तो हक्क शाबीत आहे किंवा नाशाबीत आहे हें ठरविण्याचें काम ती चौकशी सुरू करणारांच्याच हातांत असलें, म्हणजे त्याबद्दल अखेर परिणाम काय होतो ह्याविषयीं लोकांना काळजी वाटणें अगदीं साहजिक आहे.

असो. येथपर्यंत सरकारनें लोकांच्या जमिनीच्या हक्काच्या नोंदणीबद्दल जें बिल पुढें आणिलें आहे त्याबद्दलच्या कांहीं बाबतींसंबंधानें थोडक्यांत विचार झाला. पण ह्या लोकांच्या हक्काच्या नोंदीच्या विचारावरून दुसरा एक विचार मनामध्यें उद्भवतो. लोकांचे आपापल्या जमिनीवर काय हक्कसंबंध आहेत ह्याची चौकशी करण्याचें सरकारनें योजिलें आहे हें ठीक आहे. परंतु आपल्या मुलखांतील, लोकांची त्यांच्या जमिनीवर काय मालकी आहे ह्याची चौकशी करण्याचें जसें आज सरकारच्या मनामध्यें आलें आहे, तशी कल्पना जर एखादे दिवशीं परमेश्वराच्या मनामध्यें आली, आणि आपण उत्पन्न केलेल्या पृथ्वीवरील देशांवर आज कोणाची कशी मालकी चालत आहे ह्याच्याबद्दल आपण चौकशी करावी असें जर त्याला वाटलें, तर कसें काय होईल ? परमेश्वरानें जर आपल्या स्वर्गांतील कौन्सिलमध्यें अशा प्रकारचें हक्काची नोंद करण्याचें एखादें बिल आणिलें तर त्याचा काय बरें परिणाम होईल ? परमेश्वरानें उत्पन्न केलेली पृथ्वी हा त्याच्या ताब्यांतील एक इलाखाच होय. आणि त्या पृथ्वीवरील मोठमोठाले देश हे परमेश्वराच्या इलाख्यांतील लहान लहान जमिनीचे तुकडेच होत. ह्या जमिनीच्या लहान लहान तुकड्यांचे—ह्या मोठमोठाल्या देशांचे - पूर्वीं मालक कोण होते, हल्लीं मालक कोण आहेत, पूर्वींच्या मालकांपासून हल्लींच्या मालकांकडे मालकीचे हक्क कसे आले, त्या हक्कांना आधार काय, ते आधार न्यायाला अनुसरून आहेत काय, आणि तो न्याय मनुष्याला आणि देवाला मान्य होईल असा आहे काय, इत्यादि प्रश्न उपस्थित करून जर परमेश्वरानें एखादी चौकशी सुरू केली, तर ह्या पृथ्वीच्या पाठीवर पूर्वेकडे आणि

पश्चिमेकडे, दक्षिणेकडे आणि उत्तरेकडे, जुन्या जगांत आणि नव्या जगांत जीं अनेक सरकारें आहेत त्यांची काय वाट होईल? लहान लहान जमिनींच्या मालकांच्या हक्काची चौकशी चालू झाली तर ते गरीब मालक कोठून तरी कांहीं तरी पुरावा गोळा करतील, जुने रुमाल शोधून पाहतील, वयोवृद्ध लोकांना माहिती विचारतील, खतें-पत्रें गोळा करतील, किंवा साक्षीदार जमवितील. परंतु जेव्हां निरनिराळ्या देशांवरील मालकीच्या हक्कांची चौकशी सुरू होईल, तेव्हां ह्या जगांतील निरनिराळीं सरकारें काय करतील? ते काय पुरावा हजर करतील? त्या वेळीं हीं सरकारें कोणते जुने रुमाल शोधून पाहतील? कोणते कागदपत्र बाहेर काढतील? आणि परमेश्वराच्या उलटतपासणीपुढें टिकणारे असे कोण साक्षीदार यांना मिळतील? लोकांच्या जमिनीवरील हक्कासंबंधानें चौकशी चालू झाली तर ते वारसा, वांटप, गहाण, विक्री किंवा बक्षीस इत्यादींपैकीं कोणता तरी पुरावा दाखवून आपल्या जमिनीवर आपला हक्क शाबीत करून घेतील. पण मोठमोठ्या जमिनींवरील—निरनिराळ्या देशांवरील—हक्कांची चौकशी जेव्हां परमेश्वर सुरू करील, तेव्हां त्या त्या देशांतील सरकारें आपल्या अमलाखालीं गोळा करून आणलेल्या अनेक मुलखांसंबंधानें कोणत्या प्रकारचा हक्क दाखवून देणार? फिलिपाइन्स बेटें आमची वडिलोपार्जित इस्टेट असून तीं बेटें हल्लीं आमच्याकडे वारसाच्या हक्कानें आलीं आहेत असें अमेरिका म्हणणार? चीनच्या पश्चिम किनाऱ्यावरील कैचू हा प्रांत जो जर्मनानें १८९७ सालीं चीनपासून बळजबरीनें आपल्या ताब्यांत घेतला तो आमच्या भाऊबंदकीचें वांटप होऊन आमच्या वांटणीला आला, असें जर्मनी सांगणार? आफ्रिकेमधील अल्जीरियाचा विस्तीर्ण देश आपल्याकडे गहाणसंबंधानें आहे असें फ्रान्स प्रतिपादन करणार? मँचूरिया आपण विकत घेतला आहे असें रशिया सांगणार? किंवा आफ्रिका खंडांतील तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावरील इटलीनें जो भाग आपल्याकडे घेतलेला आहे तो आपल्याला बक्षीस मिळाला असें इटली सांगणार? हीं सरकारें अशा प्रश्नांना काय उत्तरें देणार? देवाच्या घरीं सगळ्यांना एक कायदा! जो कायदा सामान्य मनुष्यांना देव लागू करणार, तोच कायदा देव राजांनाही लागू करणार! देवाच्या घरीं पक्षपात नाहीं. एकाच कृत्याला एका ठिकाणीं वाईट नांव आणि दुसऱ्या ठिकाणीं चांगलें नांव, असा पंक्तिप्रपंच देवाजवळ नाहीं. देव हक्काला हक्क म्हणतो, आणि लुटारूपणाला लुटारूपणाच म्हणतो. Right

of conquest सारख्या शब्दांनीं अर्धवट लोक दबकतात. पण परमेश्वराच्या घरीं हा शब्द माहीत नाही. परमेश्वराच्या कायद्यांत हा हक्क मंजूर नाहीं. जें निव्वळ खरें असेल तेंच परमेश्वराच्या दरबारीं पटणार. इतर अन्यायमय न्यायांची तेथें डाळ शिजणार नाहीं. अशा प्रकारचा विलक्षण न्याय परमेश्वराच्या कचेरींत चालत असतो. त्या परम पवित्र न्यायाला भिऊन ह्या पृथ्वीच्या पाठीवरील सर्व लोकांनीं, मग ते राजे असोत किंवा रंक असोत, वागावें हें बरें

परमेश्वरानें पृथ्वीवरील देशांच्या हक्कांची चौकशी कधीं केली नाहीं ह्यावरून तो यापुढें ती कधीं करणार नाहीं असें कोणी समजूं नये. अन्यायांची चौकशी देव केव्हां ना केव्हां तरी करीलच करील. देवाच्या चौकशीचा दिवस (जज्मेंट डे) लवकरच येवो किंवा उशिरां येवो, पण तो केव्हां तरी आला पाहिजे. पूर्वीं परमेश्वरानें अशा प्रकारच्या हक्कांबद्दलची चौकशी कधीं केली नव्हती असें नाहीं. रोमन साम्राज्यानें जेव्हां स्पेन, ब्रिटन, गॉल, जर्मनींतील अरण्यें इत्यादि ठिकाणच्या सर्व लोकांचे हक्क धाब्यावर बसवून सगळीकडे आपलाच हक्क स्थापित केला, त्या वेळेला रोमच्या साम्राज्याचा खरा हक्क किती आहे आणि बाकीच्या देशांचा हक्क किती आहे याच्याबद्दलची चौकशी करणें आणि निरनिराळ्या देशाच्या हक्कांची नोंद करण्याचें बिल पुढें आणणें परमेश्वराला भाग पडलें. आठव्या नवव्या शतकामध्यें मुसलमान लोक अरबस्थानमध्यें प्रबळ होऊन त्यांनीं आपले हातपाय अरबस्थान, इराण, एशिया मायनर या सर्व देशभर पसरून शिवाय आफ्रिका खंडाचा उत्तरकिनारा व्यापून, ईजिप्त, अबिसीनिया येथें आपली सत्ता स्थापून, व भूमध्य समुद्राच्या पलीकडील स्पेन देश बहुतेक काबीज करून त्याच्या आसपासच्या फ्रान्स वगैरे देशांनाही त्यांनी भयभीत करून सोडलें होतें त्या वेळीं, फिरून परमेश्वरानें देशांच्या हक्कांची चौकशी करण्याचें काम मनावर घेतलें होतें; व स्पेनमधील 'सिड'सारख्या पराक्रमी व्यक्तींकडून आणि फर्डिनँडसारख्या राजांकडून देशांवरील हक्कांची व्यवस्था देवानें त्या वेळीं नीट केली. परंतु असल्या बाबतींत देवाला वरच्यावर त्रास देण्याचा मनुष्याचा संकल्पच झालेला आहे असें दिसतें. ज्या स्पेनला परमेश्वरानें एकदां मुसलमानांच्या हक्कापासून वाचविलें त्याच स्पेनच्या फिलिप राजानें फिरून आपला हक्क वास्तविक जेथें नाहीं तेथें तो स्थापित करण्याचा व जुलुमानें कायम ठेवण्याचा प्रयत्न सुरू केला.

दक्षिण अमेरिका, नेदर्लँड्स, फ्रान्स व जर्मनींतील कांहीं भाग वगैरे सर्व मुलखां-
वर फिलिपनें आपला हक्क स्थापित केला. परंतु हा हक्क गैरकायदेशीर आहे
असें आल्व्हानें नेदर्लंडमध्यें जें क्रूरपणाचें आणि जुलमाचें वर्तन चालविलें
होतें त्यावरून जगाला दिसून आलें. म्हणून त्या वेळीं देवानें हक्काचें रजिस्टर
सुधारण्याची व्यवस्था केली. फिलिपच्या पाठीमागून यूरोप खंडामध्यें हक्कांच्या
रजिस्टरामध्यें गडबड करणारा नेपोलियन उत्पन्न झाला. देवाच्या घरच्या
रजिस्टरमध्यें निरनिराळ्या देशांवरील मालकीच्या संबंधानें जीं जीं नांवें दाखल
झालेलीं होतीं तीं तीं सर्व पुसटून नेपोलियननें लिस्बनपासून मॉस्कोपर्यंत सर्व
ठिकाणीं आपलें एकट्याचेंच नांव लिहून ठेविलें. परंतु परमेश्वराला तें सहन न
होऊन त्यानें इंग्लंडच्या हातून सर्वांचे हक्क परत देवविले. इंग्लंडनें त्या वेळीं
जें हें न्यायाचें काम बजाविलें तसलींच कामें इंग्लंडनें त्यानंतरही अनेक
वेळां बजावलेलीं आहेत व अजूनही बजावीत आहे. यूरोप खंडांतील तुर्क-
स्थानावर रशियाचा हक्क बसूं न देण्याला इंग्लंडची न्यायबुद्धिच कारण आहे. व
चीन देशामध्यें थोडक्याच दिवसांपूर्वीं मालकीच्या हक्कांचा गोंधळ उडण्याची
जी भीति उत्पन्न झाली होती तीही इंग्लंडच्याच निरभिलाषबुद्धीमुळें टळली असें
म्हणण्यास हरकत नाहीं. सारांश, देशांच्या हक्कांचें रजिस्टर व्यवस्थित ठेवण्याचें
काम नेपोलियनच्या वेळेपासून परमेश्वरानें जें इंग्लंडकडे दिलें आहे तें इंग्लंडनें
अजूनपर्यंत फार चोख रीतीनें बजाविलेलें आहे व तसेंच तें त्यानें याच्यापुढेंही
बजावीत राहावें, अशी सर्वांची इच्छा आहे असो.

ह्या मागील इतिहासावरून परमेश्वर देशांच्या हक्कांची चौकशी कधींच
करीत नाहीं असें नाहीं. 'यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति' तेव्हां तेव्हां
देशांच्या हक्कांची चौकशी करण्याला परमेश्वर प्रवृत्त होतोच. ह्याकरितां
महत्त्वाकांक्षी राजानो, धर्माची ग्लानि न होईल अशा रीतीनें तुम्ही नेहमीं वागत
असा. परमेश्वर आपल्याही हक्कांची केव्हां तरी चौकशी करणार आहे ही गोष्ट
तुमच्या मनांत सदोदित वागत असूं द्या. तुम्हीं वास्तविक कोणाला भिण्याचें
कारण नाहीं. कारण, तुमच्यापाशीं मोठमोठीं सैन्यें आहेत आणि त्या सैन्यांपाशीं
नवीन नवीन तऱ्हेचीं मोठमोठीं शस्त्रास्त्रें आहेत तरी पण एवढ्याच साधनांनीं
आपण निर्भय झालों आहों असें तुम्ही समजूं नका. तुमचीं सैन्यें कितीही मोठीं
असलीं तरी तीं परमेश्वराच्या विरुद्ध लढून विजय मिळवूं शकणार नाहींत; आणि

तुमच्या तोफांचा पल्ला कितीही लांब असला, तरी त्या तोफांचे गोळे स्वर्गांतील किल्ल्यांच्या भिंतीला भोकें पाडूं शकणार नाहींत. ह्यासाठीं ज्या परमेश्वरानें आजपर्यंत देशांच्या हक्कांची चौकशी अनेक वेळां केली आहे, व ज्याला याच्याही पुढें अनेक वेळां करावी लागणार आहे, त्या परमेश्वराला तुम्हीं भिऊन वागावें. कारण, परमेश्वर जो ठरवील तो खरा हक्क, आणि परमेश्वर जो देईल तो खरा न्याय ! हक्क आणि न्याय ह्याच्याबद्दलच्या मनुष्यांच्या सर्व बडबडी वायफळ आहेत.

---

# एका गुणी माणसाची बदछान : : : १३

काळ : अग्रलेख, ता. १०-१०-१९०२

★ पुण्यांतच काय कोठेंही अशीं माणसें दिसतील.

असला विलक्षण गुण फारच थोड्यांच्या अंगीं आढळतो ! पण या कामांत त्रिंबकरावांचा हात धरणारा कोणी सांपडेल असें वाटत नाहीं. हे गृहस्थ मूळचे दक्षिणेंतील राहणारे, पण यांचें पर्यटण सर्व मुलुखामध्यें झालेलें असल्यामुळें कोणत्या मुलुखांत कोणता रिवाज आहे, कोणते लोक कसा पोषाख करितात, कोणाची चालरीत कशी असते वगैरे गोष्टींसंबंधाची त्रिंबकरावांची माहिती अगदीं हातखंडा होती. चेहरा, पेहराव, चालचलणूक वगैरे पाहून कोण मनुष्य कोणत्या दर्जाचा आहे हें हटकून ओळखण्याच्या कामामध्यें त्रिंबकरावांनीं इतकी निपुणता संपादन केलेली होती कीं, त्यांनीं बांधलेला तर्क कधींही खोटा झाला नाहीं. ह्या अलौकिक गुणाबद्दल त्रिंबकरावांची कीर्ति साऱ्या हिंदुस्थानांत काशीपासून रामेश्वरापर्यंत पसरलेली होती. असल्या गुणांचें चीज म्हटलें म्हणजे नेटिव राजांच्या दरबारीं व्हावयाचें. त्याप्रमाणें त्रिंबकराव पुष्कळ नेटिव राजांकडे जाऊन त्यांच्यापुढें आपल्या गुणांची परीक्षा देऊन व तेथून शाबासकी आणि बक्षिसें मिळवून आले होते. नेटिव राजांकडून मिळालेले धोतरजोडे, शालजोड्या, अंगठ्या, पोची, कंठ्या ह्या जिनसा तर त्रिंबकरावांपाशीं इतक्या जमल्या होत्या कीं, त्यांचें काय करावें हें देखील त्रिंबकरावांना समजेनासें झालें होतें. ह्या जिनसां-

प्रमाणेंच त्रिंबकरावांपाशीं कागदांच्या तुकड्यांचीही बरीच गर्दी जमलेली होती. रद्दीच्या भावानें ह्या कागदांची किंमत केली असती तर ते कागदांचे तुकडे सुमारें दोन पल्ले भरून त्यांची दहा-पंधरा रुपये किंमत आली असती. एक रद्दीवाला त्या सगळ्या तुकड्यांबद्दल पंचवीस रुपयांपर्यंतही देण्याला तयार झाला होता, तरी त्रिंबकराव ती रद्दी विकीनात. इतकी त्याना ती मौल्यवान् वाटत होती. त्या कागदांना ते सर्टिफिकिटें असें म्हणत. हीं त्यांना अनेक मोठमोठ्या साहेब लोकांनीं त्यांच्या गुणावर खूष होऊन दिलेलीं होतीं. हीं सर्टिफिकिटें म्हणजे आपल्या परदेशी राजांनीं आपल्याला दिलेल्या शालजोड्याच होत, असें त्रिंबकराव मानीत असत. असो. दोन पल्ले सर्टिफिकिटांवरून त्रिंबकरावांची साहेब लोकांमध्येंही किती प्रख्याति झालेली असली पाहिजे ह्याची कोणालाही सहज कल्पना करितां येईल, इतके गुणी आणि इतके प्रख्यात पुरुष हिंदुस्थानांत वारंवार निर्माण होत नाहींत. कांहीं दिवसांपूर्वीं हें नररत्न फिरत फिरत एकदां दक्षिणेंतील एका प्रख्यात शहरीं आलें. तेथील लोकांनीं यांची कीर्ति पूर्वींच ऐकिलेली होती. तेव्हां यांच्या अंगच्या अलौकिक गुणांचे कांहीं चमत्कार आपल्या नजरेस पडावे म्हणून त्या शहरचे लोक फार उत्सुक झाले होते. पण त्रिंबकरावांना या शहरीं येतांना कोणते अनिष्ट ग्रह लागले होते कोण जाणे ! त्रिंबकरावांच्या प्रयोगांना जसें यश यावें तसें आलें नाहीं. असल्या नाजूक कलेमध्यें काम करणाऱ्या लोकांचा एखादे वेळीं मुळींच जम बसत नाहीं असें होतें, व गवई लोकांची तर अशी स्थिति पुष्कळच वेळां होते. जरा आवाज लागला नाहीं, किंवा वाजविणारा मनासारखा मिळाला नाहीं म्हणजे मोठे तानसेन असले तरी त्यांचें गाणें जुळून येत नाहीं. असाच कांहीं तरी विलक्षण प्रकार त्रिंबक-रावांच्या संबंधानें त्या वेळीं झाला असला पाहिजे. किंवा कांहीं लोकांची असें होण्याच्या कारणाबद्दल दुसरी जी एक कल्पना आहे तीही खोटीच असेल असें म्हणतां येत नाहीं. असल्या गुणी लोकांना शत्रु फार असतात. तेव्हां कांहीं जादूटोणा करून कोणी या शहरांत त्यांची मति गुंग करून टाकली होती कीं काय कोण जाणे ! पण तें कारण कांहींही असो, त्रिंबकरावांची परीक्षा या शहरीं बरोबर जुळली नाहीं.

त्रिंबकरावांचे प्रयोग पाहण्याकरितां त्या शहरांत एके दिवशीं भर रस्त्या-वरील एका मोठ्या दिवाणखान्यांत पुष्कळ बडे बडे लोक जमले होते. रस्त्यांनं

कोण मनुष्य जात आहे आणि कोण येत आहे वगैरे सर्व त्या दिवाणखान्यांतून चांगलें दिसत होतें. प्रयोग सुरू करण्याची सर्व तयारी झाल्यावर एक गृहस्थ रस्त्याकडे पाहत पाहत उठून त्रिंबकरावांना उद्देशून म्हणाले: " ते गृहस्थ रस्त्यांत उभे आहेत, ते येथल्या बहुतेक मंडळीच्या ओळखीचे आहेत, आपण परस्थ असल्यामुळें आपल्याला ते माहीत असण्याचा संभव नाहीं. तेव्हां त्यांच्या पोषाख वगैरे सर्व चिन्हांवरून हे कोणत्या दर्जाचे मनुष्य असावेत हें आपण सांगा." हा प्रश्न ऐकल्यावर त्रिंबकराव त्या रस्त्यांतील मनुष्याकडे टक लावून पाहूं लागले व पाहतां पाहतां आपल्या मनांत पुढीलप्रमाणें तर्क बांधूं लागले. " यांचा चेहरा तर मोठा गोंडस दिसतो आहे. रात्रीच्या जाग्रणांनीं डोळे खोल आहेत पण तोंडावरील तुकतुकी तैलादिकानें कायम ठेवण्यांत आलेली आहे. हीं जाग्रणें नाटकांचीं असतील काय ? डोकीला जरीकांठी रुमाल आहे—एखाद्या सरदारापाशीं जरीकांठी रुमाल असण्याचा संभव खरा—पण तो त्या रुमालाचे कांठ इतके रेखून बाहेर कशाला काढील ? अंगावर उपरणेंही जरीकांठीच—आणि तीं पहा, हातांत सलकडीं आहेत—बहुतेक चिन्हें तर नाटकवाल्याचीं दिसताहेत—थांबा. यांच्या पायांत काय आहे तें पाहूं—मुसलमानी चढाऊ जोडा—आणि शिवाय दृष्टि निर्लज्जपणानें वर आहे—असला मनुष्य मोठा असण्याचें नांव नको." इतका विचार करून त्रिंबकरावांनीं " हा कोणी तरी नाटकवाला असला पाहिजे " असें आपलें मत सांगितलें. तें ऐकल्याबरोबर त्रिंबकरावांचा तर्क इतका चुकलेला पाहून सर्वांना मोठा विस्मय वाटला. ज्यांनीं प्रश्न विचारला होता ते म्हणाले: " महाराज, हे आमच्या शहरांतील एक मोठे सरदार आहेत. मग आपला तर्क इतका कसा चुकला असेल तो असो." त्रिंबकराव आपल्या मनाशीं म्हणाले, " काय ? हे सरदार आहेत ? असले नाटककवाल्यासारखे दिसणारे सरदार मीं तरी कोठें पाहिले नाहींत " असें आपल्या मनाशीं म्हणून नंतर त्रिंबकराव उघड म्हणाले, " ह्या वेळीं माझा सूर बरोबर लागला नव्हता म्हणून अशी चूक झाली. असो, आतां दुसरा मनुष्य मला ओळखावयाला द्या." ही विनंति मान्य करून पूर्वींच्याच इसमांनीं त्रिंबकरावांना रस्त्यांतून येणाऱ्या दुसऱ्या एका मनुष्याबद्दल प्रश्न विचारिला. व त्रिंबकरावाचे आत्मगत विचार पुढीलप्रमाणें होते: " भिंवया उग्र—मिशा मोठाल्या—वर्ण काळसर—बहुतकरून स्वारी पोलीस खात्यांतील नोकर असावी, इतकेंच नव्हे तर कदाचित् हे

डिटेक्टिव्ह पोलीसही असतील. कारण, डोकें अगदीं हुबेहूब पोलिसच्याप्रमाणें राखलेलें आहे, व ते राखलेले केस वरच्या रुमालाखालीं झांकण्याचा प्रयत्न कपाळावर, दोन्ही कानांशीं, मानेवर, जेथें तेथें केलेला दिसत आहे—अंगांत हंटिंग कोट घातलेला आहे, धोतराचीं दोन्ही टोकें पावलांपर्यंत आलेलीं असून कांचा मारलेला आहे——बिलकुल संशय नको ! " असा विचार करून त्रिंबकरावांनीं " पोलीस " म्हणुन मोठ्यानें उत्तर दिलें. पूर्वीचा पहिलाच प्रसंग होता, म्हणून लोकांनीं फारसा गवगवा केला नाहीं; पण त्रिंबकराव दुसऱ्यांदा चुकले हें पाहून लोकांमध्यें जास्तच मोठ्यानें कुरबूर होऊं लागली. तेव्हां त्रिंबकरावांनीं " कां, माझें उत्तर चुकलें कीं काय ? " म्हणून विचारलें. तेव्हां एकानें उत्तर केलें कीं, " महाराज, हेही एक येथील बड्या सरदारांपैकींच आहेत. यांना आपण पोलीसचे शिपाई कसे म्हणतां ? यांच्या पायांत ती काळी कुळकुळीत वहाण कोठें आहे ? " "वहाणच काय ती कमी ! " त्रिंबकराव तोंडांत बोट घालून आपल्यापाशीं म्हणाले, " वाहवा रे सरदार ! शिपाई आणि सरदार यांच्यामधील अंतर फक्त एका वहाणेंतच येऊन बसलं काय ? किंवा माझी फजिती करण्यासाठीं ह्या मोठमोठ्या सरदारांना असलीं हलकट सोंगें देऊन ह्या लोकांनी या रस्त्यांतून चालविलें आहे ? " असे विचार त्रिंबकरावांच्या मनांत घोळत होते इतक्यांत कोणी एक कुलीन घराण्यांतील स्त्री गाडींत बसून चाललेली पाहून 'ही कोण असावी' म्हणून एकानें प्रश्न केला. तेव्हां त्रिंबकराव थोडे रागावून म्हणाले, " आपण येथें सर्व सभ्य लोक जमलों आहों. आपल्याला वेश्यादिकांबद्दलचे प्रश्न कशाला पाहिजे आहेत ? " "म्हणजे ! " बरेच लोक एकदम ओरडले ह्यांना तुम्ही "वेश्या म्हणतां कीं काय ? " त्रिंबकराव शांतपणानें म्हणाले, " माझे दोन प्रश्न चुकले म्हणून तुम्ही मला याही प्रश्नामध्यें चुकवूं पाहत आहां, पण मी अशानें फसावयाचा नाहीं. गरती आणि वेश्या यांच्यामधला फरक मला कळला नाहीं, तर मग मी इतके दिवस हा धंदा केला हा फुकट कीं काय ? आणि हीं इतकीं दोन पल्ले सर्टिफिकिटें ज्या साहेब लोकांनीं मला दिलीं ते सगळे मूर्ख होते कीं काय ? ह्या स्त्रीला तुम्ही गरती म्हणतां ! उरफाटे केस फिरवून बुचडा बांधलेला—दिसतें आहे न दिसतें आहे इतकें बारीक कुंकूं —आणखी दहा चिन्हें मीं तुम्हांला सांगितलीं असतीं; पण सभ्यतेच्या मर्यादेचें

मी उल्लंघन करूं इच्छीत नाहीं. माझाच तर्क खरा आहे. मी कांहीं केल्यानें तुमचें ऐकणार नाहीं. " व त्रिंबकरावांनीं ऐकिलेंही नसतें. परंतु मंडळींपैकीं एकानें शपथ वाहून सांगितलें तेव्हां त्रिंबकराव गप्प बसले. परंतु आपल्या मनांत ते म्हणाले कीं, " जेथील वेश्यांसारख्या भासणाऱ्या सभ्य स्त्रिया जशा पेहरावावरून दिसतात तशा त्या नाहींत याबद्दल कोणी शपथेवर सांगितल्यावांचून माझी खात्री होत नाहीं त्या शहरांतून मला लवकरच पळ काढून गेलें पाहिजे ! " इतक्यांत एक गबाळ्यासारखें धोतर नेसलेला, अंगांत एक बाराबंदी घातलेला व डोकीवर एक मोंगली टोपी ठेविलेला गृहस्थ दिसल्यावरून हे कोण असावे म्हणून प्रश्न विचारण्यांत आला. तेव्हां त्याच्याकडे पाहून त्रिंबकराव अगदीं गोंधळून गेल्यासारखे दिसूं लागले. त्यांच्या मनांतील गोंधळाचें स्वरूप पुढीलप्रमाणें होतें : " हा कोण असावा ? याला काय म्हणूं ? हा मोंगल म्हणूं, का ब्राह्मण म्हणूं ? एकीकडे धोतर नेसला आहे, पण दुसरीकडे डोकीवर मोंगली टोपी आहे. याच्या हातांत कसलीशी पोथी दिसते आहे, पण त्या फाटक्या खिशांतून बिस्किटाचा अर्धा खालेला तुकडा डोकावतो आहे. गळ्यांत जानवें दिसतें पण रस्त्यांतल्या महारचांभारांना धक्के मारून चालत आहे. असा हा विलक्षण प्राणी कोण असावा ? " अशा रीतीनें पुष्कळ वेळ गोंधळून अखेरीस त्रिंबकरावांनीं आपलें अज्ञान कबूल केलें. " मला हे ओळखवत नाहींत " असें त्रिंबकरावांनीं सांगितल्यावर " अहो, हे एक मोठे शास्त्री आहेत " असें एकजण मोठ्यानें ओरडले. हें ऐकून त्रिंबकरावांची बरीच निराशा झाली, व ह्या विलक्षण शहरामध्यें आपल्या विद्येची डाळ शिजावयाची नाहीं असें त्यांच्या मनाला जास्त जास्त वाटूं लागलें. इतक्यांत नारायणराव या नांवाचे कोणी एक गृहस्थ त्या दिवाणखान्यांतील खिडकींतून बाहेर तोंड काढून बसले होते, त्यांना पाहून रस्त्यांतून जाणाऱ्या एका गृहस्थांनीं हांक मारून " नमस्कार नारायणराव ! " असें म्हटलें. त्या रस्त्यावरील गृहस्थांनीं कपाळाला भस्म लाविलें होतें, गळ्यांत रुद्राक्षांची माळ घातली होती, आणि त्यांच्या हातांत दर्भ वगैरे साहित्य होतें. तें पाहून हे कोणी तरी मोठे वैदिक ब्राह्मण असावे असें वाटून त्रिंबकरावांनींच हे कोणत्या शाखेचे ब्राह्मण म्हणून विचारिलें. तेव्हां दिवाणखान्यांतील सगळी मंडळी खो खो हंसूं लागली; व त्यांपैकीं एकजण म्हणाला, " महाराज, हे क्षात्रिय शाखेंतील ब्राह्मण यांचें नांव मल्हारीभट्ट मोहिते. राणोजी

शास्त्री कदम यांच्या मुलीची वेदोक्त मुंज आज व्हावयाची आहे तिकडे बहुत-करून हे चालले असावे." त्रिंबकराव आपल्या मनांत खजिल झाले. जेथील शास्त्री मोंगलासारखे दिसतात आणि जेथील मराठे ब्राह्मणांसारखे दिसतात तेथें आपल्या विद्येची काय मात्रा चालणार, असें वाटून ते त्या शहरांतून आपण कधीं निघून जावें या गोष्टीचा विचार करण्यामध्यें गुंग होऊन बसले. अशा रीतीनें त्या दिवाणखान्यांत प्रकार चालला होता इतक्यांत जिन्यामध्यें कोणाचे पाय वाजले व एक मनुष्य दरवाजांतून आंत आला. त्रिंबकराव हे सोंवळें ओवळें वगैरे मानणारे जुन्या चालीचे गृहस्थ होते, म्हणून त्या नवीन आलेल्या मनुष्याला पाहून ते म्हणाले, " अरे हा कोण येथें आला ? हा तर किरिस्तांव दिसतो, हा आपल्या डोक्यावरचें अंडीं आणि बिस्किटें विकावयाचें टोपलें खालीं ठेवून वर कशाला आला आहे ? याचें येथें काय काम आहे ? त्याला म्हणावें शिवूं नको." इतके त्रिंबकरावांच्या तोंडचे शब्द निघत आहेत न निघत आहेत तोंच त्यांच्या शेजारचे एक गृहस्थ त्यांना म्हणाले, " हं हं, हें काय ? हे गृहस्थ किरिस्तांव नाहींत ! त्यांच्या त्या गवती टोपीवरून तुम्ही म्हणतां कीं काय ! ती त्यांच्या वडिलांपासून आहे. हे चांगल्या उच्च कुलांतील आहेत व हे येथील प्रमुख सुधारक आहेत. ह्यांच्या ब्राह्मणत्वाबद्दल आपल्याला शंका असेल तर ती त्यांचें यज्ञोपवीत पाहिल्यानें दूर होणार आहे." इतक्यांत त्या नवीन आलेल्या गृहस्थांनीं आपल्या कमरेभोंवतीं पाटलूनीखालीं झांकून ठेविलेलें यज्ञोपवीत बाहेर काढून दाखविलें. तेव्हां त्रिंबकरावांनीं त्या ब्राह्मणश्रेष्ठांचा मान करून त्यांना आपल्याजवळ बसवून घेतलें; व ते आपल्या मनांत म्हणाले, " मला अजून पुष्कळ माहिती मिळविली पाहिजे. ब्राह्मण कशा प्रकारचे असतात हें मीं समजून घेतलें पाहिजे. सुधारक म्हणजे कशासारखे दिसतात ह्याचा अजून मला परिचय करून घेतला पाहिजे. माझीं अजिंक्यपत्रें फुकट ! हें दोन पल्ल्यांचें ओझें मीं आजपर्यंत फुकट वाहिलें." जमलेल्या मंडळींनाही तसेंच वाटूं लागलें. त्रिंबकरावांच्या विद्येंत कांहीं हशील नाहीं, उगाच थोतांड माजविलें आहे, असें ते म्हणूं लागले. व याप्रमाणेंच बहुतेक लोकांची निराशा होऊन अखेरीस त्या दिवाणखान्यांतील बैठक उठली. त्यानंतर गांवांत चोहोंकडे ही बातमी पसरली; व निरनिराळ्या प्रकारचे लोक निरनिराळ्या प्रकारचीं मतें त्रिंबकरावांबद्दल व्यक्त करूं लागले. कित्येकांचा अजून त्यांच्यावर विश्वास

होता, व त्यांच्यांत कांहीं राम नाहीं, अशी कित्येकांची खात्री होऊन चुकली होती. परंतु त्या शहरामध्यें एक पंडितंमन्य गृहस्थ राहत होते. त्यांच्या मनांत अशी स्फूर्ति झाली कीं या गृहस्थानें जें थोतांड माजविलें आहे तें खरें आहे किंवा खोटें आहे, याची परीक्षा पाहणें हें माझें कर्तव्यकर्म आहे. मीं जर असलीं कामें केलीं नाहींत तर मग असल्या रिकाम्या उठाठेवी दुसरे कोण करतील? आणि मीं त्या केल्या नाहींत तर मी सगळ्या गांवांत प्रमुख कसा गणला जाईन? तेव्हां मला याची शहानिशा केलीच पाहिजे. असा विचार मनांत आणून गांवांतील ऑनररी मॅजिस्ट्रेट, जहागिरदार, श्रीमंत सावकारांचे पुत्र, वगैरे कांहीं रिकामटेकड्या लोकांची एक कमिटी नेमून त्याचें अध्यक्षस्थान या गृहस्थांनी आपणाकडे घेतलें व आमच्या स्वयमधिकृत कोर्टापुढें तुम्ही जाब देण्याला हजर व्हावें असें एक वारंट सदर गृहस्थांनीं त्रिंबकरावांवर बजाविलें. तो बिचारा गरीब ब्राह्मण अगदीं घाबरून गेला, व नेमलेल्या वेळीं राजेसाहेबांच्या कमिटीपुढें जाऊन हजर झाला. त्याला अध्यक्षांनीं सवाल टाकिला, "ते समोरून दोन साहेबांच्या मध्यें गाडींत बसून कोण येत आहेत तें सांगा. या प्रश्नाचें तुम्ही बरोबर उत्तर दिलें तर ठीक आहे, नाहींतर तुम्हांला चोवीस तासांचे आंत हें शहर सोडून चालतें झालें पाहिजे." त्रिंबकरावांनीं विचार करून व हा आणीबाणीचा प्रसंग आहे ही गोष्ट लक्षांत आणून शांतपणानें उत्तर दिलें कीं, हे कोणी तरी कैदी असले पाहिजेत. हें उत्तर ऐकून अध्यक्ष फारच संतापले. आणि म्हणाले, "आपली विद्या शिखराला जाऊन पोंहोचली असली पाहिजे! हे एक राजपुत्र असून त्यांच्या दोन बाजूचे जे दोन युरोपियन आहेत ते त्यांचे शिक्षक होत. अशा थाटानें आपल्या दोन शिक्षकांच्या युरोपियन लवाजम्यासह त्यांच्यामध्यें बसून आपल्या देशांतील एका अत्यंत उच्च कुलांतील राजे चाललेले असून ते तुम्हांला कैदी असे वाटले तेव्हां तुम्हांला काय म्हणावयाचें! असो, आतां तुम्ही तावडतोब या शहरांतून निघून जा. नाहीं तर बरें होणार नाहीं." ही धमकी ऐकल्याबरोबर त्रिंबकरावांच्या तोंडचें पाणीच पळालें, व ते त्या शहरांतून निघून जाण्याचे तयारीला लागले. सर्व तयारी झाल्यावर स्टेशनवर आपल्या मामानाची पेटी नेण्यासाठीं ते एका हमालाला हाक मारूं लागले; तेव्हां तो त्यास दरडावून म्हणाला, "तुम्ही नव्हे का ते पोषाखावरून माणसाची परीक्षा करणार! तुमची येथें फजिती झाली म्हणून मीं ऐकिलें तें खरेंच असलें

पाहिजे; कारण, तुम्हांला माझी देखील परीक्षा करितां आली नाहीं. मी हमाल आहें काय ? मी मागासलेल्या जातींतील आहे, समजलां ! मी काल हमाल होतों पण आज मी एका संस्थानांत पन्नास रुपयांच्या जागेवर चाललों आहे. आणखी मला तूं म्हणतोस ओझें नेण्याला येतोस काय म्हणून ! वारे वा !" हीं अक्षरें ऐकून त्रिंबकराव वेडच्यासारखे झाले व त्या विलक्षण शहरांतून आपलें ओझें कसेंबसें आपल्याच पाठीवर घेऊन त्यांनीं तेथून स्टेशनचा रस्ता सुधारला.

---

# मृत्यूचा दरबार आणि दिल्लीचा दरबार : १५

काळ : अग्रलेख, ता. ७-११-१९०२

हिंदुस्थानांत दिल्लीचा दरबार यंदा भरविण्याचें ठरलें आहे. पण मृत्यूचा दरबार हिंदुस्थानांत अलीकडे बहुतेक दरवर्षींच भरविण्याचें ठरलेलें आहे असें दिसतें. दिल्लीचा दरबार हा यंदाच्या पुरताच आहे; परंतु मृत्यूचा दरबार हिंदुस्थानांत पूर्वीं भरलेला होता, यंदा भरलेला आहे, आणि असाच पुढेंही भरणार नाहीं कशावरून ! मराठी चौथ्या पुस्तकामध्यें एका कवीनें भरविलेल्या मृत्यूच्या दरबाराचा इतिहास प्रसिद्ध झालेला आहे. त्या दरबारामध्यें फक्त निरनिराळ्या प्रकारच्या रोगांनाच पाचारण करण्यांत आलेलें होतें. पण मृत्यूच्या दरबारांतील मानकरी, हुजरे, राजे, कॅडेट कोअरमधील राजपुत्र वगैरे म्हणजे फक्त रोगच होत असें नव्हे. मृत्यूच्या दरबारांतील मानकऱ्यांची मर्यादा याहून फार विस्तृत आहे, फक्त रोगांचाच अगर मृत्यूच्या कारणांचाच दरबार फिरून भरविला तरीदेखील त्यांत किती तरी नवीन सरदार, जे पूर्वींच्या दरबाराला हजर नव्हते असे, हल्लीं हजर होतील. हल्लींच्या मृत्यूच्या दरबारांत प्लेग, दुष्काळ वगैरे सरदारांसाठीं नवीन खुर्च्या मांडाव्या लागतील. पण ह्याशिवाय मृत्यूच्या दरबारामध्यें जास्त मंडळींचा समावेश करणें जरूर आहे. दारोदार भिक्षा मागणारे भिक्षेकरी, अन्नासाठीं रस्त्याच्या कांठावर पडून प्राण सोडणारे अनाथ, सहा पैशांच्या मजुरीसाठीं सोळा टोपल्या खडी फोडणारे रिलीफ कामावरील मजूर, दुष्काळानें बैल मेले म्हणून पाऊस पडत

असतांही शेताच्या कांठीं बसून शेताकडे पाहून टिपें गाळणारे शेतकरी, अन्नाच्या आमिषानें स्वधर्माची आहुति देऊन मिशनऱ्यांच्या कोंडवाड्यामध्यें सांपडलेलीं पोरें, हे व ह्याच प्रकारचे जे असंख्य लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहेत त्या सगळयांना मृत्यूच्या दरबारामध्यें बसण्याचा अधिकार आहे. हे सगळे मृत्यूच्या दरबारांतील मानकरी होत. ह्या दरबारांतील सरदारांची संख्या फारच अफाट असल्यामुळें सर्वांची नोंद ठेवण्याचें काम सरकारच्या हातून होणें अगदीं अशक्य आहे. म्हणून सरकार हा मृत्यूच्या दरबारांतील मानकऱ्यांपैकीं बारीकसारीक सरदारांची नोंद बिलकूल ठेवीत नाहीं. फक्त रिलीफ कामावर येणाऱ्या सरदारांचा सरकारपाशीं लिस्ट असते; त्या लिस्टाप्रमाणें पाहिलें तर या सरदारांची हल्लींची संख्या दोन लाखांच्यावर आहे. हल्लीं हे सरदार लोक फार कमी झाले आहेत. १८९७-९८--९९ सालीं मृत्यूच्या दरबारांतील ह्या सरदार, मानकरी, महाराज, राजे, चीफ, नबाब, ठाकूर वगैरे मंडळींची संख्या पन्नास लक्षांवर गेलेली होती. परंतु यंदा आपला दरबार तितक्या थाटानें भरविण्याचा मृत्यूचा विचार दिसत नाहीं. तरी पण फक्त कामावरील सरदारांची संख्या घेतली तरीदेखील ज्या दरबाराला दोन लक्ष सरदार जमा झाले आहेत, तो दरबार कांहीं लहानसहान आहे असें नाहीं. कर्झनसाहेबांनीं आमंत्रणें पाठवून आपल्या दरबाराकरितां गोळा केलेल्या पाहुण्यांची संख्या खात्रीनें इतकी मोठी व्हावयाची नाहीं.

मृत्यूचा दरबार आणि दिल्लीचा दरबार ह्या दोन दरबारांमध्यें कांहीं कांहीं बाबतीत बरेंच साम्य आहे. हिंदुस्थानांतील इंग्रजी राजसत्तेची द्वाही सर्व हिंदुस्थानभर पसरविण्यासाठीं दिल्लीचा दरबार भरविण्यांत येत आहे, व हा हेतु मृत्यूच्या दरबारापासूनही पुष्कळ अंशीं सफळ होत आहे. आपण हल्लीं इंग्रजी अंमलाखालीं आहों ही गोष्ट मृत्यूच्या दरबारापासूनही सर्व हिंदुस्थानभर जाहीर होत आहे. इंग्रजी अंमलाचा डंका दिल्ली दरबाराच्या योगानें फक्त कांहीं थोड्या निमंत्रित शिक्षितांच्या आणि राजेरजवाड्यांच्या कानापर्यंत जाईल; परंतु मृत्यूचा दरबार आपल्यावर इंग्रजी अंमल आहे ही बातमी अगदीं खेड्यापाड्यांतून आणि हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यांतून सुद्धां पसरवीत आहे. असा एकही गरीब मनुष्य नाहीं, असा एखादा भिकारीसुद्धां सांपडणार नाहीं, कीं ज्याला आपण इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं आहों ही गोष्ट मृत्यूच्या दर-

बारानें विदित केलेली नाहीं. हे दोन्हीही दरबार हिंदुस्थानांत भरविण्याचा योग इंग्लिशांच्या कृपेमुळेंच आलेला आहे. दिलीचा दरबार हें तर त्यांच्या कृपेचें उघड उघडच फळ आहे. व हिंदुस्थानांतील दुष्काळांना दोषी इंग्रजी राज्यपद्धतच पुष्कळ अंशीं कारणीभूत झालेली आहे, हा कॉंग्रेस वगैरेचा सिद्धान्त खरा मानिला, तर मृत्यूचा दरबार हाही हिंदुस्थानांत इंग्रजांच्याच कृपेमुळें भरला जात आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. सारांश, हीं दोन्ही दरबाररूपी भावंडें एकाच जनकाचीं लेंकरें आहेत. या दोहोंच्यामध्यें अशा प्रकारचें नातें असल्यामुळें या दोन्ही दरबारांनीं एकमेकांकडे प्रेमदृष्टीनें पाहिलें असतां विशेष चांगलें होणार आहे. ह्या दोन भावंडांमध्यें बरीच देवघेव आणि अदलाबदल झाली तर तें किती इष्ट होणार आहे ? आम्ही ज्या अदलाबदलीसंबंधानें बोलत आहों तिच्याविषयीं थोडा जास्त खुलासा करणें जरूर आहे. या दोन भावंडांमध्यें अदलाबदल झाली पाहिजे ती कशी ? दिल्ली दरबारच्या मंडपामध्यें मांडलेल्या खुर्च्यांवर जरा मृत्यूच्या दरबारांतील सरदारांना—म्हणजे हिंदुस्थानांतील भणंग, भिकारी, अनाथ, मरणोन्मुख, पोरकीं पोरें, रिलीफ कामावर काम करणारे मजूर, वगैरे लोकांना नेऊन बसवावें, व दिल्लीच्या दरबाराकरितां जमणाऱ्या मंडळींना रिलीफ कामावरील झोंपड्या, रस्त्यावरील गटारें, मोठ्या शहरांतील भिकार लोकांचीं राहण्याचीं घरें आणि दुष्काळांतील मुलें वाढविण्याच्या मिशनरी लोकांच्या जागा यांतून नेऊन बसवावें. असें केल्यानें सदोदित गांजलेल्या गरीब लोकांना क्षणभर सुखाची चव घ्यावयाला सांपडेल आणि ह्या गरीब लोकांचें सुखदुःख ज्यांच्या हातामध्यें आहे अशा बड्या लोकांना गरीब लोक काय काय हाल सोशीत असतात हें प्रत्यक्ष पाहावयाला सांपडेल. दिल्लीच्या छावणींत तयार केलेल्या अन्नाच्या ढिगावर मृत्यूच्या दरबारांतील मानकऱ्यांना आणून सोडावें आणि दिल्लीदरबारांतील मानकऱ्यांना भिक्षा मागून, खडी फोडून, झाडाचा पाला खाऊन किंवा स्वधर्मावरील श्रद्धेची किंमत देऊन पोट जाळण्यामध्यें काय संकटें आहेत याच्या प्रत्यक्ष दर्शनानें अनुभव घेण्याकरितां पाठवावें. एकांचे उंची पोषाख, जडजवाहिर, हत्तीघोडे, शिपाईप्यादे दुसऱ्यांच्या हवालीं करावे; आणि दुसऱ्यांचीं रकटीं, दारिद्र्य, क्षुधा, खोल आणि भकाळ्या पडलेलें पोट, हें वैभव क्षणभर पहिल्यांना द्यावें. अशा प्रकारची अदलाबदल जर, एक क्षणभर

कां होईना, करितां आली तर त्यापासून हिंदुस्थानांतील गरीबांचें कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं. अशा प्रकारची वास्तविक अदलाबदल करितां येणें अशक्य आहे. ही केवळ कल्पनेनेंच केली पाहिजे. म्हणजे सारांश एवढाच कीं, आज हिंदुस्थानांतील बडे लोक आपल्याच गरीब मानवी प्राण्यांची जी अगदीं थोडी काळजी घेत आहेत ती त्यांनीं कांहीं तरी जास्त घ्यावी. इतके लोक हिंदुस्थानांत अन्न अन्न करीत असतां यांनीं थाटमाटाचे दरबार भरवावे हें ह्यांना रुचतें तरी कसें? आणि आपल्या देशामध्यें इतके लोक अन्नासाठीं मरत असतां, पावसांत भिजत असतां, थंडीनें कुडकुडत असतां, नेटिव राजांनीं तरी असल्या दरबारासाठीं आपला पैसा काय म्हणून उधळावा? फक्त रिलीफ कामावरचेच लोक घेतले, आणि हल्लीं ते दोन लाखच आहेत असें मानिलें, तरीदेखील ही संख्या कांहीं थोडी नाहीं. दिल्लींतील मिरवणुकीच्या वेळीं कर्झन-साहेब आपल्या मिरवणुकीच्या रस्त्याच्या दुतर्फा जे शिपाई उभे करणार आहेत, त्यांच्या ऐवजीं हे रिलीफ कामावरील लोक उभे करण्याचें ठरविलें व त्यांपैकीं प्रत्येक इसमाला फक्त दीड फूट जागेंतच उभें करावयाचें असें मानिलें, तर ह्या दुष्काळामुळें मरणोन्मुख झालेल्या लोकांच्या दुतर्फा रांगेमधून जवळ जवळ तीस मैल कर्झनसाहेबांना आपली मिरवणूक काढितां येईल इतकी ही संख्या मोठी आहे. कर्झनसाहेबांचा आवाज बराच मोठा आहे; व दिल्ली दरबारच्या मंडपामध्यें अगदीं शेवटच्या रांगेपर्यंत तो ऐकूं जाईल किंवा नाहीं याच्याबद्दलची प्रत्यक्ष तालीम करून कर्झनसाहेबांनीं आपला आवाज अजमावून पाहिला आहे. परंतु हे हिंदुस्थानांतील गरीब लोक इंग्रजी राज्याचा महिमा कर्झन-साहेबांच्या तोंडून ऐकण्याकरितां तेथें आणून बसविले तर दहा बारा हजार लोकांपुरता बांधलेला मंडप अगदीं लहान होईल व कर्झन साहेबांचा भव्य आवाज अगदीं कोता होईल इतकी ही संख्या मोठी आहे. असले लोक— हे मृत्यूच्या दरबारांतील सरदार— जर दिल्लीदरबारच्या मंडपामध्यें येऊन बसले तर त्यांच्यापुढें इंग्रजी राज्याच्या फायद्याचें वर्णन करतांना कर्झनसाहेबां-सारख्या वक्त्यांचीही जीभ वांकडी पडल्यावांचून राहणार नाहीं. असल्या विलक्षण श्रोत्यांपुढें इंग्रजी राज्यापासून कोणते फायदे झाले आहेत म्हणून कर्झनसाहेब सांगणार? हिंदुस्थान इंग्रजी अमलाखालीं श्रीमंत झालें आहे म्हणून सांगणार? किंवा सुधारलें आहे म्हणून सांगणार? किंवा सांगणार तरी काय?

असल्या श्रोत्यांपुढें कितीही धूर्त इंग्रजी मुत्सद्दी आला आणि त्यानें इंग्रजी राज्याची कितीही तरफदारी केली, तरी त्याचीं सर्व विधानें खोटींच पडली पाहिजेत. आणि अशा लोकांपुढें राजाचा जाहीरनामा तरी कोणता वाचणार? महाराजे, चीफ, संस्थानिक, सरदार, रावबहादुर, खानसाहेब, कौन्सिलर्स, जे. पी., मॅजिस्ट्रेट्स, सुशिक्षित पदवीधर, शेटसावकार वगैरे लोक जाहीरनाम्यांतील ज्या शब्दांनीं फसले जातात तसले शब्द असल्या श्रोत्यांपुढें काय कामाचे? यांच्या पोटाला ऐकूं येईल असाच यांना जाहीरनामा पाहिजे. पण असले जाहीरनामे—ज्यानें गरीबांचीं पोटें अन्नानें भरतील असले जाहीरनामे— श्रीमंतांचे कान शब्दांनीं भरतील असले नव्हे—इंग्रज सरकारापाशीं आहेत कोठें? अजूनपर्यंत तरी निदान सरकारनें असले जाहीरनामे कोठें प्रसिद्ध केल्याचें प्रसिद्ध नाहीं. सारांश, हिंदुस्थानांतील मृत्यूचा दरबार बंद होईल तरच हिंदुस्थानांत दिल्लीच्या दरबाराला पात्रता आहे. पण जोंपर्यंत असें होत नाहीं व मृत्यूच्या दरबाराचा थाटमाट थोड्याबहुत कमीजास्त प्रमाणानें आहे तसाच हिंदुस्थानांत चालू आहे, तोंपर्यंत दिल्लीच्या दरबारासारखे शेंकडों दरबार भरले तरी त्यांपासून हिंदुस्थानाला खरा उपयोग काय आहे?

———

# गोवध : : : १६

काळ : अग्रलेख, ता. २१-११-१९०२

हिंदुस्थानांतील लोकांच्या डोक्यांत दुसरे कांहीं विशेष गुण नसले तरी कल्पकपणाचा गुण पुष्कळ आहे यांत कांहीं शंका नाहीं. हिंदुस्थानांत दिल्ली दरबार भरावयाचा ही गोष्ट प्रसिद्धीस आल्या क्षणापासून हिंदुस्थानांतील डोकीं नवीन नवीन कल्पना काढण्यामध्यें अगदीं गर्क होऊन गेलेलीं आहेत. दिल्लीचा दरबार ही एक हिंदुस्थानांत मोठी पर्वणीच आलेली आहे. इतर एखादी पर्वणी आली असतां ज्याप्रमाणें भटाभिक्षुकांच्या तोंडाला पाणी सुटूं लागतें व आपल्या यजमानाकडून मिळावयाच्या दक्षिणेबद्दलच्या स्वप्नांनीं ज्याप्रमाणें त्यांची झोंप व्यग्र होऊं लागते, त्याप्रमाणें ही दिल्ली दरबारची पर्वणी येणार असें गॅझेटच्या पंचांगांत वर्तविलें गेल्यापासून हिंदुस्थानांतील राजकीय पुढारी भटाभिक्षुकांची स्थिति होऊन गेली आहे. कोणाला वाटतें कीं, दिल्ली दरबारच्या वेळीं मिठावरील कर कमी होईल. कोणी म्हणतो प्राप्तीवरील कर कमी होण्याविषयीं त्या वेळीं खरी खटपट करावी. कोणाची कल्पना आहे कीं, नेटिव राजांचें एक कौन्सिल पुनरुज्जीवित करून व्हाइसरॉयसाहेबांनीं त्यांचा सल्ला घेण्याची पद्धति सुरू करावी. ह्या राजकीय भटाभिक्षुकांना पडणाऱ्या अनेक स्वप्नांपैकीं एक अगदीं ताजें स्वप्न असें आहे कीं, ह्या दिल्लीदरबारच्या मुहूर्तावर आपल्या एडवर्डसाहेबांनीं जर आपल्या हिंदुस्थानांत होणारा गोवध बंद केला तर त्यापासून हिंदुस्थानांत बैल पुष्कळ होतील, बैल पुष्कळ झाले म्हणजे शेतकी चांगली चालेल, शेतकी चांगली

चालली म्हणजे लोकांना खावयाला पोटभर मिळेल व सर्व हिंदुस्थान आबादी आबाद होईल. तसेंच गाई कमी मारल्या गेल्या म्हणजे दूध पुष्कळ होईल, दूध पुष्कळ झालें म्हणजे तुपांत चरबी मिसळावयाची जी चाल पडली आहे ती बंद होईल. असे एक ना दोन, अनेक फायदे हिंदुस्थानाला लाभतील. अशा प्रकारचा एक तरंग एका गृहस्थांच्या मनावर उठल्यामुळें त्यांनीं अर्ज लिहून व्हाइसरॉयसाहेबांकडे रवाना करून दिला आहे. व त्यामध्यें गोवध करूं नये, अशाबद्दल एक कायदा करावा म्हणून विनंति केली आहे. पण कर्झनसाहेबांनीं कदाचित् असा कायदा करण्याचें मनांत आणलें तरी तो पाश्चिमात्य सुधारणेला शोभला पाहिजे, व तसा तो शोभण्याला पाश्चिमात्य सुधारणेमध्यें दुसरे असले वेडगळ कायदे कोठें आहेत, अशी कदाचित् कोणी शंका काढील. तेव्हां केवळ एवढ्याच अडचणीमुळें हिंदुस्थानांतील गोवध बंद होण्याची संधि फुकट जाऊं नये, म्हणून सदर अर्जदार मि. खरशेटजी सोराबजी यांनीं दुसऱ्या कायद्यांचे आधारही काढून दाखविले आहेत. शिकारीचे प्राणी मारूं नयेत अशाबद्दल इंग्लंडमध्यें आणि युरोपमध्यें कायदे आहेत, व हिंदुस्थानांतही अलीकडे होत चालले आहेत, इत्यादि आधार दाखवून आपल्या बाजूचा पुरावा मजबूत करून मि. खरशेटजी यांनीं आपला अर्ज वर धाडून दिला आहे. अशा रीतीनें मि. खरशेटजी यांनीं आपल्याकडून सर्व तयारी केलेली आहे. पण त्याच्या पुढली गोष्ट मि. खरशेटजी यांच्या हातांत नाहीं. वाजंत्र तयार करणें व तें एखाद्याच्या तोंडाशीं त्यानें वाजवावें म्हणून नेणें येथपर्यंत मि. खरशेटजी यांचें काम आहे. पण त्यांत वारा भरून त्यांतून सुंदर आवाज प्रकट करविणें हें मि. खरशेटजी यांच्या हातामध्यें नाहीं व अशी जोंपर्यंत स्थिति आहे तोंपर्यंत असले अर्ज वगैरे सर्व फुकट आहेत. दुसऱ्याच्या आर्जवानें कांहीं एक होणें शक्य नाहीं. सर्व कांहीं आपलें आपणच केलें पाहिजे. आपल्याला जर एखादी गोष्ट करतां येण्यासारखी असली तरच ती होईल म्हणून समजावें; व एखादी गोष्ट व्हावी असें जर आपल्याला वाटत असेल तर ती आपली आपणच करून घेण्याला सिद्ध झालें पाहिजे. कर्झनसाहेब हिंदुस्थानाकरितां काय करणार? आणि गोवधाकरितां तरी काय करणार ? आपला खरा फायदा आपणच करून घेतला पाहिजे. कर्झनसाहेबांनीं गोवध बंद करून आपल्या सोजिरांना खावयाला काय द्यावें? तुमच्या लहान लहान मुलांना गाईचें दूध प्यावयाला मिळावें म्हणून त्यांनीं

आपल्या पाऊण लाख सोजिरांची उपासमार करावी कीं काय ? प्रत्येक सोजिराला रोज निदान एक पौंड म्हणजे पक्का अर्धा शेर गाईचें मांस मग कोठून आणावयाचें ? गोवधाच्यासंबंधानें मुख्य अडचण हीच आहे. गोवध बंद केला तर इतक्या ७५,००० सोजिरांच्या पोटाची वाट काय करावयाची ? मि. खरशेटजी म्हणतात कीं, अकबरानेंदेखील गोवध बंद केला होता. होय, केला असेल. पण अकबर आपल्या सोजिरांना दररोज पक्का अच्छेरभर गाईचें मांस चारीत नव्हता. त्या वेळीं कदाचित् कांहीं अगदीं वरवरचे अतिशय श्रीमंत मुसलमान लोक कधीं कधीं जेवणांत गोमांसाचा उपयोग करीत असतील. परंतु पलटणींतल्या यःकश्चित् शिपायासारख्या पुष्कळ कमी दर्जाच्या मनुष्यापर्यंतदेखील प्रत्येकाला पक्क्या अच्छेराचा रोजचा रतीब तेव्हां असेल असें संभवत नाहीं. त्यामुळें मुसलमान रियासतींत अकबराला ही गोष्ट करितां आली असेल, पण ती ह्या इंग्रजी रियासतींत कशी शक्य व्हावी ! सारांश, सरकारच्या बाजूनें विचार करितां सरकार असला स्वहितघातक कायदा कधींही करणार नाहीं. तेव्हां असल्या गोष्टींबद्दल सरकारकडे मागणी करणें आणि त्या मागणीला इतर उदाहरणांची बळकटी देणें या सर्व गोष्टी व्यर्थ आहेत !

असल्या प्रश्नांचा आपण आपल्याशींच विचार केला पाहिजे; व हल्लींच्या गोवधाच्या पद्धतीनें आपलें किती नुकसान होत आहे या प्रश्नासंबंधानें आपले डोळे उघडले पाहिजेत. मि. खरशेटजी यांच्या हिशेबाप्रमाणें पाहिलें असतां हिंदुस्थानांतील सोजिरांकरितां दररोजच्या ३७५ गाई लागतात. म्हणजे सुमारें २०० सोजिरांना रोजची एक गाय लागते. किंवा हेंच प्रमाण थोडेसें उलट केलें तर एक सोजीर एका गाईचें रोज एकेक पौंड मांस काढून घ्यावयाचें अशा रीतीनें एक गाय सुमारें ६—६॥ महिन्यांमध्यें संपवून टाकतो. प्रत्येक सोजिराला वर्षाच्या खाण्याला जवळ जवळ २ गाई लागतात. व प्रत्येक सोजिराच्या रोजच्या जेवणाला सुमारें $\frac{1}{200}$ गाय लागते. एका गाईच्या पोटांत दुसऱ्या वांसराचा नवीन गर्भ राहिला तर तो गर्भ तयार होऊन ती दुसरी नवीन गाय हिंदुस्थानांतील मनुष्याच्या हातीं लागण्याला सुमारें नऊ महिने लागतात. पण तेवढ्या मुदतींत एक सोजीर दीड गाय फडशा करून टाकतो. म्हणजे देव जितक्या वेळांत एक गाय नवीन बनवितो तितक्याच वेळांत सोजीर देवानें पूर्वीं उत्पन्न करून ठेवलेल्या गाईपैकीं १॥ गाय नाहींशी करितो. अशा

रीतीनें देवाच्या गाय उत्पन्न करण्याच्या शक्तीपेक्षांही सोजिराची गाय भक्षण करण्याची शक्ति जास्त आहे. सोजीर लोक हिंदुस्थानांतील १,३६,८७५ गाई खात आहेत. व ह्या दरानें १८५७ सालच्या बंडानंतरपासून पुढल्या फक्त ४५ वर्षांचाच हिशेब केला तरी त्यांनीं आतांपर्यंत हिंदुस्थानांतील सुमारें ६१,५९,३७५ गाई खाल्ल्या आहेत. इतक्या गाई अतिशय क्रूर मुसलमान राजांनींदेखील मारलेल्या नसतील. मुसलमान राजांची करणें थोडें न वटवट फार अशी स्थिति होती. त्यामुळें त्यांच्याबद्दल गवगवा फार झाला. एखादी गाय आणावयाची आणि हिंदु लोकांच्या भरवस्तींत त्या सर्वांच्या देखत तिचा वध करावयाचा, असे प्रकार मोंगलाईंत चालत, म्हणून हिंदु लोक चिडत असत. पण हीच गोष्ट त्या मुसलमानांनीं एके बाजूस केली असती आणि मग एकीच्या ठिकाणीं त्यांनीं दहा गाई मारल्या असत्या तरी तिकडे कोणी ढुंकूनसुद्धां पाहिलें नसतें. जे आपल्या देशांतील ६१,५९,३७५ गाईबद्दलसुद्धां बेफिकीर राहिलेले आहेत ते मुसलमानांनीं कांहीं थोड्याशा गाईंची आपल्या डोळ्याआड कत्तल केली असती तर चिडले असते असें कोणाला तरी म्हणतां येईल काय ? पण पूर्वींच्या मुसलमानी राजांना हें राजनीतीचें नाजुक धोरण ठाऊक नसल्यामुळें ते गोवध करणारे म्हणून त्यांच्याबद्दल बोभाटा झाला ! आणि ज्यांच्या राज्यांत प्रत्येक वर्षीं जवळ जवळ दीड लाख गाईंच्या फक्त सोजिराकरितां फोडी केल्या जात आहेत ते अत्यंत कनवाळू म्हणून त्यांचा डंका सर्व भूमंडळावर वाजत आहे ! व कोणी " Cruelty to animals " ( प्राण्यांविषयीं क्रूरपणा ) चा अन्याय केल्यास त्यांना ते कायदेशीर शिक्षा देत आहेत ! सारांश, खुबीनें काम केलें पाहिजे. मुसलमानी दांडगाई उपयोगी नाहीं.

या जरी सर्व गोष्टी खऱ्या आहेत व अशा कारणामुळें इतक्या भयंकर प्रमाणावर होत असलेला गोवध जरी लोकांच्या डोळ्यावर येत नाहीं, तरी सरकारनें त्याबद्दल उपेक्षा करणें हिंदुस्थान देशाच्या फायद्याच्या दृष्टीनें न्यायीपणाचें होणार नाहीं. सरकारी रिपोर्टांतून अनेक प्रकारचे आंकडे प्रसिद्ध होत असतात. त्यांत साप वगैरे विषारी प्राणी चावून मेलेल्यांचेही आंकडे कोठें कोठें आढळतात. त्याच धर्तीवर पाहिलें असतां सिंह, लांडगे, वाघ, यांनीं एका वर्षांत किती मेंढरें, बकरीं, गाई, म्हशी, वासरें, बैल वगैरे धरून खाल्ले याच्याबद्दलही आंकडे प्रसिद्ध व्हावयाला पाहिजे होते. पण तसे कोठें प्रसिद्ध होत असलेले

आढळून येत नाहींत. परंतु जर कोणी असे आंकडे काढले तर त्यांत पृथ्वीच्या पाठीवरील एका लहानशा देशांत सिंह, लांडगे, वाघ यांनीं एका वर्षांत खाल्लेल्या गाईंची देखील संख्या १,३६,८७५ इतकी मोठी खात्रीनें भरणार नाहीं. पण मनुष्यानें सिंहादिकांच्याही वर ताण करून सोडली आहे! देवानें ह्या वन्य प्राण्यांना आपल्याकडून सर्वांत क्रूर म्हणून बनविलें, पण हे आंकडे पाहून देवालाही आपला हेतु निष्फळ झाल्याबद्दल थोडेसें तरी खजील व्हावें लागेल! हिंदु लोकांच्या पापपुण्याच्या कांहीं विशिष्ट कल्पना पुरातन काळापासून चालत आलेल्या आहेत. त्यांत गोहत्त्या अत्यंत घोर पातक म्हणून गणलें गेलेलें आहे. व अशा प्रकारचीं पातकें जर फार झालीं तर कांहीं तरी ईश्वरी क्षोभ उत्पन्न झालाच पाहिजे अशी हिंदु लोकांची कल्पना आहे. मुसलमानी राज्याचा उच्छेद होण्याला जीं अनेक कारणें झालीं त्यांत हिंदु लोकांच्या मताप्रमाणें गोवध हेंही एक कारण होतें. गोहत्त्या श्रेयस्कर नाहीं, तें महापातक आहे, असें हिंदु लोकांना त्यांच्या खऱ्या भूतदयायुक्त पूर्वजांनीं--ऋषींनीं आणि मुनींनीं, साधूंनीं आणि संतांनीं, याज्ञिकांनीं आणि वेदांत्यांनीं, बौद्धांनीं आणि जैनांनीं शिकविलेलें आहे; व या गोष्टीवर त्यांचा आतांपर्यंत पूर्ण विश्वास आहे. परंतु वरील आंकडे पाहून व प्रतिवर्षीं गोवधाची जवळ जवळ दीड लाखोली होत असलेली पाहून व तरीही जग जितक्या भरभराटींत असावें तितक्या भरभराटींतच असलेलें पाहून त्या बिचाऱ्यांनीं आपल्या पापपुण्याच्या कल्पनांना फिरून चालना दिली पाहिजे, व आपल्या पापपुण्याच्या कल्पना ह्या नवीन कालमानाप्रमाणें बदलून घेतल्या पाहिजेत, अशा प्रकारची आज स्थिति येऊन पोंहोचली आहे.

इतका गोवध हिंदुस्थानासारख्या देशांत होणें चांगलें नाही, व तो होऊं देणेंही चांगलें नाहीं. इतका गोवध हिंदुस्थानांत ज्यांच्यामुळें होतो ते गोरे शिपाई हिंदुस्थानला पाहिजे आहेत कशाला? इंग्रजांना जर हिंदुस्थानचें संरक्षण करावयाचें आहे (आणि तें सांप्रतच्या युरोपियन राष्ट्रांच्या चढाओढीच्या स्थितींत त्यांनींच केलें पाहिजे) तर तें त्यांना नेटिव शिपायांकडून करवितां येणार नाहीं असें नाहीं. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, हल्लींच्या हिंदुस्थानच्या इंग्रजी राज्यकर्त्यांची बुद्धि मत्सरग्रस्त होऊन गेली आहे. त्यामुळें त्यांना हे गोरे सोजीर आवश्यक झाले आहेत. वास्तविक हे हिंदुस्थानच्या संरक्षणाकरितां नाहींत, तर हे हिंदुस्थानांत असलेल्या थोड्याशा

संशयग्रस्त अँग्लोइंडियन लोकांच्या संरक्षणाकरितां आहेत असेंच म्हणावें लागतें. हिंदुस्थानावर कोणीही राजा असो, हिंदुस्थानचें संरक्षण हिंदुस्थानच्या लोकांनीं केलेलें आहे. त्यासाठीं सोजीर नकोत. आतांदेखील रशिया आला तर हिंदुस्थानांतील शिपायांच्या हातांत नवीन तऱ्हेचीं शस्त्रें दिलीं असतां आणि त्यांना नवीन तऱ्हेचें शिक्षण दिलें असतां त्यापासून ते लोक हिंदुस्थानचें संरक्षण खात्रीनें करतील. आज हिंदुस्थानांतील शिपायांना नवीन शस्त्रें वापरतां येत नसलीं किंवा लढाईत युरोपियन युक्त्या करितां येत नसल्या तर त्याबद्दलचा दोष इंग्रजांच्या संशयाकडे आहे, नेटिवांच्या शौर्याकडे नाहीं. अशी वस्तुस्थिति असतांना हिंदुस्थानचें अनेक तऱ्हेनें ज्यांच्यापासून नुकसान आहे ते सोजीर हिंदुस्थानाला पाहिजेत कशाला ? व हे जर खरोखर युरोपियनांच्याच संरक्षणाकरितां आहेत, आणि त्यांच्या परक्या ठिकाणच्या लढाया लढण्याकरितां आहेत, तर त्यांचा खर्च हिंदुस्थानांतील नेटिवांवर काय म्हणून असावा ? ते ज्यांचें संरक्षण करीत आहेत, त्या अँग्लोइंडियनांनीं त्यांचा खर्च द्यावा हें रास्त नव्हे काय ? पण हल्लीं चमत्कार असा होत आहे कीं, हिंदुस्थानच्या पैशावर हें सोजिरांचें सैन्य उभारलेलें असून व त्यावरच त्यांचा चरितार्थ चाललेला असून हे सोजीर गोवधाच्या द्वारानें त्याच हिंदुस्थानच्या नुकसानीला अनेक प्रकारांनीं कारणीभूत होत आहेत. सोजिरांच्यामुळें हिंदुस्थानांतील फक्त गाईच मरतात असें नाहीं; तर थोड्याशा पर्यायानें बोलावयाचें झाल्यास त्यांच्यामुळें हिंदुस्थानचीं तान्हीं मुलें मरतात, आणि मोठमोठीं माणसेंही मरतात. त्यांच्यामुळें हिंदुस्थानची लागवडीस आलेली जमीन ओसाड पडते, आणि पूर्वीं सधन असलेल्या शेतकऱ्यांना रिलीफ कामावर पोट जाळण्यासाठीं जावें लागतें ! कारण गाईच्या अभावीं हे सर्व परिणाम अपरिहार्यच आहेत.

सबब या गोष्टीकडे हिंदुस्थान सरकारचें लक्ष जाणें जरूर आहे. सरकारला रुचणार नाहीं असें कोणी कांहीं सुचविल्यास क्रोधाविष्ट होणें हें फार सोपें आहे. पण ४५ वर्षांमध्यें हिंदुस्थानांतल्या ६१,५९,३७५ गाई खाल्ल्या गेल्या हें कांहींच नाहीं काय ? ह्या आंकड्यांत कांहींच अर्थ नाहीं काय ? ज्या देशांतल्या इतक्या गाई खाल्ल्या गेल्या त्या देशांत दुष्काळ कां पडतो म्हणून कारणें शोधण्यासाठीं कमिशनें बसवावयाला पाहिजेत काय ? इंग्लिश लोकांच्या मतानें गाईला आत्मा नाहीं; पण देवाच्या मताप्रमाणें आब्रह्मस्तंबपर्यंत प्रत्येक

प्राण्याला आत्मा आहे आणि हें जर खरें असेल, तर ६९,५९,३७५ गाईंचें आत्मे ओरडत असतील! आक्रोश करीत असतील! हंबरडे फोडीत असतील! हिंदुस्थानांतील लोकांच्या अर्जाच्या द्वारानें चालू असलेल्या आरोळ्यांकडे सरकारनें दुर्लक्ष केलें तरी ह्या ६९,५९,३७५ गाईंच्या आत्म्यांच्या आक्रोशा-कडे तरी निदान सरकारनें दुर्लक्ष करतां कामा नये, कारण ह्या इतक्या आत्म्यांचा आक्रोश मनुष्यानें ऐकिला नाहीं तर परमेश्वर तो खात्रीनें ऐकेल व मनुष्यानें त्याला भ्यालें पाहिजे.

---

# कराराची कल्पना : : : १७

काळ : अग्रलेख, ता. २८-११-१९०२

★ आम्हीं कोणाची खासगी मिळकत नाहीं. आपण आपलीं कर्तव्यें केलीं तर आपलेही हक्क मान्य होतील.

राज्यारोहणाच्या निमित्तानें ९ ऑगस्टला विलायतेस मोठा समारंभ झाला. आणि त्याचसंबंधानें येत्या १ ल्या जानेवारीला हिंदुस्थानांत मोठा समारंभ व्हावयाचा आहे. हे दोन समारंभ भिन्न स्थळीं आणि भिन्न काळीं होत आहेत एवढाच काय तो ह्यांच्यामध्यें भेद आहे. बाकी दोहोंचेंही प्रयोजक कारण एकच आहे, हें कोणालाही सांगावयाला पाहिजे असें नाहीं. ब्रिटिश साम्राज्या-मधील सर्व लोकांवर महाराणी व्हिक्टोरिया ह्या कांहीं दिवसपर्यंत राज्य करीत होत्या. त्या आपल्या ताब्यांतील लोकांवर राज्य करीत होत्या तोंपर्यंत त्या आणि त्यांच्या प्रजा यांच्यामध्यें एक प्रकारचा संबंध जडलेला होता त्या आणि त्यांची प्रजा या दोन पक्षांमध्यें एक प्रकारचा करार अस्तित्वांत आलेला होता. परंतु त्यांपैकीं एक पक्षकार मरण पावल्यामुळें अर्थात् या दोन पक्षांमध्यें पूर्वीं असलेला संबंध तुटून गेला. कारण, ज्या दोन पक्षांच्या दरम्यान एखादा करार ठरला जातो त्यांपैकीं एक पक्षकार मरण पावला तर अर्थात् तो करार तेथें संपला हें उघड होतें. कित्येक करार असे असतात कीं, त्या करारांनी बांधली गेलेली व्यक्ति मरण पावलीं तरी देखील ते करार तेथेंच न थांबतां व

विस्खलित न होतां त्या व्यक्तीचे वशज त्या करारानें बांधले जातात. उदाहरणार्थ 'अ' नें 'ब' पासून कांहीं कर्ज घेतलें व तें कांहीं मुदतीमध्यें देण्याचा करार करून 'अ' मरण पावला, तर तें कर्ज देण्याच्या करारानें 'अ'चा मुलगा बांधला जातो. व 'अ' आणि 'ब' यांच्यामध्यें जो करार होता तो 'अ' च्या मरणानंतर 'अ' चा मुलगा आणि 'ब' यांच्यामध्यें अस्तित्वांत आहेच असें आपण सर्वजण मानतों. परंतु सर्वच करार असल्या जातीचे नसतात. त्याच्यापेक्षां भिन्न भिन्न जातींचेही अनेक करार आहेत. कोणी स्त्री-पुरुषांमध्यें वैवाहिक संबंधाचा करार झालेला असतो. असल्या करारांत एक व्यक्ति मृत झाली म्हणजे तो करार विस्खलित होतो. 'अ' या पुरुषापाशीं कोणी 'ब' या स्त्रीनें विवाहसंबंधानें राहण्याचा करार करून 'अ' नवरा जर मरण पावला तर 'ब' ही 'अ' च्या मुलाशीं सुद्धां त्याच संबंधानें राहण्याला बांधलेली आहे असें कोणीही मानीत नाहीं. सारांश, करारांतील पक्षकाराच्या मरणानें करार विस्खलित झाला अशा प्रकारचेही पुष्कळ करार आहेत. आणि राजा व प्रजा यांच्यामधील करार अशाच प्रकारचा आहे. राजा आणि प्रजा यांच्यामध्यें कांहीं करार असतो आणि यांचा परस्परसंबंध कराराच्या तत्त्वावर जडलेला असतो ही गोष्ट हिंदुस्थानात अजून नवी आहे. पण इंग्लिश लोकच ती हळूहळू हिंदुस्थानांत प्रविष्ट करण्याचा प्रयत्न करीत आहेत. कोणी राजा मेला म्हणजे त्याच्या मुलानें गादीवर बसावें आणि बापाचें राज्य त्यानें चालवावें असा हिंदुस्थानांतील मूळचा क्रम होता. पण हा क्रम बदलत जाऊन हिंदुस्थानांत इंग्रज सरकार नवीन एक क्रम प्रचारांत आणूं पाहत आहे. राजा आणि प्रजा ह्यांमधील कराराची कल्पना ही मूळची पश्चिमेकडील. फ्रान्स देश हें या कल्पनेचें उगमस्थान होय; व ह्या कल्पनेनें आपला अम्मल फ्रान्सइतका जरी इग्लंडवर बसविला नाहीं, तरी इंग्लंडच्या राज्यपद्धतींत हें कराराचें तत्त्व बिलकूल प्रविष्ट झालें नाहीं असें कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. इंग्लंडची गादी ज्येष्ठ पुत्राला मिळते, सबब तेथें राजा आणि प्रजा यांच्यामधील कराराचें तत्त्व संभवत नाहीं, असें कोणी म्हटल्यास तें कधींही बरोबर होणार नाहीं. मृत राजाचा किंवा राणीचा प्रत्येक ज्येष्ठ पुत्र, मग तो कोणत्याही धर्माचा, मताचा अथवा गुणाचा असो, तो ज्येष्ठ पुत्र आहे एवढ्याचसाठीं जर गादीवर बसू शकत असेल तर इंग्लंडमध्यें असल्या बाबतींत कराराची कल्पना नाहीं असें

म्हणतां येईल. पण मृताच्या प्रत्येक ज्येष्ठ पुत्राला इंग्लंडच्या गादीवर बसतां येत नाहीं. तो अमुक एका विशिष्ट धर्माचाच असला पाहिजे तरच तो गादीवर बसूं शकेल, असा इंग्लंडमधील क्रम आहे. याचा अर्थ करार नव्हे तर काय होतो ? जो इंग्लंडच्या गादीवर बसावयाचा तो प्रॉटेस्टंट धर्माचा असेल तरच त्याला इंग्लंडचे लोक गादीवर बसूं देतात. व मी तुमच्यावर अमुक अमुक नियमानुसार राज्य करीन अशा प्रकारची तो लोकांसमोर शपथ घेतो. ही जी इंग्लंडमध्यें राज्यारोहणाच्या पूर्वीं प्रक्रिया चालते त्याचा अर्थ राजा आणि प्रजा यांच्यामधील कराराशिवाय दुसरा काय होऊं शकतो ? कांहीं विवक्षित अटी उभयपक्षीं कबूल झाल्यानंतर एकजण गादीवर बसतो आणि दुसरे त्याच्या अमलाखालीं जातात, ही गोष्ट करार नव्हे तर दुसरें काय होऊं शकेल ? इतक्या थराला इंग्लंडमध्यें ही करारार्ची कल्पना येऊन पोंहोचलेली आहे. व ती दिवसेंदिवस जास्त प्राबल्य पावत चाललेली आहे.

ही इंग्लंडची स्थिति झाली. आतां याचसंबंधानें हिंदुस्थानांतील स्थिति काय आहे या प्रश्नाकडे आपण वळूं. जवळचा ज्येष्ठ वंशज हा मृताच्या पाठीमागें त्याच्या गादीचा मालक, हें हिंदुस्थानांतील दायप्रकरणामधील मुख्य धोरण होतें. जेथें मृत मनुष्य निपुत्रिक असेल तेथें दत्तक घेण्याचा रिवाज रूढ असल्यामुळें दत्तक घेतलेला इसम हाच अर्थात् जवळचा ज्येष्ठ वंशज झाल्यामुळें गादीचा मालक इकडच्या रिवाजाप्रमाणें आजपर्यंत मानला जात असे. एखादा सामान्य इसम मृत झाला तर त्याची जी कांहीं खासगत मिळकत असेल तिच्यावर त्याच्या मुलाची मालकी उत्पन्न होते हा नेहमींच्या व्यवहारांतील नियम आहे; त्यालाच अनुसरून राजाच्या मुलाकडे त्याचें राज्य जावें ही चाल रूढ झालेली असावी हें उघड दिसतें. पण ह्या कल्पनेंत एक मोठा दोष आहे. यांत राज्य ही राजाची खासगी मिळकत आहे असें मानलें जातें. परतु असें मानलें जातां कामा नये. एखाद्या यःकश्चित् व्यक्तीची खासगी मिळकत म्हणजे आपण काय समजतों ? त्याचीं शेतें, त्याचीं घरें, त्याचीं झाडें, त्याच्या गाई, त्याच्या म्हशी ही आपण त्याची खासगी मिळकत म्हणून समजतों. या अर्थानें एखाद्या राजाचें राज्य ही त्याची खासगी मिळकत आहे असें कोणी तरी मानणें श्रेयस्कर आहे काय ? आणि एखाद्या राजाचें राज्य असें म्हणतों त्या ठिकाणीं

राज्य शब्दाचा अर्थ काय असतो ? त्यांत इतर गोष्टींचा समावेश होतोच, पण राज्य म्हटलें म्हणजे त्यांत त्या राजाच्या अमलांतील अनेक लोकांचाही समावेश होतो. आणि राज्य ही जर राजाची खासगी मिळकत झाली, तर त्या राज्यांतील लोक ही सुद्धां त्या राजाची एक खासगी मिळकत होऊं लागेल. पण ते त्याची खासगी मिळकत कशी होणार ? गाई, म्हशी, बैल, टोणगे, मेंढरें, बकरीं ही जशी एखाद्याची खासगी मिळकत असते तशा प्रकारचे राज्यांतील असंख्य लोक ही तेथील राजाची खासगी मिळकत मानावयाची कीं काय ? अशा रीतीनें लोकांना खासगी मिळकतींत गणावयाचें म्हणजे हात, पाय, कान, नाक, डोळे, आणि विशेषतः बुद्धि असलेल्या मनुष्य प्राण्यांना गाई, म्हशी, बैल, टोणगे इत्यादि बुद्धिहीन पशूंच्या पंक्तीला नेऊन बसविण्यासारखें आहे. व कोणतेही समंजस लोक कोणत्याही राजाकडून अशा रीतीनें पशूंमध्यें आपली गणना करून घेण्याला कधींही तयार होणार नाहींत. सारांश, एखाद्या राज्यांतील लोक हे त्या राजाची खासगी मिळकत नाहीं. ते स्वतंत्र लोक आहेत. एखाद्या मनुष्याच्या गोठ्यांत गुरें बांधलेलीं असतात, आणि त्यांच्यापुढें तो जितक्या पेंढ्या सोडील तितक्या खाऊन तीं स्वस्थ बसतात तशा प्रकारची एखाद्या राज्यांतील लोक हे तेथील राज्याच्या गोठ्यांतील गुरें खात्रीनें नाहींत. राज्यांतील लोक हा एक पक्ष आहे, आणि तेथील राजा हा दुसरा पक्ष होय. हे दोन्ही पक्ष सारख्याच योग्यतेचे आणि सारख्याच स्वतंत्रतेचे असतात. ह्यांत एक कमी आणि दुसरा जास्ती असा वर्ग मानण्याला वास्तविक कोणाला‌ही जागा नसते. व ही वास्तविक स्थिति कराराच्या तत्त्वामध्यें पूर्णपणें कायम राहते. परंतु आनुवंशिक पद्धतीचा स्वीकार केला म्हणजे तेथें राज्यांतील सजीव आणि निर्जीव, स्थावर आणि जंगम यच्चयावत् सर्वांना खाजगी मिळकतीचें स्वरूप येतें व मेलेल्या राजाचा जो कोणी वारस ठरेल, तो मग लहान मुलगा असो किंवा एखादी मूर्ख स्त्री असो, त्याच्यापुढें राज्यांतील मोठमोठ्या लोकांनाही नाकें घासण्याचा प्रसंग येतो. हिंदुस्थानांत चालू असलेली पद्धत—ही मनुष्याला जनावरांच्या पंक्तीला नेऊन बसविणारी ही पद्धत—फार वाईट आहे, ती मोडून टाकावी, अशा सद्बुद्धीनें या कृत्याला हात घालण्याला एकदां इंग्लिश सरकार प्रवृत्त झालें होतें. ती वेळ म्हणजे डलहौसीच्या कारकीर्दींतील होय. प्रजा ही राजाची खासगी मिळकत नव्हे हें पाश्चिमात्य

उदात्त तत्त्व हिंदुस्थानांत प्रचलित करण्याला राज्यावर वंशपरंपरागत प्राप्त झालेले हक्क नाकबूल करणें हा एक उत्तम उपाय आहे हें कोणाच्याही ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. वंशपरंपरागत हक्कांचें अस्तित्व नाहींसें केलें म्हणजे अर्थातच कराराचें तत्त्व अमलांत येण्याला जास्त मदत मिळाल्यावांचून राहणार नाहीं, हें अगदीं उघड आहे. या धोरणाला अनुसरून डलहौसीसाहेबांच्या कारकीर्दींत जे राजे निपुत्रिक होऊन मरण पावले त्यांना दत्तक घेण्याला प्रतिबंध करण्यांत आला. कांहीं लोक म्हणतात कीं, इंग्रज सरकारला त्यांचीं राज्यें खालसा करावयाचीं होतीं आणि आपलें राज्य मोठें करावयाचें होतें, म्हणून त्यांना दत्तकाच्या परवानग्या दिल्या नाहींत. पण त्या राजांचा आपल्यावर जो खासगी मिळकतीप्रमाणें हक्क होता तो हक्क डलहौसीसाहेब आपल्या ह्या दत्तकाच्या प्रतिबंधानें नष्ट करून टाकीत होते व आपल्याला अप्रत्यक्ष रीतीनें स्वतंत्र प्रजेचे हक्क आणून देत होते ही गोष्ट पुष्कळ आक्षेपकांच्या ध्यानांत आलेली नाहीं. डलहौसीसाहेबांच्या ह्या परोपकारी कृतीबद्दल १८५७ सालीं हिंदुस्थानांतील शिपाई लोकांनीं फार गवगवा केल्यामुळें त्या वेळीं हें परोपकाराचें कृत्य तसेंच थबकून राहिलें. परंतु इंग्लिश लोकांचा स्वभावच असा आहे कीं, ते परोपकाराच्या कामामध्यें कितीही संकटें आलीं तरी हतोद्यम म्हणून कधींही व्हावयाचे नाहींत. कोणत्याही राज्यांतील लोकांना तेथील राजाच्या खासगी मिळकतीच्या स्वरूपापासून सोडविण्याचा इंग्लिशांनीं विडाच उचललेला आहे. व त्याकरितां जरूर असलेल्या वंशपरंपरागत हक्काच्या नाशाला त्यांनीं योजिलेला दत्तकाच्या प्रतिबंधाचा उपाय फलद्रूप होत नाहीं असें पाहून त्यांनीं हल्लीं ह्या वंशपरंपरागत हक्काच्या नाशासाठीं दुसरा एक उपाय शोधून काढलेला आहे. दत्तक घेण्याला प्रतिबंध करणार नाहीं असें अभिवचन १८५८ सालीं नेटिव राजांना दिलेलें असल्यामुळें हल्लीं इंग्लिश लोक कित्येक प्रसंगीं असें म्हणूं लागले आहेत कीं, तुम्हीं मुलगा दत्तक घ्यावा आणि नंतर तो आपल्या दत्तक पित्याच्या गादीचा मालक म्हणून आम्ही त्याला म्हणूं; म्हणजे तो आपल्या दत्तक संस्कारामुळें वंशपरंपरागत हक्कानें आपल्या बापाच्या गादीचा मालक होईल असें नाहीं; तर तो इंग्लिशांच्या मानण्यानें त्या गादीचा मालक होईल. राजानें दत्तक घेतलेला मुलगा ह्या पद्धतीनें त्याला स्वर्गलोकांत गोळाभर अन्न आणि पळीवर पाणी पोंहोचविण्याला

फार तर उपयोगी पडेल. पण तो त्याचें राज्य त्याच्यामागें चालविण्याला खात्रीनें उपयोगीं पडेलच असें नाहीं. ह्या उपायापासून नेटिव राजांना कदाचित् पूर्वीप्रमाणें भीति वाटण्याचा संभव आहे. पण राजाची खासगी मिळकत ह्या स्वरूपापासून मुक्त होण्याची संधि हिंदुस्थानांतील नेटिव संस्थानिक लोकांना इंग्रज फिरून आणून देण्याच्या बेतांत आहेत, हें सर्वांनीं लक्षांत बाळगिलें पाहिजे.

वर दिलेल्या इंग्लंडांतील चालीरीतीवरून आणि हिंदुस्थानांत इंग्लिशांनीं चालविलेल्या प्रयत्नांवरून इंग्लिशांचा एकंदर कल राजा आणि प्रजा यांच्यामध्यें कराराची कल्पना जास्त दृढ होत जाईल याच गोष्टीकडे विशेष दिसतो. नेटिव राजे आणि त्यांची प्रजा यांच्यामध्यें वंशपरंपरागत हक्काचा जो संबंध आहे तो नाहींसा होऊन कराराच्या तत्त्वावर तो संबंध यावा, अशाबद्दल ज्या सरकारचे प्रयत्न दुसऱ्यांच्या बाबतींत चाललेले आहेत त्यांच्या स्वतःच्या बाबतींत त्यांचें वर्तन कसें काय आहे या प्रश्नाकडे येथें क्षणभर वळल्यास तें केवळ अप्रासंगिकच होईल असें नाहीं. इंग्लंडमधील राज्यारोहणसमारंभाच्या वेळीं राजा आणि प्रजा किंवा प्रजेचे प्रतिनिधि यांच्या दरम्यान काय काय विधि झाले याची बातमी आपल्या इकडे वर्तमानपत्रांच्या द्वारानें आलेली आहे. ते सर्व विधि कराराच्या कल्पनेचे द्योतक आहेत. त्या प्रकारचे कोणचे विधि राजाचे प्रतिनिधि कर्झनसाहेब हिंदुस्थानांतील लोकांच्या पुढें करून दाखविणार आहेत ? महाराणी व्हिक्टोरिया आणि हिंदुस्थानांतील प्रजा यांच्यामधील राणीसाहेबांच्या मरणामुळें लयाला गेलेला करार एडवर्डसाहेब आणि हिंदुस्थानांतील प्रजा यांच्यामध्यें नवीन स्थापित करण्यासाठीं वास्तविक हा दिल्लीचा दरबार होय. पण तशा प्रकारच्या नवीन करार करण्याच्या विधीला साजतील अशा कोणत्या गोष्टी एडवर्डसाहेब किंवा त्यांचे प्रतिनिधि कर्झनसाहेब हिंदुस्थानांत करणार आहेत ? राजा आणि प्रजा यांच्यामधील कराराचीं कलमें ठरते वेळी विलायतेंत राजानें जे संस्कार केले त्यांपैकीं हिंदुस्थानांत काय होणार आहेत ? सर्व इंग्लिश लोकांचे प्रतिनिधि वेस्ट मिनिस्टर आबेमध्यें गोळा झाले असतां त्यांच्यासमोर एडवर्डसाहेबांना उभें करून कँटरबरीच्या आर्चबिशपनें लोकांना असें विचारिलें कीं, **All you who are come this day to your homage, are you willing to do the same ?** आर्चबिशपच्या ह्या प्रश्नांतील

भावार्थ असा कीं, ह्या राजाला तुम्ही मान्य करितां काय? ह्यावरून. उघड होतें कीं, लोकांच्या मान्यतेवर राजाचें राजेपण अवलंबून आहे; आणि ज्याला लोकांची मान्यता नाहीं तो राजा नव्हे. कँटरबरीच्या आर्चबिशपनें विलायतेंतील लोकांना जसा प्रश्न विचारिला तसा प्रश्न हिंदुस्थानांतील लोकांनाही कोणी तरी वास्तविक विचारावयाला नको काय? पण असा प्रश्न येथें कोण विचारणार? सारांश, राजा आणि प्रजा यांच्यामधील कराराच्या कल्पनेंतील एक मुख्य अंग जी प्रजापक्षाची मान्यता त्याचा येथें समूळ लोप होत आहे. आतां विलायतें-तील दुसऱ्या एका संस्काराकडे वळूं. कँटरबरीच्या आर्चबिशपनें एडवर्डसाहेबांना आणखी कांहीं प्रश्न विचारले. ते येणेंप्रमाणें होते:—Will you solemnly promise and swear to govern the people of this United Kingdom of Great Britain and Ireland......according to the statutes in parliament and the respective laws and customs to the same? Will you to your power cause law and justice in mercy to be executed in all your Judgment? Will you maintain the protestant religion? &c. आपण पार्लमेंटच्या कायद्याप्रमाणें आपल्या राज्यांतील सर्व लोकांवर अंमल करण्याचें वचन देतां काय? कायदे आणि न्याय यांची अंमलबजावणी तुम्ही ममताळू-पणानें करालना? आणि प्राटेस्टंट धर्माचें परिपालन तुम्ही करालना? अशा अर्थाचे वरील प्रश्न एडवर्डसाहेबांना लोकांच्या वतीनें आर्चबिशपकडून विचार-ण्यांत आलेले होते. व त्या सगळ्या प्रश्नांना होय म्हणून एडवर्डसाहेबांकडून उत्तर येऊन त्याप्रमाणें त्यांनीं देवासमोर आणि सर्व लोकांसमोर शपथ घेतल्या-नंतर मग त्यांच्या डोक्यावर राजाचा मुकुट ठेवण्यांत आला. ह्या संस्कारामध्यें कराराच्या कल्पनेंतील दुसरें अंग म्हणजे राजाची कोणत्या अटीवर राज्य पत्करण्या-ची मान्यता आहे हें व्यक्त होत आहे. वर दिलेलीं जीं दोन अंगें म्हणजे एक राजाची कांहीं अटीवर काम करण्याची कबूली आणि दुसरें त्या गोष्टीला लोकां-ची मान्यता हीं राजा आणि प्रजा यांच्यामध्यें करारांचें तत्त्व अस्तित्वांत येण्यांला अत्यंत आवश्यक आहेत. परंतु त्यांपैकीं हिंदुस्थानांत इंग्रजांकडून कोणतेंच अंग यथास्थित रीतीनें संपादित केलें जात नाहीं. पण असें हिंदुस्थानांत कां होतें? हें करारांचें तत्त्व जर हिंदुस्थानांत अमलांत आणावयाचें नाहीं तर मग हिंदुस्था-

नांतील लोक व इंग्रज यांच्यामध्यें कोणता संबंध उत्पन्न होऊं शकतो ? हिंदुस्थानांतील लोक ही इंग्रजांची एक खासगी मिळकत आहे कीं काय, कीं ती कोणत्याही करारावांचून बापाच्यानंतर मुलाकडे आणि मुलाच्या नंतर नातवाकडे अक्षयी चालू राहावी ? हिंदुस्थानांतील लोक---राजे, महाराजे, चीफ, सरदार, कोटयधीश, लक्षाधीश, दशहजारी, पंचहजारी, शूर, धाडसी, गोलंदाज, घोडेस्वार, किल्लेदार, गडकरी, कारागीर, खलाशी, क्षात्रियकुलावतंस, शूद्र वगैरे चटसारे हिंदुस्थानांतील लोक--हीं सगळीं इंग्रजांच्या गोठ्यांतील गुरेंच आहेत कीं काय ? हिंदुस्थानांतील तीस कोटि मनुष्यकोटींतील प्राणी हें इंग्रजांच्या खासगी मिळकतींतील गाई, म्हशी, बैल, टोणगे, बकरीं, आणि मेंढरेंच आहेत कीं काय ? आपण अशा रीतीनें लेखले जात आहों ही गोष्ट हिंदुस्थानांतील रणजितसिंग, नानक, पृथ्वीराज, छत्रसाल, शिवाजी, औरंगजेब यांच्या वंशजांना कधींही खपणार नाहीं. परंतु यांना खपावयाची गोष्ट लांब राहूं द्या, आधीं खुद्द इंग्लिश लोकांनाच ही गोष्ट खपावयाची नाहीं. ज्यांनीं गुलामांचा व्यापार बंद केला, व ज्यांचे मनुष्यांची उन्नति करण्यासाठीं अव्याहत प्रयत्न चालू आहेत, ते आपल्या ताब्यांतील प्रजेला जनावरांच्या कोटींत आणून बसवितील ही गोष्ट त्यांच्या हातून होणें अगदीं अशक्य आहे. हिंदुस्थानांतील लोक ही खाजगी मिळकत आहे अशा प्रकारची कल्पना इंग्रजांच्या मनाला कधींही शिवणार नाहीं हें खरें. पण ही कल्पना त्यांच्या मनाला शिवत नाहीं तर हिंदुस्थानांत राजा आणि प्रजा यांच्यामधील कराराच्या कल्पनेला जें स्पष्ट स्वरूप द्यावयाला पाहिजे तेंही दिलेलें नाहीं. यामुळें हिंदुस्थानांतील अशी स्थिति झालेली आहे कीं, हिंदुस्थानांतील लोक हे इंग्रजांची खासगी मिळकतही नाहीं आणि इंग्रज व हिंदुस्थानांतील लोक यांच्यामध्यें कायदेशीर करार उत्पन्न होण्याला जितक्या गोष्टी आवश्यक पाहिजेत, तितक्या सगळ्या होत नसल्यामुळें येथील राजा आणि प्रजा ही एकमेकांशीं कराराच्या तत्त्वानेंही बांधलीं जात नाहींत.

अशी जरी आज स्थिति आहे तरी एकंदर इंग्रजी राज्यपद्धतीचा कल कराराच्या कल्पनेकडेच जास्त आहे व ही कल्पना हिंदुस्थानांत आजच जरी पूर्णत्वानें अमलांत आली नाहीं तरी पुढेंमागें केव्हां तरी आल्यावांचून राहणार नाहीं. इंग्लंडांतील लोकांप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांपुढें येऊन जरी राजानें कराराचे संस्कार आज केले नाहींत व अमुक राजा तुम्हांला मान्य आहेना,

म्हणून हिंदुस्थानांतील लोकांना आज जरी कोणी विचारिलें नाहीं, तरी हिंदुस्थानाला असा दिवस खात्रीनें येईल. हिंदुस्थानांतील लोक आपल्याला असा दिवस खात्रीनें आणून घेतील, कीं जेव्हां मी अमुक अमुक रीतीची शपथ घेण्याला तयार आहें, तेव्हां मी तुम्हांला मान्य आहेना असें त्यांचे भावी राजे त्यांच्यापुढें उभे राहून त्यांना विचारतील. पण हिंदुस्थानाला अशी स्थिति प्राप्त होण्याला एकट्या इंग्रजांचेच प्रयत्न पुरेसे होणार नाहींत. कराराची कल्पना जोरांत आणण्याला हिंदुस्थानांतील लोकांनींही प्रयत्न केले पाहिजेत, व त्यासाठीं लोकांनीं या बाबतींत आपलें कोणतें स्थान आहे हें नेहमीं पूर्णपणें लक्षांत बाळागिलें पाहिजे. करार म्हटला म्हणजे तेथें दोन्ही सारखे असतात. हिंदुस्थान म्हणजे इंग्रजांचें जंगल वाढलेलें ओसाड परडें व तेथील लोक म्हणजे त्या परड्यांतील शेणखळींतील किडे, त्यांनीं काय वाणसाण मिळेल तें खाऊन त्यावर उदरनिर्वाह करावा, अशा प्रकारचें इंग्रजांच्या खासगी मिळकतीचें स्वरूप कोणी आपल्याला देण्याचा प्रयत्न केला, तरी हिंदुस्थानांतील लोकांची असल्या बाबतींत ती खरी स्थिति नाहीं. या कराराच्या कल्पनेप्रमाणें राजा आणि प्रजा यांच्या करारांत आपल्याला कांहीं तरी जागा आहे, आपल्याला कांहीं तरी हक्क आहेत, आपली कांहीं तरी योग्यता आहे, या गोष्टी कोणीही विसरतां कामा नये. पण आपण पुष्कळ वेळां त्या विसरतों, असें दिसून येतें. ह्या राज्यारोहणासंबंधींचीच गोष्ट घ्या. हा समारंभ विलायतेस झाला व दिल्लीस व्हावयाचा आहे. समारंभाच्या वेळच्या तिकडच्या हकीकती आपण ऐकलेल्या आहेत आणि इकडच्याही ऐकत आहों. पण त्या दोहोंमधील एक मोठा फरक विचारी मनुष्यांच्या मनाला झोंबल्यावांचून राहणार नाहीं. तुमचा राज्यारोहणसमारंभ व्हावयाचा आहे म्हणून आमच्यावरचा इनकमटॅक्स कमी करा, मिठाचा कर कमी करा, किंवा येथील गोवध बंद करा, अशा प्रकारच्या विनवण्या केविलवाण्यासारखे आपण करीत आहों, किंवा आपल्याकडून कोणी कांहीं सहेतुक दृष्टीनें करवीत आहेत. इंग्लंडमध्यें अशा प्रकारच्या विनवण्या राज्यारोहणाच्या वेळीं कोणी केलेल्या आहेत काय? जर हिंदुस्थानांतील लोकांचीं हीं खरोखर गाऱ्हाणींच असतील तर तीं गाऱ्हाणीं पूर्ण करून घेण्याचा त्यांचा हक्कच आहे, व ती मागणी ते पाहिजे तेव्हां करूं शकतील. त्यासाठीं त्यांना राज्यारोहणाच्या वेळींच दांत विचकावयाला पाहिजे

आहेत असें नाहीं. तुमचें राज्यारोहण आहे, म्हणून तुम्ही आम्हांला अमुक अमुक कर सोडा हें भिक्षा मागणें आहे, ही हक्काची मागणी नव्हे. आणि जेथें हक्कानें मागतां येतें तेथें मेहेरबानी कशाला पाहिजे ? आपल्या घरीं एखादें लग्नकार्य झालें म्हणजे त्या वेळीं तेलंगे, गुजराथी वगैरे भट आणि भिकारी ' तुमच्या येथें लग्न झालें, आम्हांला दक्षिणा द्या ' असें म्हणत दाराशीं गर्दी करितात, त्या भटांच्या आणि भिकाऱ्यांच्या स्थितीमध्यें हिंदुस्थानांतील लोकांनीं आपल्याला कधींही पाडून घेऊं नये. इनकमटॅक्स कमी झाला नाहीं म्हणून श्रीमंत लोक कांहीं मरत नाहींत. व हें जर त्यांना ठाऊक आहे तर त्यांनीं असल्या निगरगट्टपणाच्या याचना करण्याला तोंडें वांकडीं करून वारंवार पुढें येणें ही त्यांना मोठी शरमेची गोष्ट आहे. आपल्यावरचा कर कमी व्हावा अशी मागणी करण्याचा आपला हक्क आहे. त्यासाठीं भांडण्याला आपण तयार व्हावें. पण त्यासाठीं मिनतवारी करण्याची हिंदुस्थानांतील ब्राह्मणांना, क्षत्रियांना आणि वैश्यांना लाज वाटली पाहिजे. इंग्लंडच्या समारंभांत कँटरबरीचे बिशप होते हें पाहून इकडील कांहीं लोकांना वाटलें कीं, दिल्ली दरबारच्या वेळींही कर्झनसाहेबांनीं आमच्या चारी मतांच्या शंकराचार्यांना पाचारण करून खुर्चीवर बसवावें. पण जोंपर्यंत कँटर-बरीच्या आर्चबिशपाप्रमाणें 'ह्या राजाला तुमची मान्यता आहे काय ?' असें विचारण्याचा अधिकार शंकराचार्यांना नाहीं तोंपर्यंत त्यांना आपल्या मठांतून दिल्लीपर्यंत येण्याची तसदी कशाला पाहिजे ? सगळ्या लोकांच्या संमतीनें हा राज्यारोहणसमारंभ झाला असें सर्व जगाला कर्झनसाहेबांच्या मनांतून भास-विण्याची उत्कट इच्छा असली तर हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांचीं आणि अमीरउमरावांचीं वगैरे जीं कांहीं चित्रें दरबारच्या मंडपांतील खुर्च्यांवर मांडा-वयाचीं आहेत त्यांत चार शंकराचार्यांचींही चार मातीचीं चित्रें एखाद्या उत्तम कारागिराकडून हुबेहुब बनवून मांडलीं तर त्यांत मोठेंसें बिघडणार आहे असें नाहीं.

सारांश, ह्या सगळ्या प्रकाराच्या मुळाशीं कराराची कल्पना आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु त्या कराराच्या कल्पनेचें हें केवळ नाटक होत आहे, तें नाटक नको आहे. तें खरें व्हावयाला पाहिजे आहे. हें नाटक करण्यांत इंग्लिशां-चा कदाचित् तात्कालिक फायदा असेल पण हिंदुस्थानचें यांत चिरकालिक

# जर करार, तर उत्सव कसला ? १८

काळ : अग्रलेख, ता. ५-१२-१९०२

★ आणि करारही नाहीं—तर उत्सव कशाला ?

राजा आणि प्रजा यांच्यामध्यें एक प्रकारचा करार असतो, ह्या कल्पनेबद्दलचें थोडेंसें विवेचन मागील अंकीं करण्यांत आलेलेंच आहे. राज्य-पद्धतीचे हल्लीं जे निरनिराळे प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात, त्या सगळ्यांचें कांहीं विशिष्ट तत्त्वावर वर्गीकरण करावयाचें म्हटलें तर एकंदर राज्यपद्धतीचे दोन वर्ग करतां येण्याजोगे आहेत; एक लोकसत्तात्मक राज्यपद्धति, आणि दुसरी राजसत्तात्मक राज्यपद्धति. लोकसत्तात्मक राज्यपद्धतींत लोक उघड उघड रीतीनें आपल्या राज्यावर अंमल करणारा अध्यक्ष निवडून पसंत करितात. तो अध्यक्ष मेल्यानंतर त्याचा मुलगा अध्यक्षस्थानापन्न न होतां त्या राज्यांत लोकांच्या दृष्टीनें जो कोणी दुसरा योग्य मनुष्य असेल तो त्या अध्यक्षाच्या जागेकरितां निवडला जातो. ह्यावरून लोकसत्तात्मक राज्यपद्धतीमध्यें वंशपरंपरागत हक्काचा कांहीं एक संबंध नसून तेथें केवळ करारानेंच तत्त्व लागूं पडतें. आतां राजसत्तात्मक राज्य-पद्धतीमध्ये वंशपरंपरागत हक्काचें प्राबल्य आहे असें सकृद्दर्शनीं आपल्याला भासतें. पण राजाला प्रत्यक्ष विष्णूचा अवतार मानणाऱ्या देशांतून, किंवा जेथें राजाला लोकांवर राज्य करण्याचा देवानेंच हक्क दिलेला आहे ( King by divine right ) अशी कल्पना प्रचलित आहे अशा देशांतूनसुद्धां, आपण

असें पाहतों कीं, जर एखादे वेळीं एखादा राजा वाईट निघाला किंवा लोकांना त्रास देऊं लागला तर लोक त्याला पदच्युत करून त्याच्या जागीं दुसरा राजा बसवितात. ह्या गोष्टीवरून वंशपरंपरागत हक्काची इमारतसुद्धां कराराच्याच पायावर उभारलेली आहे असें स्पष्ट होतें. इंग्लंडमधील पहिला चार्लस किंवा दुसरा जेम्स यांच्या वंशपरंपरागत हक्कांमध्यें कांहीं उणीव होती असें नाहीं. तरी पण अमुक अमुक रीतीनें राज्य करण्याविषयींचा राजानें प्रजेशीं केलेला करार त्यांनीं बरोबर रीतीनें पाळला नाहीं म्हणूनच एकाला फांशी देण्याचा आणि दुसऱ्याला घालवून लावण्याचा इंग्लिश लोकांना प्रसंग आला. ह्यावरून राजसत्तात्मक राज्यपद्धतीमध्येंसुद्धां राजा आणि प्रजा यांच्या संबंधाच्या मुळाशीं कराराची कल्पना असते असें दिसून येतें.

आतां ही जर कराराची कल्पना सर्वत्र प्रधान आहे, तर त्यापासून अनेक प्रश्न उद्भवतात. त्यांपैकीं प्रस्तुत प्रसंगीं राज्यारोहणासंबंधानें आपण विचार करूं. ह्या कल्पनेप्रमाणें नवीन राजाचें राज्यारोहण म्हणजे काय ? तर नवीन राजा आणि जुनी प्रजा यांच्यामध्यें एक नवीन करारपत्र. आतां हें जर एक करारपत्रच असेल तर मग असलीं करारपत्रें जगांत दररोज छपन्न हजार होत असतात, मग ह्याच कराराचें एवढें मोठें महत्त्व तें काय ? वास्तविक पाहतां ह्या कराराचें एवढें मोठें स्तोम माजवावयाला पाहिजे होतें असें नाहीं. परंतु कांहीं लोक मूर्ख, कांहीं आपमतलबी, आणि कांहीं तोंडपुंजे असल्यामुळें असल्या गोष्टीला त्यांनीं एका प्रकारचें विशेष स्वरूप देऊन ठेविलें आहे; व असल्या प्रसंगीं मोठे उत्सव करणें हें त्यांच्याच कृतीचें फळ आहे. सरळ रीतीनें पाहतां जर राजा आणि प्रजा यांच्यामध्यें हा एक करार झालेला आहे तर त्याच्याबद्दल उत्सव कशाला पाहिजेत ? आणि त्याच्याबद्दल दारूकाम कशाला उडवावयाला पाहिजे ? 'अ' हा 'ब' च्या नोकरीला राहण्याचा करार करितो, पण हा करार ठरला म्हणजे त्या दिवशीं अ किंवा ब हे कोणी कधीं मोठा उत्सव करीत नाहींत. एक मालक आणि दुसरा कॉन्ट्रॅक्टर यांच्यामध्यें एखादी इमारत उभारून देण्याचा करार ठरला म्हणून त्यांपैकीं कोणी दारूकाम सोडीत बसत नाहीं; किंवा कोणी सावकार आणि कूळ यांच्यामध्यें कांहीं देवघेवीसंबंधानें करार ठरला तर आज आमच्या उभयतांमध्यें एक करार ठरला आहे तेव्हां तुम्हीं सगळ्यांनीं आज आपापल्या घरोघर दिवे लावावे, असें ते

लोकांना सांगावयाला जात नाहींत. ह्या इतर करारांप्रमाणेंच वास्तविक राजा आणि प्रजा ह्यांच्यामधील कराराची गोष्ट असली पाहिजे. म्हणजे हा करार ठरल्याबद्दल मोठासा उत्सव करण्याचें उभयपक्षींही कारण आहे असें नाहीं. जर कांहीं कारण असेल तर तें थोड्याबहुत प्रमाणानें राजालाच आहे. आपल्याला एवढें मोठें राज्यपद एकदम प्राप्त झालें याबद्दल राजानें पाहिजे तर आनंद मानावा, व उत्सव करावा. तसेंच हें राज्यपद आपल्याला लोकांच्या मेहरबानीनें मिळालें आहे, ही गोष्ट लक्षांत आणून तें आपल्याला ज्यांनीं दिलें त्या लोकांना खूष करण्यासाठीं आणि त्यांचे उतराई होण्यासाठीं राजानें पाहिजे तर त्यांना मेजवान्या व देणग्या द्याव्या. राजानें या गोष्टी कराव्याच असें कराराच्या दृष्टीनें बिलकूल म्हणतां यावयाचें नाहीं. पण करावयाच्याच असल्या तर त्या राजानें केल्यास त्यांत फारसा विसंगतपणा दिसणार नाहीं. पण अशा प्रसंगीं लोकांनीं उत्सव काय म्हणून करावयाचा? लोकांना उत्सव करण्याला कांहीं एक कारण नाहीं. लोकांनीं कशासाठीं उत्सव करावयाचे? राजानें गादीवर बसावयाचें आणि लोकांनीं त्यासाठीं उत्सव करावयाचे! सामान्य व्यवहारांत देखील आपण असें पाहतों कीं, ज्याला सुखाचा अनुभव प्राप्त होतो तो उत्सव करितो. पण त्याला सुखाचा अनुभव प्राप्त झाला म्हणून दुसरे लोक त्याच्यासाठीं उत्सव करीत नाहींत. 'अ' च्या घरीं लग्न झालें म्हणून 'क्ष' च्या घरीं मेजवान्या दिल्या जात नाहींत; किंवा 'ब' ला मुलगा झाला म्हणून 'ज्ञ' च्या घरीं नळेचंद्रज्योती उडविल्या जात नाहींत; व हाच न्याय राजा आणि प्रजा यांच्या ठिकाणींही लागू पडतो. आतां प्रजेला अशा प्रसंगीं उत्सव करण्याला एक कारण मात्र आहे. आणि तें हें कीं, एक राजा मरण पावून दुसरा राजा प्रजेला मिळेपर्यंत प्रजेला मोठी भीति असते. नवीन राजा कसा मिळेल, तो आपलें संरक्षण कसें करील, तो आपल्या धर्माचें आणि जीविताचें यथास्थित संरक्षण करील किंवा नाहीं, अशा प्रकारच्या असंख्य काळज्यांनीं लोकांचीं मनें नवीन राजा कायम होईपर्यंत ग्रस्त होऊन गेलेलीं असतात. पण एकदां चांगला राजा मिळाला म्हणजे लोकांच्या त्या सर्व काळज्या दूर होतात व त्यांना अतिशय आनंद होतो. त्या आनंदाच्या प्रदर्शनासाठीं त्यांनीं पाहिजे तर उत्सव करावे. व कराराच्या कल्पनेप्रमाणें अशा प्रसंगींच्या लोकांनीं केलेल्या उत्सवाचा अर्थ

हाच होय. त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रकारची उपपत्ति ह्या उत्सवांची समंजसपणानें सांगतां येणार नाहीं.

यावर कोणी अशी शंका काढील कीं, राजा आणि प्रजा यांच्यामध्यें एक प्रकारचा करार ठरून राजाला राज्यपद प्राप्त होतें असें जरी गृहीत धरलें तरी त्या करारामध्यें प्रजेनें राजापाशीं राजनिष्ठपणानें वागलें पाहिजे, ही एक करारांतील अट असतेच; व त्याप्रमाणें प्रजेनें वागलें पाहिजे, ही गोष्ट सर्वथैव कबूल आहे. ह्या करारांत जसा राजा कांहीं अटींनीं बांधलेला आहे, त्याप्रमाणेंच प्रजाही कांहीं अटींनीं अवश्य बांधलेली आहे, व त्या अटींप्रमाणें प्रजेनें राजनिष्ठेनें जरूर वागलें पाहिजे. पण ती राजनिष्ठा दाखविण्यासाठीं त्यांनीं दारूच उडविली पाहिजे किंवा तेल जाळलें पाहिजे अशी त्या करारामध्यें कोठेंही अट नसते. जो हवया लावील तो राजनिष्ठ आणि जो आपल्या पैशाचा धुरामध्यें अपव्यय करण्याला तयार होणार नाहीं तो राजनिष्ठ नाहीं असा कोठेंही शास्त्रार्थ नाहीं. रोषनाई म्हणजे राजनिष्ठा असा अर्थ कोणत्याही डिक्शनरीमध्यें सांपडावयाचा नाहीं. तेलाचा, किंवा नळेचंद्रज्योतींचा आणि राजनिष्ठेचा कांहीं एक संबंध नाहीं. राजनिष्ठा मातीच्या नळ्यामध्यें नसून ती मनुष्याच्या अंतःकरणामध्यें राहते. काळोखांत कोणत्या तरी कृतीनें अतिशय मोठा उजेड जो कोणी उत्पन्न करील तो अतिशय मोठा राजनिष्ठ असें जर केवळ घेऊन चाललें तर काळोख्या रात्रीं एखाद्या घराला आग लावणारा मनुष्यही मोठा राजनिष्ठ होऊं लागेल. सारांश, दिवे लावणें किंवा दारू उडविणें हे राजनिष्ठा व्यक्त करण्याचे खरे मार्ग नव्हेत.

आतां आपण हिंदुस्थानकडे थोडेसें वळूं. हल्लीं हिंदुस्थानांत राज्यारोहणाचा उत्सव चोहोंकडे जारीनें सुरू व्हावयाचा आहे. कराराच्या कल्पनेला जितकें प्राबल्य इतर देशांतून आलेलें आहे तितकें हिंदुस्थानांत अद्यापि आलेलें नाहीं, हें मागील अंकांतील विवेचनावरून कोणाच्याही लक्षांत आलेलेंच असेल. तेव्हां प्रस्तुतच्या स्थितींत कराराच्या कल्पनेपासून उत्पन्न होणारी विचारसरणी आपल्याला फारशी उपयोगी नाहीं. हिंदुस्थानासंबंधानें आपल्याला विचार करावयाचा तो अगदीं निराळ्या दिशेनें केला पाहिजे. येत्या जानेवारीच्या पहिल्या तारखेला हिंदुस्थानांतील सर्व लहानमोठ्या ठिकाणीं उत्सव व्हावे अशाबद्दल सरकारी अधिकाऱ्यांची खटपट चाललेली आहे. यासंबंधानें पाहतां हा उत्सव

करविण्याच्या कामांत सरकारी अधिकाऱ्यांनीं आपलें वजन इतकें खर्च केलें नसतें तर फार चांगलें झालें असतें. असल्या राजनिष्ठेच्या आणि उत्सवाच्या गोष्टी लोकांनीं आपल्या खुषीनें आणि हौसेनें केल्या तरच ती राजनिष्ठा आणि तरच तो उत्सव. पण हल्लीं कलेक्टर, डेप्युटी कलेक्टर, मामलेदार वगैरे अमलदारांच्या विनयपूर्वक दपटशानें जागोजागीं जे उत्सव तयार होत आहेत त्यांना जुलमाच्या रामरामाचें स्वरूप येत आहे, ही गोष्ट सरकारी अधिकाऱ्यांच्या लक्षांत येत नाहीं हें फार वाईट आहे. शिवाय हिंदुस्थानांतील लोकांची स्थिति असले मोठे उत्सव करण्यासारखी नाहीं. येथील लोक फार गरीब आहेत. येथील प्रजेपैकीं एकपंचमांश लोक उपासमारीनें दिवस काढीत आहेत. अशा लोकांकडून हा ऋण काढून सण करवून घेण्यांत कांहीं मोठेसें भूषण नाहीं व लोकांनीं सुद्धां ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, दारिद्र्य म्हणजे राजद्रोह नव्हे. आपल्यापाशीं जर असल्या उत्सवाला देण्याइतका पैसा नसल तर ता. १ जानेवारीच्या रात्रीं आपण जास्त दिवे लाविले नाहींत आणि जास्त प्रकाश पाडला नाहीं म्हणून आपण जास्त राजद्रोही झालों अशी भलतीच भीति बाळगण्याचें कोणालाही बिलकूल कारण नाहीं. संपत्ति म्हणजे राजनिष्ठा नव्हे किंवा दारिद्र्य म्हणजे राजद्रोह नव्हे. या गोष्टी अशा प्रसंगीं सरकारी अधिकाऱ्यांनीं आणि लोकांनीं लक्षांत बाळगिल्या पाहिजेत. ज्यांना वेळेस पोटभर खावयास मिळत नाहीं, ज्यांच्या घरांमध्यें सदासर्वदा नकारघंटा वाजत असते आणि ज्यांच्या घरांतील पोरेंबाळें मध्यानकाळ झाला म्हणजे भुकेनें तंटा करूं लागतात, अशा गरीब लोकांकडून सरकारी दपटशानें पैसे वसूल करून त्या पैशांतून एके दिवशीं रात्रीं सर्व हिंदुस्थानांत जिकडे तिकडे दिवे लाविले तरी दुसऱ्या दिवशीं हिंदुस्थानांत काळोख पडणार नाहीं असें का आहे? मग गरीब लोकांना इतका त्रास कशाला? किंवा अशा रीतीनें एका रात्रीं जिकडे तिकडे दिव्यांचा लखलखाट करून हिंदुस्थानांतील लोक आपच्यावर अति प्रेम करीत आहेत अशाबद्दलच्या तारा इंग्लिश लोकांनीं जरी बाकीच्या राष्ट्रांतून फिरविल्या तरी ह्या दिव्यांच्या खालीं काय आहे हें त्या लोकांनाही समजणार नाहीं काय?

एकंदरींत तात्पर्य हें कीं, कराराची किंवा वंशपरंपरागत हक्काची कोणतीही कल्पना घेतली तरी प्रजेनें राजाशीं राजनिष्ठेनें वागलें पाहिजे, ही गोष्ट

निर्विवाद् आहे व त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांनींही राजनिष्ठा जरूर दाखविली पाहिजे. आणि आपल्या प्रजेनें अमुक अमुक दिवशीं विशेष राजनिष्ठा दाखवावी अशी राजाची इच्छा असेल त्या दिवशीं तर त्यांनी ती अधिकच जरूरीनें दाखविली पाहिजे. पण ती दाखवितांना त्यांनीं सर्व सारासार विचार सोडून द्यावा असा कोणत्याही राजाला कधींही हुकूम करतां यावयाचा नाहीं. म्हणून हिंदुस्थानांत ह्या उत्सवाच्या वेळीं जे कांहीं पैसे जमा होतील त्यांचा उपयोग दिवे आणि दारू यांच्यापासून काजळ आणि धूर उत्पन्न करण्यामध्यें न करितां ज्यांच्यापासून काजळ आणि धूर यांच्यापेक्षां कांहीं तरी जास्त लोकोपयोगी फळें प्राप्त होतील, अशा प्रकारच्या सत्कृत्यांमध्यें त्या पैशांचा विनियोग करावा. अधिकाऱ्यांच्या कृपादृष्टीनें आणि लोकांपासून बळकावून घेतलेल्या पुढारीपणानें मदांध झालेले आमच्यांतील नायक म्हणून सरकारनें मानलेले लोक असल्या गोष्टींचा विचार करतील ही आशा फुकट आहे. पैसे देणाऱ्या लोकांनीं त्यांना जर लोकोपयोगी कृत्यें करण्याविषयीं भाग पाडलें नाहीं तर ते सरकारी अधिकाऱ्यांनीं धरलेल्या तालावर नाचत सुटल्यावांचून कधींही राहावयाचे नाहींत.

---

# शिपाई हा सुद्धां एक नागरिक आहे : : १९

काळ : अग्रलेख, ता. ३०-१-१९०३

★ दिल्ली दरबारच्या वेळीं १८५७ च्या बंडांत इंग्रजांच्या बाजूनें लढणाऱ्या नेटिव्ह शिपायांचा मोठा गौरव करण्यांत आला होता. हा सन्मान नव्हे !

शिपाई म्हटला म्हणजे तो बहुधा अज्ञानी असावयाचा असा अलीकडे बहुतेक नियमच झाल्यासारखा दिसतो. पण ही स्थिति चांगली नाहीं. ह्यापासून जगाचें हित न होतां एकंदरींत अहितच जास्त होतें. ज्ञान हें इतर मनुष्यांना जसें आवश्यक आहे तसेंच तें शिपायालाही आहे. आपण कोण आहों आणि आपलें कर्तव्यकर्म काय आहे, या गोष्टींची त्याला पूर्ण माहिती असली पाहिजे. इतर कोणी मनुष्य आपल्यावरील जबाबदारीबद्दल अनभिज्ञ असेल तर एक वेळ चालेल. पण शिपायांच्या अंगांत असल्या बाबतींतील अज्ञान असणें कधींही इष्ट नाहीं कारण ते इतरांसारखे हात हालवीत चालणारे नसून दुसऱ्यांच्या जीविताला अपाय करणारीं शस्त्रें त्यांच्या हातांत असतात. हल्लींचे सैन्यांतील शिपाई बहुतेक अज्ञानीच आढळतात. व ते आपल्यावरील जबाबदारी ओळखण्याला असमर्थ असतात. त्यांना जो हुकूम होईल तो बजाविणें एवढीच काय ती फक्त आपल्या आयुष्यांत आपल्यावर जबाबदारी आहे असें वाटतें. पण ही त्यांची कल्पना फार भ्रामक आहे. शिपाई म्हटला म्हणजे त्याला जो हुकूम होईल तो त्यानें बजावावा हें खरें

पण जो मनुष्य शिपाई होतो तो जन्मास येतांना शिपाई होऊनच जन्मास येत नाहीं, किंवा मरतांना शिपाईच मरत नाहीं. अथवा इतकें तरी कशाला, तो शिपाई असतो तेव्हां देखील तो फक्त शिपाईच असतो असें सुद्धां नाहीं. म्हणजे तो शिपाई असतांना त्याच्या ठिकाणीं दुसरेही अनेक संबंध वास करीत असतात. ज्या वेळीं एखादा शिपाई आपल्या सरकारचा नोकर असतो त्याच वेळीं तो आपल्या बापाचा मुलगा असतो, आपल्या मुलांचा बाप असतो, आपल्या बायकोचा नवरा असतो आणि आपल्या भावाचा भाऊ असतो परंतु हे संबंध शिपायाच्या लक्षांत आणून देण्याची फारशी आवश्यकता नाहीं कारण हे संबंध त्याच्या मनोविकारामुळें स्वाभाविकपणेंच त्याच्या लक्षांत येतात. त्याचें विशेष लक्ष ज्या संबंधाकडे वळविलें पाहिजे तो संबंध म्हटला म्हणजे नागरिकपणाचा होय. सैन्यांतील प्रत्येक शिपायानें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपण जसे शिपाई आहों तसेच नागरिकही आहों. मनुष्य एखाद्या नगरांत किंवा राज्यांत उत्पन्न होतो तेव्हांपासूनच त्याला तेथील नागरिकत्वाचा हक्क प्राप्त होतो. आणि तो लष्करी खात्यांतील नोकरी पत्करील तेव्हां त्याला शिपाईगिरीचा हक्क प्राप्त होतो. तसेंच त्याची चाकरी निघाली कीं, त्याचा शिपाईगिरीचा संबंध नष्ट होतो. पण त्याचा नागरिकत्वाचा हक्क त्याच्या मरणापर्यंत कायम असतो. अशी जरी वस्तुस्थिति आहे तरी आपण नागरिक आहों ही गोष्ट फारच थोड्या शिपायांच्या मनावर बिंबलेली असते. नागरिक म्हणजे काय आणि त्या नागरिकत्वाच्या हक्काबद्दल आपलें कर्तव्यकर्म काय आहे ह्याबद्दलची बरोबर कल्पना आपल्या इकडील साधारणपणें सुशिक्षित माणसालाही असूं शकत नाहीं. मग ती बोलून चालून अज्ञानी अशा शिपायाला नसली तर त्यांत मोठेसें आश्चर्य नाहीं. पण सामान्य मनुष्याच्या हातांत बंदूक किंवा तरवार नसते, आणि तो घोड्यावर बसलेला नसतो; म्हणून त्याला ह्या गोष्टींचें अज्ञान असलें तरी त्यापासून फारसा दुरुपयोग होण्याची भीति नाहीं. पण शिपायांची गोष्ट तशी नाहीं. आपण नागरिक आहों आणि नागरिक या दृष्टीनें आपलें कांहीं नफानुकसान आहे आणि आपल्याला कांहीं कर्तव्य आणि अकर्तव्य अशा गोष्टी आहेत, हें जर शिपायाला कळलेलें नसेल तर त्याच्या हातून अतिशय अनर्थावह गोष्टी घडून येण्याचा संभव आहे. म्हणून प्रत्येक शिपायानें

आपल्या नागरिकत्वासाठीं आपलीं काय काय कर्तव्यकर्में आहेत याची पूर्ण ओळख करून घेतली पाहिजे.

शिपाईगिरी आणि नागरिकत्व या दोन हक्कांपैकीं नागरिकत्वाचा हक्क हाच जास्त महत्त्वाचा आहे, नागरिकत्वासाठीं शिपाईगिरी आहे, शिपाईगिरी-साठीं नागरिकत्व नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. सगळ्या नागरिकांना शांतपणानें सुखाचा अनुभव घेतां यावा म्हणून कांहीं नागरिक शिपाई बनतात. शिपायांना कोणाची तरी कत्तल करावयाला पाहिजे म्हणून त्यासाठीं नागरिक उत्पन्न केलेले नाहींत. सारांश, नागरिकांसाठीं शिपाई आहेत. नागरिक शिपायांसाठीं नाहींत. ही आपल्याबद्दलची पूर्वपीठिका प्रत्येक शिपायानें लक्षांत बाळगिली पाहिजे. बहुतेक शिपाई अज्ञानी असतात आणि त्यांना दुसरें जें कांहीं करावयाला सांगतील ते करितात. ती गोष्ट आपण करणें उचित आहे किंवा नाहीं याचा ते आपल्या स्वतःकरितां कांहींही विचार करीत नाहींत. परंतु असा विचार करण्याला त्यांनीं शिकलें पाहिजे. हुकुमाप्रमाणें वागणें हीच सैन्यांतील शिपायांची नीति होय, अशी एक चुकीची कल्पना कितीएक आपमतलबी लोकांनीं शिपायांच्या डोक्यांत भरवून दिलेली आहे, आणि त्यामुळें स्वतःकरितां विचार करण्याचा अंकुर जर एखाद्या शिपायाच्या डोक्यांत असला तर तोही वरच्या-सारख्या कल्पनेनें जळून खाक होतो. स्वतःकरितां विचार न करणाऱ्या आणि एका हुकूमाप्रमाणें सरसकट वागणाऱ्या आणि तो हुकूम आपल्या एकंदर स्थितीला बऱ्याचा आहे किंवा वाइटाचा आहे याबद्दल यत्किंचितही परवा न करणाऱ्या शिपायांची टोळी हें स्वतंत्र लोकांचें सैन्य नसून ती गुलामांची एक दावण होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सैन्याची मूळची उपपत्ति पाहूं गेलें असतांही सैन्यांतील शिपायांनीं गुलाम न बनतां स्वतंत्र असलें पाहिजे असें दिसतें. मनुष्य सुधारलेल्या स्थितींत येण्याच्या पूर्वीं रानटी अवस्थेमध्येंच होता. त्या वेळीं सैन्याची हल्लीं जी कल्पना आहे ती मुळींच नव्हती. झाडाची सावली हें त्याचें घर, आणि एखाद्या झऱ्याचा प्रवाह हें त्याचें पाणी साठविण्याचें भांडें असे; व अरण्यांतील एखादा बारीक सारीक प्राणी मारून त्याच्यावर तो आपला उदरनिर्वाह चालवीत असे. अशा ह्या रानटी स्थितीमध्यें त्याला सैन्याची काय गरज लागणार? अशा स्थितींत निरनिराळे लोक निरनिराळ्या ठिकाणीं राहत असतां सिंह, वाघ, वगैरे

एखादा अरण्यांतील हिंस्र प्राणी एखाद्या ठिकाणच्या रानटी मनुष्यांना खाऊन टाकण्याकरितां त्यांच्यावर धांवून येऊं लागला तर त्याला मारणें हें एकट्या मनुष्याच्या हातून होणें अशक्य असल्यामुळें अनेक रानटी लोक एकत्र जमत व त्या आपल्या शत्रूला मारून टाकीत. रानटी स्थितींत येथें प्रथमतः सैन्याच्या कल्पनेचा उदय झाला. ह्या प्राथमिक सैन्याचें आपण थोडेंसें पृथक्करण करून पाहूं. हे रानटी लोक एकत्र कां झाले? आपल्या सगळ्यांवर जें कांहीं एक संकट आलेलें आहे त्याचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य कोणाही एकट्याच्या अंगामध्यें नसल्यामुळें एकच हेतु शेवटास नेण्याकरितां अनेक लोक एकत्र झाले. त्यांत कोणी कोणाचा धनी आणि कोणी कोणाचा गुलाम असा संबंध बिलकुल नव्हता. त्यांतील प्रत्येकजण स्वतंत्र मनुष्य होता. व जर ते सगळे एखाद्या बंधनानें बांधले गेलेले असले तर आपला हेतु शेवटास नेण्याच्या बंधनानेंच ते बांधले गेलेले होते. सारांश, ह्या प्राथमिक सैन्यांतील सर्व लोक आपआपल्याकरितां विचार करीत असत. ते सगळे स्वतंत्र असत व आपण सगळेजण कशाकरितां एकत्र झालों आहों हें ते लक्षांत बाळगीत असत. पुढें मनुष्य जसजसा सुधारत चालला तसतशी त्याच्या ह्या सैन्याच्या पद्धतीमध्येंही सुधारणा होत गेली, पण सैन्यांतील शिपायाची स्वतंत्रता आणि स्वतःकरितां विचार करण्याची शक्ति ही मात्र नष्ट झाली नाहीं. त्यामुळें अशा सैन्यांतून एक प्रकारचा विशेष जोम, उत्साह आणि शूरपणा आढळून येत असे. ग्रीसच्या लहान लहान संस्थानांतून आणि रोममध्यें बादशाही अंमल सुरू होण्याच्या पूर्वींच्या राज्यकारभाराच्या अमदानीमध्यें जीं सैन्यें उभारलीं जात असत तीं अशा प्रकारचींच सैन्यें होतीं. रानटी अवस्थेमध्यें रानांतील हिंस्र पशु हेच मनुष्यांचे शत्रु असतात. परंतु सुधारलेल्या अवस्थेमध्यें सुधारलेल्या शहरांतील हिंस्र नरपशु हे मनुष्यांचे शत्रु होतात. त्यांना मारून आपण आपलें वित्त आणि जीवित सुरक्षित ठेविलें पाहिजे असें वाटून सुधारलेले लोक एकत्र होतात व त्यापासून सुधारलेलीं सैन्यें बनतात. व अशा प्रकारचीं सैन्यें पूर्वीं ग्रीसमध्यें आणि रोममध्यें होतीं. ह्या सैन्यांतील प्रत्येकजण स्वतंत्र मनुष्य असे व आपण सगळेजण कशासाठीं एकत्र झालों आहों आणि आपणाला काय करावयाचें आहे ह्याच्याबद्दल त्यांना कधींहि विस्मृति पडत नसे. ह्या सैन्यांतील लोकांना आपलें हित कोणतें आणि अहित कोणतें याचें चांगलें ज्ञान असे. आपला देश कोणता आणि लोकांचा देश

कोणता; आपल्या देशासाठीं आपण काय केलें पाहिजे आणि दुसऱ्याच्या देशाशीं आपण कसें वागलें पाहिजे; आपले देशबंधु आपले सख्खे बंधूच आहेत, आपले हाडवैरी नव्हेत, इत्यादि अनेक गोष्टी त्यांच्या मनावर ठसलेल्या असत. त्यामुळें त्या सैन्यांतील लोकाच्या हातून स्वहितविघातकपणाचा अन्याय कधींही होत नसे. व हीच जर सैन्याची कल्पना कायम राहती, आणि ह्याच तत्त्वावर जर सैन्याची रचना आजपर्यंत होत गेली असती, तर जगांतील अन्याय, जुलूम आणि रक्तपात किती तरी कमी झाले असते; आणि त्या रक्तपातामुळें पृथ्वीच्या नकाशावर पडलेले तांबड्या रंगाचे डाग किती तरी थोडे झाले असते. पण सैन्याची ही मूळची उदात्त कल्पना सुटली आणि नवीनच एक कल्पना मध्यें घुसली. जेव्हां रानटी स्थितीमध्यें हिंस्र प्राण्यांपासून आपलें सरक्षण करण्याकरितां स्वतंत्र लोकांचीं पलटणें तयार होत होतीं तेव्हां त्यांच्याच बरोबर दुसऱ्या एका तऱ्हेचीं पलटणें बनत चाललीं होतीं. एकानें स्वकष्टानें संपादन केलेल्या जिनसांवर धाड घालून त्यांचा उपभोग आपण घ्यावा अशा इच्छेनें दरवडेखोरांच्या टोळ्या बनूं लागल्या परंतु रानटी स्थितींतील मनुष्यापाशीं फारसा कांहीं ऐवजच नसल्यामुळें असल्या टोळ्यांना त्या अवस्थेमध्यें फारसें उत्तेजन मिळत नसे. पण मनुष्य सुधारलेल्या स्थितीमध्यें येऊन आपल्याजवळ वित्तसंचय करूं लागल्यापासून दरवडेखोरांना दरवडे घालण्याला चांगली जागा झाली व हीं दरवडे घालण्याचीं कामेंही एकादोघांनीं होण्यासारखीं नसल्यामुळें दरवडेखोरांच्या नाइकांनीं आपल्या भोंवतीं पलटणें जमा करण्याचा क्रम सुरू केला. आतां ह्या पलटणींमध्यें किंवा सैन्यामध्यें जे लोक नोकरीला राहिले त्यांची स्थिति कशी झाली हें आपण पाहूं. पूर्वीं सांगितलेल्या सैन्यांतील लोकांना आपल्या स्वतःकरितां विचार करण्याची शक्ति आणि परवानगी होती; परंतु दरवडेखोराच्या नाइकांनीं असें पाहिलें कीं, आपल्या सैन्यांतील लोकांना आपण जर अशीच आपल्या स्वतःकरितां विचार करण्याची मुभा दिली तर आपलें चालावयाचें नाहीं, आपण बोलून चालून दुसऱ्यांच्या घरावर दरवडा घालणार, व पैशासाठीं दुसऱ्यांची मान कापणार. अशा कामीं आपल्या सैन्यांतील लोक न्यायाचा आणि अन्यायाचा विचार करू लागले तर आपला एक दरवडा देखील सिद्धीस जाणार नाहीं. आपण हूं म्हटल्याबरोबर आपल्या सैन्यांतील लोकांनीं आपण सांगूं त्यांच्या माना कापल्या

पाहिजेत. त्यांनीं विचार करण्याकरितां थांबतां कामा नये असे शिपाई आपल्याला पाहिजेत आणि असें जर आहे तर त्यांना विचार करण्याची स्वतंत्रता देऊन आपलें कसें चालणार ? असा विचार मनांत आणून त्यांनीं आपल्या सैन्यामध्यें हुकुमाचें प्रस्थ फार माजविलें. नाईक जो हुकूम करील तो सगळ्यांनीं मान्य केलाच पाहिजे, असा त्यांनी प्रघात सुरू केला. स्वतंत्र लोकांच्या सैन्यांतूनही हुकुमाचें प्रस्थ नसतें असें नाहीं. पण तें कशासाठीं असतें ? व्यवस्थेसाठीं. सगळ्यांचें कृत्य एकाच दिशेनें आणि एकाच वेळीं व्यवस्थित रीतीनें व्हावें म्हणून एकीकडे हुकुमाला प्राधान्य दिलेलें असतें. अमुक एक लढाई करणें आहे तर ती करणें चांगलें आहे किंवा वाईट आहे, ती लढाई आपण करावी किंवा न करावी, त्यापासून आपला फायदा आहे किंवा तोटा आहे इत्यादि प्रश्नांचा विचार करण्याला सर्वांना पूर्णपणें मोकळीक असते. आणि एकदां सर्वांनीं असा विचार करून लढाई करावयाची म्हणून ठरलें तर त्या लढणाऱ्या सैन्यामध्यें व्यवस्था राहण्यासाठीं हुकुमाचा अंमल जारी होतो. परंतु दरवडेखोरांच्या सैन्यांतील हुकुमाचा अंमल याच्यापेक्षां अगदीं निराळ्या तत्त्वावर चालू झालेला असतो. तेथें त्या हुकुमानें व्यवस्था तर राहतेच, पण शिवाय लढणाऱ्या लोकांना न्याय अन्यायाबद्दल विचार करण्याची जी कांहीं परवानगी असावयाला पाहिजे ती ह्या हुकमाच्या योगानें पूर्णपणें दाबून टाकली जाते. हा ह्या दोन सैन्यांमध्यें मुख्य फरक असतो. येथपर्यंत दरवडेखोरांचीं सैन्यें कोणच्या तत्त्वावर बनविलीं जातात हें आपण पाहिलें. ह्याच दरवडे घालणाऱ्या लोकांच्या नाइकांनीं जरा मोठेपणा मिळविला आणि भारदस्तपणा दाखविला म्हणजे त्यांचेच हळूहळू राजे बनूं लागतात. हे राजे जोंपर्यंत लोकांच्या तंत्रानें वागत असतात तोंपर्यंत त्यांच्या सैन्यांतून हुकुमाचें फारसें प्राधान्य नसतें व त्याचा दुरुपयोगही होत नाहीं. परंतु राजा मन मानेल तसें करूं लागला व आपल्याला कोणी विचारणारें नाहीं असें त्याला वाटूं लागलें, म्हणजे मात्र त्याच्या सैन्यांतील लोकांचा स्वतंत्रपणा हळूहळू नाहींसा होऊं लागतो. राजाजवळ जें सैन्य असतें तें त्याच्या प्रजेचें संरक्षण करण्याकरितां होय. परंतु कित्येक वेळां एखादा राजा जुलमी आणि क्रूर निघाला तर तो आपल्या सैन्याचा आपल्याच प्रजेला छळण्याच्या कामीं उपयोग करितो. अशा प्रसंगीं शिपायांच्या अंगामध्यें असणाऱ्या विचारशक्तीची आणि विचारस्वातंत्र्याची अतिशय आवश्यकता आहे. अशा प्रसंगीं शिपायांनीं

असा विचार केला पाहिजे कीं, आपल्या देशाचें आणि आपल्या देशबांधवांचें संरक्षण करण्यासाठीं आपण या राजाच्या अमलाखालीं शिपाईगिरी पतकरली आहे. आपल्या शिपाईगिरीचा हा मूळ आणि मुख्य हेतु आहे. आपला देश बुडविण्यासाठीं आणि आपल्या देशबांधवांच्या माना कापण्यासाठीं आपण चाकरीच्या शपथा वाहिलेल्या नाहींत. आपण सत्कृत्यें करण्यासाठीं कमरा बांधलेल्या आहेत. असत्कृत्यें आणि अन्याय करून नरकांत जाण्याचें साधन तयार करून ठेवण्यासाठीं आपण आपल्याला शपथेनें बांधून घेतलेलें नाहीं. असे विचार प्रत्येक शिपायाच्या मनामध्यें जागृत झाले पाहिजेत. हुकूम आणि शपथ हे स्वर्गांत जाण्याचे जिने असावेत, ते नरकांत ओढणारे पाश नाहींत, हीं तत्त्वें शिपायांना समजलीं पाहिजेत. पुष्कळ शिपाई पापपुण्याच्यासंबंधानें एका वेडच्या कल्पनेनें पछाडलेले असतात. एखाद्या निरपराधी लोकांवर आपण हल्ला करून त्यांना कापून काढलें आणि त्यामध्यें जर काहीं पातक लागत असलें तर तसें करण्याबद्दल आपल्याला ज्यानें हुकूम सोडला तो त्या पातकाचा धनी आहे, आपल्याकडे त्याचा कांहीं एक दोष नाहीं, अशी खोटी कल्पना कित्येक वेडगळ शिपायांच्या डोक्यांत असते. पण ही कल्पना देवाच्या वरीं फारशी उपयोगी पडावयाची नाहीं. हुकुमाची मातब्बरी काय ती ह्या मृत्युलोकीं. देव तुमच्या अतिशय मोठ्या अधिकाऱ्याच्याही हुकुमाला ओळखीत नाहीं. देवाच्या वरचा न्याय असा आहे कीं, ज्याचें कर्म त्याला, जो जसें करील तसें त्यानेंच भरलें पाहिजे. हुकुमाची सबब सांगून त्याची सुटका नाहीं. याकरितां आपण धर्मयुद्ध करीत आहों किंवा एखाद्या दरवडयाच्या कामांत सामील होऊन निरपराधी लोकांचे खून पाडण्याचें भयंकर पातक करण्याला प्रवृत्त होत आहों, याबद्दलचा विचार प्रत्येक शिपायानें अलबत केला पाहिजे. लढाईवर गेल्यानंतर त्यानें अधिकाऱ्याचा हुकूम अवश्य ऐकला पाहिजे. पण लढाईला जाण्याच्या आधीं ह्या लढाईंत मी सामील होऊं काय, ही लढाई न्यायाची आहे काय, ह्या लढाईंत माझ्या देशाचें हित आहे काय, ह्या लढाईंत माझें शस्त्र माझ्याच देशबांधवांच्या मानेवर पडणार नाहींना इत्यादि असंख्य प्रश्नांचा प्रत्येक शिपायानें जरूर विचार केला पाहिजे. व यासाठीं सैन्यांतील शिपाई लोक हे चांगले समजदार आणि असले विचार करण्याच्या योग्यतेचे असले पाहिजेत. शिवाय हल्लीं एक नवीन पद्धत निघाली आहे. एकदां शपथ घेववून शिपाई कायमचे चाकरीस ठेवावयाचे व

मग त्यांना पाहिजे त्या मोहिमेवर पाठवावयाचें, आणि ही मोहीम स्वदेशहिताची आहे किंवा परदेशहिताची आहे, इत्यादि प्रश्नांबद्दल विचार करण्याची त्यांना सवडच ठेवावयाची नाहीं. ही पद्धत फार अन्यायाची आहे. ह्या पद्धतीनें विचाराच्या स्वतंत्रतेच्या मानगुटीवर जणूं काय पायच देऊन टाकलेला आहे. ही पद्धत राजांच्या फार सोईची आहे. पण ह्यामध्यें खुद्द शिपायांची नैतिक हानि आणि ज्या राष्ट्रांत ही पद्धत चालू असेल त्या राष्ट्राची राजकीय हानि अतिशय आहे. ह्यांत राजांचा फायदा असा आहे की, न्यायाचें कृत्य करण्यासाठीं म्हणून जमविलेल्या फौजेकडून अन्यायाचीं आणि जुलमाचींही कृत्यें सहज करून घेतां येतात. व त्या फौजेंतील कोणी शिपाई, हें अन्यायाचें काम आहे किंवा हें आमच्या हिताविरुद्ध आहे म्हणून आम्ही करीत नाहीं, असें म्हणणारे निघाले, तर ते शिपाई मोठे बद्माष, बंडखोर, आणि शपथ मोडणारे आहेत, असा बोभाटा करून त्यांना शिक्षा द्यावयाला सांपडते. पण अन्यायाचें आणि आपल्याच घरावर निखारे ठेवण्याचें काम करण्याला कोणीही शपथेनें बांधला जाऊं शकत नाहीं, ही गोष्ट हे राजे लोक अगदींच विसरतात, आणि आपल्या शिपायांना विसरण्याला भाग पाडतात; व असले विचार आणि असलीं तत्त्वें आपल्या शिपायांच्या मनामध्यें उद्भवूं नयेत याच्याबद्दल ते फार दक्ष असतात. व यासाठींच बहुतेक ठिकाणीं आडमुठे शिपाई पसंत करण्यांत येतात. आणि उच्च प्रतीच्या कोणी लोकांनीं लष्करी खात्यांत शिरण्याबद्दल आपली इच्छा प्रगट केली तरी देखील त्यांना मुद्दाम मनाई केली जाते, याचें देखील कारण हेंच कीं, ज्यांच्या डोक्यामध्यें असले विचार येण्याचा संभव आहे असल्या लोकांचा आपल्या सैन्याला गंधही लागतां कामा नये. असल्या विचारांना अलीकडे सैन्यांतून प्रतिबंध केलेला असल्यामुळें हल्लीचे शिपाई म्हणजे निवळ चालणाऱ्या बंदुका आणि घोड्यांवर बसणाऱ्या तरवारी होऊन गेल्या आहेत. त्या लोखंडाच्या बंदुकांना आणि तरवारींना असें अंतःकरण म्हणून बिलकुल नसतें तसेंच तें या शिपायांनाही नसतें. बंदुकीला ज्याप्रमाणें स्वदेश नाहीं, आणि तरवार जशी स्वदेशबंधूलाही ओळखूं शकत नाहीं, तशीच स्थिति, देवानें सजीव म्हणून निर्माण केलेल्या, परंतु हुकुमामुळें निर्जीव होऊन गेलेल्या, शिपायांची झालेली आहे. पण अशी स्थिति सर्वत्रच आहे असें नाहीं. यूरोपच्या इतिहासामध्यें अशीं कित्येक स्थळें आढळून येतात कीं, अधिकाऱ्यांनीं

हुकूम केला असतां हा हुकूम आपल्या देशहिताच्या विरुद्ध आहे किंवा आपल्या देशबंधूंच्या जीविताला प्रतिकूळ आहे असें शिपायांना आढळून आल्यावरून त्यांनीं ते हुकूम मान्य केलेले नाहींत. परंतु अशीं कृत्यें ज्यांना कांहीं ज्ञान आहे अशाच शिपायांच्या ठिकाणीं संभवतील. दगडांच्या ठिकाणीं संभवणें कठीण आहे. यासाठीं शिपायांनीं नेहमीं सज्ञान असण्याचा प्रयत्न केला पाहिजे व त्यांनीं हें लक्षांत बाळगिलें पाहिजे कीं, आपण सैन्यांत चाकरी धरली म्हणजे आपली सर्व स्वतंत्रता विकली असें नाहीं. आपण शिपाई झालों म्हणजे गुलाम झालों असें नाहीं. शिपायानें स्वतः स्वतंत्र असलें पाहिजे इतकेंच नव्हे, तर त्यानें दुसऱ्यालाही स्वतंत्र करून सोडलें पाहिजे. आपण शिपाईगिरी पतकरली असतांनाही आपला नागरिकपणाचा हक्क आपल्यापाशीं कायम आहे, त्या हक्काप्रमाणें आपण आपल्या देशाच्या हितासाठीं जपलें पाहिजे, व न्याय आणि नीति यांना स्मरून नेहमीं वागलें पाहिजे. या गोष्टी प्रत्येक शिपायानें लक्षांत बाळगिणें जरूर आहे व या गोष्टी आपल्या शिपायांना समजतील अशा प्रकारची तजवीज करणें हें प्रत्येक राजाचेंही कर्तव्य कर्म आहे.

---

## पिकाची पाहणी : : : २०

काळ : अग्रलेख—स. नं. १ : ता. ६-२-१९०३

„ „ २ : ता. १३-२-१९०३

पो. नं. १

पो. नं. २ ता. २०-२-१९०३

काळ : अग्रलेख—स. नं. ३ : ता. २७-२-१९०३

„ „ ४ : ता. ६-३-१९०३

★ हिंदुस्थानांत या पिकाचाही दुष्काळ.

प्रजेच्या हितासाठीं म्हणून राजे निर्माण करण्यांत आले. परंतु राजांच्या हातांत सत्ता आल्याबरोबर प्रजेच्या हिताकडे दुर्लक्ष करून त्यांनीं आपलेंच प्रस्थ वाढविण्याला सुरवात केली व त्यामुळें प्रजेला त्रास होऊं लागला; व त्या त्रासाचें परिमार्जन करण्याकरितां प्रजेलाही कांहीं साधन शोधून काढणें भाग पडलें. यूरोपांतील गेल्या दीड शतकामधील इतिहासाचें स्थूल मानानें पर्यालोचन केलें असतां राजाची सत्ता आणि लोकांचें हित यामध्यें वारंवार चालत असलेल्या झगडयांनीं तो इतिहास सर्व भरून गेलेला आहे असें दिसून येतें. राजे आपली सत्ता वाढविण्याकरितां कारस्थानें आणि जुलूम करीत आहेत आणि

राजांचें प्राबल्य, तर एकदां लोकपक्षाला विजय; एकदां राजे लोकांना छळताहेत, गांजताहेत, त्रास देत आहेत, तर एकदां लोक राजांना पळवून लावीत आहेत, पदच्युत करीत आहेत, फांशी देत आहेत; अशा प्रकारची एकंदर घडामोड चाललेली दिसून येते चाकाच्या धावेप्रमाणें एकदां एक पक्ष वर येतो आणि फिरून कांहीं वेळानें तोच पक्ष धुळींत चिरडून जाऊन पूर्वीं धुळींत चिरडलेला पक्ष अग्रभागीं येतो, असा क्रम चालत आलेला दिसतो. इंग्लंडपासून अमेरिका स्वतंत्र होईपर्यंत इंग्लंडचा राजपक्ष अमेरिकेंतील लोकांना नानाप्रकारच्या अन्यायांनीं आणि जुलमांनीं त्रासवून सोडीत होता. परंतु सुदैवानें तें पारडें फिरलें. इंग्लिश लोक अमेरिकन लोकांना चिरडीत होते त्याच सुमाराला फ्रान्समधील राजे, सरदार आणि धर्माधिकारी फ्रेंच लोकांना नानाप्रकारच्या जुलुमाखालीं चिरडून टाकण्यामध्यें गर्क झालेले होते. त्या वेळीं आपली स्थिति काय होत आहे आणि ती कोण करीत आहे ह्याच्याबद्दलचें ज्ञान व्हॉल्टेअर, रूसो, डीॲलंबर्ट व दुसरे एनसायक्लोपीडिस्ट या नांवाखालीं मोडणारे लेखक यांनीं सर्व फ्रान्सदेशामध्यें प्रसृत केलें. त्यामुळें फ्रान्समध्यें राजकीय क्रांति घडवून आणणाऱ्या अनेक गुप्त आणि उघड मंडळ्या, क्लब व सभा स्थापन झाल्या. आणि त्या सगळ्यांचा कळस १७८९ च्या प्रचंड राज्यक्रांतीमध्यें झाला. तेव्हांपासून राजांच्या सत्तेला ओहोटी लागून लोकांचा पक्ष प्रबळ होऊं लागला. प्रत्यक्ष राज्यक्रांति अशी फक्त फ्रान्समध्येंच झाली. परंतु तिचे फ्रान्सच्या गादीला बसलेले धक्के असे कांहीं प्रबळ होते, कीं त्यांच्या योगानें युरोपांतील बहुतेक सिंहासनें, तीं पुष्कळ दिवसांचीं आणि भक्कम होतीं तरी, आपआपल्या जागीं डळमळूं लागलीं. स्पेन, ऑस्ट्रिया, राशिया, प्रशिया, इंग्लंड वगैरे सर्व ठिकाणच्या राजांना आणि बादशहांना फ्रान्सचें उदाहरण पाहून आपली प्रजाही आपल्याला सोळाव्या लुईप्रमाणें पदच्युत करून फांशी देते कीं काय अशी भीति वाटूं लागली. त्यामुळें लोकपक्षाला चिरडून टाकण्यासाठीं युरोपांतील बहुतेक मोठमोठ्या राजांचीं सैन्यें एकत्र झालीं व लोकांच्या हातामध्यें जो कांहीं थोडाबहुत अधिकार आला होता आणि मनामध्यें जो कांहीं थोडाबहुत उत्साह शिरला होता तो सर्व १८१५ मध्यें नाहींसा होऊन फिरून सर्व युरोपभर बादशाही जुलुमाला सुरुवात झाली. फ्रान्सच्या गादीवर फिरून नवीन राजाची स्थापना झाली. युरोपांतील बाकीच्या राजांना धीर आला व आतां आपला

जुलूम अक्षय्य टिकेल अशी युरोपियन राजांना खात्री वाटूं लागली. पण ही त्यांची खात्री फार दिवस टिकली नाहीं. मिरॅबो वगैरे फ्रेंच राजकारणी पुरुषांच्या प्रयत्नांना पहिल्या राज्यक्रांतीमध्यें कायमचें यश आलें नाहीं हें खरें, तरी पण त्यांनीं लोकांचे विचार बदलून टाकिले होते यांत कांहीं शंका नाहीं जुलुमाचा तिटकारा, स्वतंत्रतेची आवड आणि लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची हौस ह्या गोष्टी लोकांच्या अगदीं अंतःकरणापर्यंत जाऊन बिंबलेल्या होत्या. मोठ्या राजांच्या मोठमोठ्या सैन्यापुढें या गोष्टींचें एकदां कांहीं चाललें नाहीं, म्हणून त्या वेळेपुरत्या त्या दबून राहिल्या होत्या, परंतु सर्वस्वीं नष्ट मात्र झालेल्या नव्हत्या. त्यांनीं १८३० मध्यें फिरून उचल खाल्ली. १८१५ पासून १८३० पर्यंत सुमारें पंधरा वर्षें युरोपियन राजांना आपल्या मुलुखावर आपला जुलूम सुरळीतपणें आणि शांतपणें चालवितां आला. परंतु १८३० मध्यें फ्रान्स देशांत दुसरी राज्यक्रांति झाली. एखाद्या खाणींत सुरुंग उडाला म्हणजे तो सुरुंग आपल्या जवळचेच दगड फोडितो असें नसून, त्या खाणींतील सर्व दगड आणि जमिनींत गेलेले दगडांचे खोलखोल थरही तो हादरून टाकतो, त्याप्रमाणें ह्या दुसऱ्या राज्यक्रांतीचे परिणाम फक्त एका फ्रान्स देशामध्येंच घडून आले नसून, त्या परिणामाचीं चिन्हें आसपासच्या सर्व युरोपियन संस्थानांतून स्पष्टपणें दिसून येत होतीं. ह्या वेळीं फिरून एकदां लोकपक्षाची लाट जोरानें उसळली. व ते लोक आपआपल्या राजापाशीं कॉन्स्टिट्यूशन-प्रमाणें राज्य चालविण्याविषयीं हक्क मागूं लागले आणि राज्यक्रांतीच्या भीतीनें गर्भगळित झालेल्या राजांनीं आपली नेहमींची सर्व अरेरावी बाजूला ठेवून लोकांच्या मागण्या मुकाट्यानें कबूल केल्या. व तेवढ्या वेळेपुरती युरोपमध्यें शांतता झाली. परंतु माणसाच्या रक्ताची चटक लागलेल्या वाघाला ज्याप्रमाणें तें प्राप्त करून घेतल्यावांचून कधींही स्वस्थता वाटत नाहीं त्याप्रमाणें युरोपांतील लोकांचीं स्थिति झालेली होती. फ्रेंच लोकांना स्वतंत्रता आणि लोकसत्तात्मक राज्य-पद्धति ह्यांची इतकी चटक लागून गेलेली होती कीं, त्या दोन गोष्टी प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांना कितीही राज्यक्रांत्या कराव्या लागल्या असत्या तरी ते त्या करण्याला तयार झाले असते. फ्रेंच लोकांनीं १८४८ मध्यें फिरून एकदां राज्यक्रांति केली. फ्रान्सचा त्या वेळचा राजा, लुई फिलिप, ह्याला खवळून गेलेल्या लोकांच्या त्वेषापासून आपलें संरक्षण करण्याकरिता आपल्या

बायकामुलांना घेऊन पॅरिसमधून पळ काढून जाणें भाग पडलें व लामार्टिनें ह्याला अध्यक्ष नेमून फ्रेंच लोकांनीं लोकसत्तात्मक राज्य फ्रान्समध्यें पुनरपि स्थापन केलें. लोक अनुकरणशील असतात असें म्हणा, किंवा एकदां एखादी लाट उसळली म्हणजे ती चोहोंकडेच फैलावत सुटते म्हणून म्हणा, फ्रान्समधील ह्या राज्यक्रांतीची बातमी ऐकून युरोपांतील सर्व ठिकाणच्या लोकांच्या अंतःकरणवृत्तीमध्यें खळबळ होऊन गेली. ज्याप्रमाणें वर्षाऋतूची वेळ आली म्हणजे चोहोंकडे ढग उत्पन्न होऊं लागतात, त्याप्रमाणें यूरोपची त्या वेळची स्थिति झाली होती. आपल्या राजांनीं आपल्यावर फार जुलूम केले आहेत, आपल्याला त्यापासून अनंत दुःखें प्राप्त झालेलीं आहेत, त्या सगळ्यांचें परिमार्जन करण्याची ही वेळ आलेली आहे, आपल्याला कॉन्स्टिट्यूशनप्रमाणें राज्यकारभार चालेल अशीं मिळालेलीं वचनें अजूनपर्यंत कधींही पुरीं झालेलीं नाहींत तीं पुरीं करून घेण्याची ही वेळ आलेली आहे, राजांच्या जुलमाखालीं राहण्यापेक्षां लोकसत्तात्मक राज्यपद्धति असणें उत्तम, आणि ती प्राप्त करून घेण्याचीही वेळ आली आहे, असें ज्याला त्याला वाटूं लागलें व जेथें तेथें राज्यक्रांतीचे विचार सुरू झाले. फ्रान्समधील पहिल्या राज्यक्रांतीपासूनच सर्व यूरोप खंडभर निरनिराळया प्रकारच्या गुप्त मंडळ्या स्थापन झालेल्या होत्या. त्यांतील खटपटी लोक पुढें सरसावून वरील उदात्त विचार शेवटास नेण्याकरितां जिकडे तिकडे जारीनें प्रयत्न करूं लागले. १८४८ सालीं हा जो राज्यक्रांतीचा पाऊस पडला त्याचीं पिकें कोठकोठें कसकशीं आलीं ह्याबद्दलची पाहणी करणें हा एक अतिशय मनोरंजक विषय आहे. सबब त्यापैकीं ऑस्ट्रियामध्यें ह्या पावसापासून कसें काय पीक आलें हें पाहण्याचें आज योजलें आहे.

फ्रान्समध्यें पडलेल्या पावसाचें पाणी वाहत वाहत ऑस्ट्रियाच्या साम्राज्यामध्यें येऊन शिरलें आणि त्यानें जिकडे तिकडे चळवळ उडवून दिली. इ. स. १८४८ च्या फेब्रुआरी महिन्यांत फ्रान्समध्यें जी भयंकर राज्यक्रांति झाली तिच्याबद्दलची बातमी व्हायना शहरामध्यें मार्चच्या पहिल्या तारखेला येऊन पोंहोचली. ही बातमी ऐकून निरनिराळ्या लोकांवर निरनिराळे परिणाम होऊं लागले. राजाच्या दरबारांत, प्रधानमंडळींत आणि सरदार लोकांत जेव्हां ही बातमी एखाद्या जालीम विषाप्रमाणें पसरली तेव्हां त्या सगळ्यांचे हातपायच मोडून गेले, व फ्रान्सच्या राज्याप्रमाणें आपलेंही राज्य खास जातें असेंही

त्यांना वाटूं लागलें. परंतु एखाद्या मरणोन्मुख रोग्याच्या शरीरामध्यें त्रैलोक्य-चिंतामणीच्या मात्रेप्रमाणें जेव्हां सामान्य लोकांमध्यें ह्या बातमीनें प्रवेश केला, तेव्हां लुळ्या आणि पांगळ्या लोकांच्याही हातपायांमधून शौर्य, उत्साह आणि धैर्य यांच्या लहरी उसळूं लागल्या. फ्रान्सचा राजा लुई फिलिप ह्याच्या गादीचें संरक्षण करण्याकरितां त्याच्याजवळ साठ हजार सैन्य असतांही त्याला पळून जावें लागलें, तेव्हां आतां आपला निभाव कसा लागतो, असे विचार मनात येऊन ऑस्ट्रियाचा बादशहा फर्डिनँड याची पांचावर धारण बसली. अशी वेळ आली म्हणजे, एका बाजूचे लोक मोठे शूर असतांही त्यांचा धीर सुटून जातो आणि दुसऱ्या बाजूचे कोणी अतिशय भित्रे असले तरी त्यांनादेखील स्फुरण चढतें. व तसा प्रकार त्या वेळीं ऑस्ट्रियामध्यें झाला. पारिसमधील राज्यक्रांतीची बातमी एका शहरांतून दुसऱ्या शहरांत आणि एका गांवांतून दुसऱ्या गांवांत ह्या-प्रमाणें सर्व ऑस्ट्रियाभर हं हं म्हणतां पसरली व सर्व लोकांत गडबड उडून गेली. ऑस्ट्रियाच्या भोंवतालच्या सर्व प्रदेशांतूनही हाच राज्यक्रांतीचा वणवा पसरलेला होता; व इटली, जर्मनी, हॉलंड, पोलंड, बेल्ज्यम वगैरे सर्व ठिकाणचे लोक अगदीं चिथरून गेलेले होते. अशा रीतीनें चोहोंकडून लोकमताचा समुद्र खवळून गेलेला असतां त्याच्या मध्यभागींच ऑस्ट्रियन साम्राज्याचें तारूं एखाद्या खडका-वर आपटल्यावांचून सुरक्षितपणें आपला मार्ग क्रमण करीत राहील ही गोष्ट अगदीं असंभवनीय होती. ऑस्ट्रियांतील उद्योगधंद्यांची स्थिति ह्या वेळी फारशी समाधानकारक नव्हती. ह्यामुळें व इतरही अनेक कारणांमुळें ऑस्ट्रि-यन लोकांमध्यें असंतोष अतिशय वाढलेला होता. आणि सगळ्या गोष्टी दूर करण्याला राज्यक्रांति हाच उपाय आहे, असें तेथील लोकांना वाटूं लागलें, व त्याबद्दलची लोकांची उत्कंठा दिवसेंदिवस जास्त वाढत चालली. ऑस्ट्रियाच्या राज्यक्रांतीमध्यें एक विशेष गोष्ट होती ती ही कीं, ती घडवून आणण्यामध्यें तेथील कॉलेजांतील विद्यार्थी आणि त्यांचे शिक्षक ह्यांचें अतिशय अंग होतें. व्हाएनाच्या युनिव्हर्सिटींतील शिक्षकांनीं प्रथम बादशहाकडे पाठविण्याकरितां आपल्या तक्रारींचा एक अर्ज तयार केला व त्यावर सर्व विद्यार्थ्यांनीं आणि शहरांतील मोठमोठ्या लोकांनीं सह्या केल्या. नंतर सर्व विद्यार्थी आपल्या कॉलेज-मध्यें गोळा होऊन तेथून राजवाड्याकडे जाण्याकरितां आपल्या शिक्षकांना पुढें करून निघाले. त्या वेळीं त्यांच्या मागून शहरांतील इतर बाजारबुणग्या

लोकांचीही अतिशय गर्दी जमली. ही सर्व मंडळी राजवाड्यापाशीं आली, परंतु त्यांना आंत जाण्याला मज्जाव झाला. पण दुसरे दिवशीं फिरून तेच सर्व लोक जास्त दृढनिश्चयानें राजवाड्यापुढें आले, व राजवाड्यांत प्रतिनिधींची सभा काम करीत होती तेथें ते घुसले. त्या गर्दींत कॉलेजांतील शिक्षक आणि विद्यार्थी त्यांच्याबरोबर दुसरेही अनेक प्रकारचे लोक गोळा झालेले होते. हे सर्व स्वतंत्रतेचें नांव उच्चारून मोठमोठ्यानें गर्जना करीत होते. लोक इतके खवळलेले पाहून त्यांच्यावर गोळ्या घालण्याचा हुकूम देणं भाग पडलें. तेव्हां लोक पळून गेले. परंतु बंदुकवाल्यांच्या दुकानांत शिरून तथील बंदुका घेऊन ते परत आले व बादशाही सैन्य आणि शहरांतील लोक यांच्यामध्यें रक्तपात होण्याला सुरुवात झाली. येथपर्यंत प्रकार आलेला पाहून पुष्कळ लोक ' अमुक करावें तमुक करावें ' अशा सूचना करण्याकरितां राजाकडे येऊं लागले. राजा त्या सर्वांचें म्हणणें ऐकून घेत होता. परंतु अगदीं घाबरून गेल्यामुळें आपण काय करावें ह्याबद्दल त्याचा कांहींच निश्चय होईना. अखेरीस युनिव्हर्सिटीच्या रेक्टरनें अशी एक विनंति केली कीं कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या हातांत जर शस्त्रें दिलीं तर ते शहरांचें संरक्षण करतील; व ही विनंति मान्य करण्यांत आली. शहरांत माजलेल्या पुंडाव्याला न भितां व लोकांचें म्हणणें कबूल न करितां त्यांना प्रतिबंध करावा असा फर्डिनँडचा मुख्य प्रधान मेटरनिच ह्याचा सल्ला होता. परंतु फर्डिनँडचा स्वभाव फार अस्थिर आणि भित्रा असल्यामुळें त्याला तसें करण्याचें धैर्य येईना. मेटरनिचबद्दल लोकांना अतिशय तिटकारा आलेला होता, आणि राजाही त्याच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याला तयार नव्हता. म्हणून त्याला आपली जागा सोडून पळून जाणें भाग पडलें. मेटरनिच गेल्या नंतर लोकांचें शांतवन करण्याकरितां त्यांच्या ज्या ज्या मुख्य हक्कांबद्दल मागण्या होत्या, त्या सर्व त्यांना दिल्या. राजाकडून ह्या देणग्या काढून घेण्याचें श्रेय सुमारें दोन हजार विद्यार्थी आणि त्यांचे शिक्षक ह्यांच्याकडेच मुख्यत्वें-करून होतें. तरी पण लोकांचें तेवढ्यानें समाधान होईना. शहरांत चाललेल्या दंग्यांत जे मजूर लोक सामील झाले होते त्यांचें असें म्हणणें होतें कीं आमचे जे खाण्यापिण्याचे पदार्थ आहेत त्यांच्यावर सरकारी जकात बसविली जात असल्यामुळें ते आम्हांला महाग पडतात, तेव्हां त्यांजवरील जकात बंद करावी

व हें आपलें म्हणणें अमलांत आणण्याकरितां शहरासभोंवतीं जीं जीं जकात घेण्याचीं नाकीं होतीं तीं सर्व त्यांनीं जमिनदोस्त करून टाकिलीं. पूर्वीं ठरल्याप्रमाणें शहराच्या संरक्षणाकरितां कॉलेजच्या विद्यार्थ्यांना शस्त्रें देऊन त्यांच्या पलटणी तयार करण्यांत आलेल्या होत्या. परंतु त्यांनीं ह्या लोकांना कांहीं एक प्रतिबंध केला नाहीं. त्यांनीं आपलें सर्व लक्ष राजापासून आणखी जास्त कशा प्रकारचे हक्क मागून घ्यावयाचे ह्याचा मसुदा तयार करण्यामध्यें घातलें होतें. ह्याप्रमाणें चोहोंकडून वेढून गेल्यामुळें राजानें लोकांच्या प्रतिनिधींची संस्था बोलावण्याचें कबूल केलें.

व्हाएना हें ऑस्ट्रियन साम्राज्याचें मुख्य शहर होय. तेथील दंगेधोपे थोडेबहुत शांत होत आहेत न होत आहेत तोंच त्या साम्राज्याच्या इतर भागांमध्यें बऱ्याच ठिकाणीं अस्वस्थता उत्पन्न होण्याला सुरुवात झाली. हंगारी, लॉंबर्डी, बोहेमिया वगैरे ऑस्ट्रियन साम्राज्याच्या अमलाखालील प्रांतांतून एकाच वेळीं दंगेधोपे सुरू झाल्यामुळें सगळ्यांना तोंड देणें ऑस्ट्रियाला फार कठिण होऊन गेलें. व त्यामुळें जेथील लोक जें मागतील तेथील लोकांना तें मुकाट्यानें देऊन त्यांना कसें तरी आपल्या अमलाखालीं थांबवून ठेवावयाचें याच्यापलीकडे ऑस्ट्रियाला दुसरें कांहीं करितां येण्यासारखें नव्हतें. व्हाएनांतील लोकांना तुमच्यावर मी ठरलेल्या कॉन्स्टिटयूशनप्रमाणें राज्य करीन असें राजानें अखेरीस वचन दिलें व ती कॉन्स्टिटयूशन कशी असणार ह्याच्याबद्दलही निर्णय करून सांगितला. परंतु त्यांत कित्येक कलमें अशीं होतीं कीं, विद्यार्थ्यांच्या पलटणीला तीं मुळींच पसंत पडलीं नाहींत. म्हणून त्यांत दुरुस्ती करून घेण्याकरितां आपल्या हातांत बंदुका घेऊन ते राजवाड्याकडे निघाले. आपल्या सैन्याच्या मदतीनें आपण लोकांवर कोणत्याही रीतीनें जुलूम करणार नाहीं, असा लोकांच्या मनांत विश्वास उत्पन्न करण्याकरितां राजानें आपलें सैन्य आधींच शहराच्या बाहेर पाठविलें होतें. अशा स्थितींत हातांत शस्त्रें घेतलेल्या विद्यार्थ्यांनीं राजाला गांठल्यामुळें त्यांनी सुचविलेल्या सर्व सुधारणा मान्य करणें राजाला भाग पडलें. परंतु पाठामागून राजानें असा विचार केला कीं, अशा स्थितींत आपण येथें राहणें बरोबर नाहीं. व म्हणून तो आपल्या माणसांसह गुप्तपणें निघून टायरोलमध्यें जाऊन राहिला. राजा व्हाएना शहर सोडून गेला ह्यावरून आतांपर्यंत राजानें ज्या सुधारणा केल्या त्या मनापासून केल्या

नाहींत, व कायद्याप्रमाणें राज्य करण्याच्या पद्धतीविरुद्ध राजाचें मत आहे, असें लोकांच्या पुढाऱ्यांना वाटूं लागलें. राजाच्या मनांतून खरोखर सुधारणा करावयाच्या नाहींत आणि त्याचा लोकांच्या पुढाऱ्यांवर विश्वास नाहीं, मग आपला तरी त्याच्यावर विश्वास काय म्हणून असावा ? आणि जर राजाचा लोकांवर आणि लोकांचा राजावर विश्वास नाहीं, तर अशा स्थितींत कोणतेंही राज्य चालणें अशक्य आहे. तेव्हां असलें निरुपयोगी राज्य कशाला पाहिजे आहे ? असे विचार मनांत आणून व्हाएना येथील विद्यार्थी, शिक्षक आणि अशाच मताचे इतर लोक सर्व राज्यव्यवस्था आपल्याच हातामध्यें घेण्याच्या विचारामध्यें होते. युनिव्हर्सिटींतील विद्यार्थ्यांनीं आपली युनिव्हर्सिटीची म्हणून एक स्वतंत्र पलटण बनविली, व सर्व चळवळीमधील अग्रेसरत्व त्यांनीं आपल्याकडे घेतलें. व त्यांच्यांतील लोकप्रिय वक्त्यांनीं सर्व लोकांना असें समजावून सांगितलें कीं, ह्या राज्यक्रांतीच्या कामांत आतां आपण इतके पुढें सरसावलों आहों कीं, आतां तें काम अर्धें टाकून मागें सरणें शक्य नाहीं. राजा खुद्द आपली गादी सोडून गेलेला आहे; व त्याचें सैन्य बाहेर घालवून देण्याला आपण त्याला भाग पाडलें आहे. तें सैन्य जर फिरून परत आलें तर आपली स्वतंत्रता नष्ट होण्याची फार भीति आहे. यासाठीं आपण हें सुरू केलेलें काम असेंच पुढें चालू ठेविलें पाहिजे. असल्या उपदेशानें लोकांचीं मनेंही तयार झालेलीं होतीं. व व्हाएना येथील बहुतेक सत्ता लोकांच्या हातांमध्यें आलेली होती.

आतां हें खरें कीं, ही सत्ता लोकांच्या हातांत टिकली नाहीं. राजा व्हाएना शहरामध्यें असल्यामुळें ज्यांच्या मालाची विक्री नेहमीं पुष्कळ होत असे, अशा व्यापारी लोकांचें राजा नसल्यामुळें नुकसान होऊं लागलें. व त्यांना स्वतंत्रतेपेक्षां नफ्याचीच जास्त हांव सुटून त्यांनीं राजाला परत बोलावण्याला सुरवात केली. सैन्यांतील लोकांकडूनही राजाला बरींच आश्वासनें मिळालीं होतीं. व राजा परत आल्यास हे लोक त्याच्या बाजूनें लढून व्यवस्था राखतील असा पुष्कळ संभव दिसत होता. त्यामुळें राजा फर्डिनँड हा ऑगस्टच्या १२ व्या तारखेला व्हाएनामध्यें परत आला राजाच्या पक्षाला उत्तेजन येण्याला आणखीही एक कारण झालें. आपल्या इकडे जशा जाती आहेत, तशाच ऑस्ट्रियामध्यें मॅगेअर्स आणि क्रोशियन्स अशा दोन जाती

त्या वेळीं प्रबळ होत्या. त्या दोघांचें आपसामध्यें वैमनस्य माजून त्यांपैकीं क्रोशियन्स राजाच्या पक्षाला जाऊन मिळाले, व त्यामुळें राजाला परत येण्याला पुष्कळ धीर आला. राजा व्हाएना शहरांत आला. परंतु त्याचें वजन त्याच्याबरोबर आलें नाहीं. त्याचें महत्त्व नष्ट झालें होतें. कारण, लोकांची सत्ता आणि लोकांचे हक्क पूर्वींच्यापेक्षां ह्या राज्यक्रांतीनें फारच जास्त वाढलेले होते. राजा स्वित्झर्लंडच्या डोंगरांतून येऊन परत आपल्या सिंहासनावर बसला. पण अजूनही तें सिंहासन हंगेरियन लोकांच्या बंडाव्यानें चोहोंबाजूंनीं डळमळत होतें, व ऑस्ट्रियाचें पूर्वीं एकदां जें सामर्थ्य होतें तें या राज्यक्रांतीमुळें समूळ नाहीसें होऊन गेलेलें होतें. अशा स्थितींत राज्य करण्याला फर्डिनँड इतका कंटाळला होता कीं, त्यानें डिसेंबर महिन्यांत फ्रान्सिस जोसेफ याच्या हवालीं सर्व राज्यकारभार करून गादीवरील आपला हक्क सोडून दिला.

ह्याप्रमाणें ऑस्ट्रियाच्या साम्राज्यावर ह्या राज्यक्रांतीचे परिणाम घडून आले. ऑस्ट्रियन लोक राजाच्या कचाटयांतून पूर्णपणें सुटले नाहींत हें खरें; तरी पण त्यांच्या मानेवरील पूर्वींच्या जुलुमाच्या जोखडाचा भार पुष्कळपटीनें कमी झाला. राजाची सत्ता पुष्कळ मोडकळास आली, आणि लोकांचा स्वतंत्रता व लोकांचे हक्क पुष्कळ वाढले.

---

# पिकाची पाहणी

## सर्वे नंबर २

## पोट नंबर १

फ्रान्समधील राज्यक्रांतीचा ऑस्ट्रियन साम्राज्याचें मुख्य शहर व्हाएना आणि तेथील राजा फर्डिनँड यांच्यावर काय परिणाम झाला हें आपण मागील अंकीं पाहिलेंच आहे. आतां त्या ऑस्ट्रियन साम्राज्यांतील हंगारी हा जो एक मोठा प्रांत त्याजवर ह्याचे काय काय परिणाम झाले या प्रश्नाकडे आपण वळूं

हंगारी हा ऑस्ट्रियन साम्राज्याच्या पोटांतील एक अतिशय महत्त्वाचा भाग त्या वेळीं होता. ह्याचें क्षेत्रफळ जवळ जवळ १,२५,००० चौरस मैल असून तेथील लोकसंख्या दीड कोटीच्यावर होती. म्हणजे क्षेत्रफळ आणि लोकसंख्या ह्यांच्या मानानें हंगारी हा प्रदेश सरासरी मुंबई इलाख्याएवढा मोठा होता. ह्या प्रदेशामध्यें कार्पेथियन नांवाच्या पर्वताची रांग पसरली असून त्या पर्वताची उंची दहा हजार फूटपर्यंत कित्येक ठिकाणीं भरते. डॅन्यूब, ड्रॅव्ह वगैरे नद्या, प्लॅटनसीसारखीं मोठमोठालीं सरोवरें, आणि अनेक लहान लहान कालवे, यांच्या योगानें हा प्रांत अतिशय सुपीक झालेला आहे. बुडा, पेस्त, प्रेसबर्ग वगैरे ह्या प्रांतांतील मोठमोठीं शहरें फार नामांकित आहेत. ह्या प्रांतांत रोमन कॅथलिक धर्माचाच विशेष प्रचार आहे. येथें शिक्षणाचा प्रसार सर्व वर्गांच्या लोकांतून फारसा झालेला नाहीं. फक्त वरच्या वर्गांतील लोक मात्र चांगले सुशिक्षित आहेत. ह्या प्रांताबद्दल ख्रिश्चन राष्ट्रें आणि टर्कीचे मुसलमान यांच्यामध्यें पुष्कळ लढाया वरच्यावर चाललेल्या होत्या. परंतु इ. स. १६८७ पासून हा प्रांत पूर्णपणें ऑस्ट्रियाच्या ताब्यामध्यें आला व नंतर मधून मधून तुर्क लोकांपासून जरी थोडाबहुत त्रास होत होता, तरी एकंदरीनें पाहतां तेव्हांपासून १८४८ पर्यंत हंगारी हा प्रांत ऑस्ट्रियाकडे सुरळीतपणें चालत होता. हंगारी हा प्रांत जरी ह्याप्रमाणें ऑस्ट्रियाच्या अमलाखालीं इतके दिवसपर्यंत राहिला होता, तरी तो मोठ्या खुषीनें राहिला होता असें नाहीं. ऑस्ट्रियाच्या जुलुमापासून हंगेरियन लोकांना अतिशय त्रास होत असे. परंतु ऑस्ट्रियाच्या विरुद्ध उठण्याचें त्यांच्यामध्यें सामर्थ्य नसल्यामुळें योग्य वेळेची प्रतीक्षा करीत ते स्वस्थ बसले होते. ती वेळ अखेरीस १८४८ मध्यें प्राप्त झाली. फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाल्याची बातमी हंगारीचें मुख्य शहर प्रेसबर्ग येथें ३ मार्च रोजीं कळली. ही बातमी पसरली तेव्हां हंगारीच्या पार्लमेंटमध्यें त्यांचीं रोजचीं कांहीं कामें चाललीं होतीं, परंतु तीं एकदम बंद ठेवून ऑस्ट्रियाच्या बादशहाकडे आपल्या मागण्यांचा एक अर्ज पाठविण्याविषयीं सर्वांचा विचार ठरला. लोकांनीं आपले प्रतिनिधि निवडावे, मुद्रणस्वातंत्र्य असावें, फौजदारी खटले उघड रीतीनें चालविले जावे, जीविताची सुरक्षितता राहावी, सर्व लोकांना शस्त्रें घेण्याची परवानगी असावी अशा हंगेरियन लोकांच्या मागण्या होत्या. पण त्यांची खरी इच्छा हंगारी देश ऑस्ट्रियापासून स्वतंत्र व्हावा, ही होती. हंगेरियन लोकांनीं लागलीच

एक अर्ज तयार करून तो बादशहापुढें नेऊन मांडण्याकरितां दीडशें लोकांची एक कमिटी नेमण्यांत आली व व्हाएना शहरामध्यें बंडावा सुरू झाल्यापासून दोन दिवसांनीं हे लोक आपला अर्ज राजापुढें मांडण्याकरितां व्हाएना शहरामध्यें येऊन दाखल झाले.

लुई कोसूथ हा या लोकांचा मुख्य होता. हंगेरियन लोकांच्या ज्या राज्यक्रांतीची हकीकत आतां पुढें द्यावयाची आहे, त्या सगळ्या राज्यक्रांतीच्या उलाढालीमध्यें कोसूथ हाच मुख्य पुरुष होता. १८०२ मध्यें याचा जन्म हंगेरीच्या उत्तर भागामध्यें झालेला होता. हा एका लहानशा जमीनदाराचा मुलगा असून त्याचें लहानपणींच कॉलेजमधील शिक्षण होऊन १८१९ मध्यें तो कायद्याचा अभ्यास करूं लागला होता. फ्रान्समध्यें आणि एकंदर सर्व यूरोप खंडामध्यें पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीचे झालेले परिणाम कोसूथच्या मनावर चांगले ठसलेले होते. १८३१ पासून हंगारीच्या पार्लमेंटमधील भाषणें हातानें लिहून आणि शिळा प्रेसावर छापून चोहोंकडे वांटण्याचा ह्यानें क्रम सुरू केला. परंतु ही गोष्ट ऑस्ट्रियन सरकारला न आवडल्यामुळें त्याला आपला प्रेस बंद ठेवणें भाग पडलें. नंतर एका राजकीय कटामध्यें सामील असल्याबद्दलचा आरोप कोसूथच्या कांहीं मित्रांवर आला होता. त्यांचा त्यानें पक्ष घेतल्याबद्दल सरकारचा त्याजवर रोष होऊन त्याला तीन वर्षें कैदेंत काढावीं लागलीं. पुढें १८४१ मध्यें त्याची तुरुंगांतून सुटका झाल्यानंतर त्यानें एक वर्तमानपत्र काढिलें. त्यामध्यें ऑस्ट्रियन सरकार कायद्याप्रमाणें हंगारीवर राज्य करीत नसून सरकारची स्वार्थाकडेच विशेष दृष्टि आहे असें उघडपणें प्रतिपादन केलें जात असे. हें वर्तमानपत्र हंगारीमध्यें फार लोकप्रिय झालेलें होतें. पुढें १८४७ मध्यें कोसूथ हा हंगारीच्या पार्लमेंटचा सभासद झाला. कोसूथला लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची फार आवड असे. तो स्वभावानें शूर व दृढनिश्चयी असून प्रसंग आला असतां मागेंपुढें पाहणारा नव्हता. तो लोकपक्षाचा खरा पुरस्कर्ता होता. आपला देश स्वतंत्र व्हावा अशी त्याची फार इच्छा होती. आणि त्यासाठीं राज्यक्रांति घडवून आणणाऱ्या गुप्त मंडळ्या स्थापन करण्याविषयीं त्याचे प्रयत्न जारीनें सुरू होते. त्याची वक्तृत्वशक्ति फारच अवर्णनीय होती. व तो हंगेरियन, लॅटिन, इंग्लिश, फ्रेंच आणि जर्मन ह्या सगळ्या भाषांतून अस्खलितपणें भाषण करीत असे.

पारख फार चांगली होती. तो दीर्घोद्योगी असे, आणि त्याला काम करण्याचा कधींही कंटाळा येत नसे ह्या व दुसऱ्या अनेक गुणांनीं हंगारीमध्यें त्याचें वजन फार वाढलें होतें. व हंगारीला ह्या राज्यक्रांतीमध्यें जें कांहीं यश आलें त्याचें मुख्य श्रेय कोसूथकडे होतें.

कोसूथ आणि त्याच्याबरोबरचे दुसरे हंगेरियन सभासद व्हाएना येथें आले तेव्हां तेथेंही सर्व लोक उच्छृंखळ होऊन गेले असून जिकडे तिकडे दंगे-धोपे चाललेले होते. आपल्याप्रमाणेंच कोसूथ आणि इतर हंगेरियन लोक ह्यांना जुलमाचा कंटाळा येऊन ते आपल्यासारखेच स्वातंत्र्यासाठीं खटपट करीत आहेत, असें पाहून व्हाएना येथील लोकांना अतिशय आनंद झाला. हंगेरियन लोकांच्या सन्मानाकरितां व्हाएनाच्या लोकांनीं जिकडे तिकडे हंगेरियन निशाणें उभारलीं व कोसूथच्या नांवानें जयघोष केला. ह्या वेळीं ऑस्ट्रियन सरकार इतकें दुबळें झालेलें होतें कीं, हंगेरियन लोकांची प्रत्येक मागणी त्यांनीं कबूल केली. परतु त्याच्या योगानें हंगारीमध्यें शांतता झाली नाहीं. कारण, ह्या मागण्या केवळ वरवरच्या होत्या, हंगेरियन लोकांच्या पोटांतील खरा हेतु म्हटला म्हणजे ऑस्ट्रियापासून आपण पूर्णपणें स्वतंत्र व्हावें हा होता आणि हा हेतु असल्या किरकोळ देणग्यांनीं कितपत पूर्ण होणार ? यामुळें हंगारीमध्यें बंडाव्याला सुरुवात झाली पेस्त हें हंगारीचें जुनें राजधानीचें शहर होतें व तेथें स्वदेशाभिमानाचें वारें फार संचारलेलें होतें. १५ मार्च रोजीं पेस्त शहरांतील कित्येक विद्यार्थी एकत्र जमून बाहेर पडले. त्यांनीं आपल्या देशाला काय काय गोष्टी पाहिजेत याबद्दलचा एक जाहीरनामा तयार केला. आणि एका छापखान्यांत घुसून त्यांनीं त्या जाहीरनाम्याच्या हजारों प्रती छापून काढून सर्व ठिकाणीं वांटल्या. त्यामुळें चोहोंकडे फारच गडबड उडून गेली व सर्व लोकांना अतिशय आवेश चढला. रस्त्यांतून लोकांची मोठी गर्दी जमली. त्यांनीं आपलें तीन रंगांचें स्वतंत्रताप्रदर्शक निशाण उभें केलें. आणि अशा थाटानें ते रस्त्यानें चालूं लागले. हंगारीमधील लोक इतके खवळलेले पाहून ते मागतील ते हक्क देण्याची व कॉन्स्टिटयूशनप्रमाणें चालण्याची राजानें आपली इच्छा व्यक्त केली. परंतु हंगेरियन लोकांचा ऑस्ट्रियाच्या जुलमा-बद्दलचा द्वेष अजूनही कमी होईना. आमचें सैन्य आम्ही ठेवूं आणि आम्हांला वाटेल तेव्हां तें सैन्य मोडून टाकूं, त्यावर ऑस्ट्रियाची कांहीं एक हुकमत असूं

नये, अशी हंगेरियन लोकांची इच्छा होती. हंगेरियन शिपायांनीं आपण हंगेरियन कॉन्स्टिटच्यूशनशीं इमानानें वागूं अशी शपथ घ्यावी असें हंगेरियन लोकांचें म्हणणें होतें. हंगेरियन शिपायांच्या मनामध्यें ऑस्ट्रियाच्या बादशहाबद्दल जी राजनिष्ठा होती ती पूर्णपणें नाहींशी करून टाकण्याविषयीं हंगेरियन लोकांचे एकसारखे प्रयत्न चालले होते. ह्याच सुमाराला इटलींतील लोक ऑस्ट्रियाच्या राजाविरुद्ध बंड करून उठले होते. त्या बंडवाल्यांच्याबद्दल सहानुभूति हंगेरियन लोक उघड उघड दाखवीत होते. व जे हंगेरियन शिपाई ऑस्ट्रियाच्या पदरीं नोकरीला होते त्यांचा ऑस्ट्रियाला त्या वेळीं इटलींतील बंड मोडण्याकरितां फार आवश्यकता होती. परंतु अशा वेळींही आपल्या ज्या पलटणी ऑस्ट्रियन साम्राज्यासाठीं इटलीमध्यें लढत होत्या त्या हंगेरियन लोकांनीं परत बोलाविल्या; व साम्राज्याच्या लढायांकरितां आम्ही एक पैही देणार नाहीं किंवा आपला एकही हंगेरियन मनुष्य खर्चीं घालणार नाहीं व साम्राज्याचा समाईक खर्च आणि साम्राज्याचें कर्ज ह्यांच्याशीं आमचा कांहीं एक संबंध नाहीं आणि त्याच्यासाठीं आम्ही एक कवडीदेखील देणार नाहीं, असें हंगेरियन लोकांनी साफ उत्तर दिलें.

हंगेरियन लोकांचा द्वेष इतक्या थराला जाऊन पोंचलेला पाहून व आपल्या दरबारामध्यें त्यांना आळा घालण्याइतकी ताकद नाहीं असें पाहून ऑस्ट्रियाच्या बादशहानें हगेरीचें सर्व म्हणणें कबूल केलें. व हंगारी आणि ऑस्ट्रिया या दोहोंचा राजा मात्र एक असावा एवढी अट खेरीजकरून बाकी सर्व बाबतींमध्यें हंगारी ऑस्ट्रियापासून पूर्णपणें स्वतंत्र झालें. परंतु स्वतंत्रता ही वस्तु मिळविण्याला जितकी सोपी आहे तितकी ती संरक्षण करण्याला सोपी नाहीं. हगेरियन लोकांना स्वतंत्रता मिळाली, पण ती त्यांना रक्षण करतां आली नाहीं. आपल्या हिंदुस्थान देशांत हिंदु आणि मुसलमान या जशा दोन जाती आहेत, तशाच प्रकारच्या मॅगेअर्स आणि क्रोशियन्स अशा दोन जाती हंगेरियामध्यें होत्या. आणि आपलें सरकार ज्याप्रमाणें कधीं कधीं हिंदुमुसलमानांच्यामध्यें भांडण लावून देऊन स्वार्थ साधून घेण्याचा प्रयत्न करितें, त्याचप्रमाणें त्या वेळीं ऑस्ट्रियन सरकारनें केलें. ऑस्ट्रियानें हंगारीला एका हातानें स्वतंत्रता दिली, परंतु दुसऱ्या हातानें ती त्यांच्याकडे टिकूं नये म्हणून प्रयत्न चालविले होते. मॅगेअर्स हे तिकडील वरिष्ठ प्रतीचे लोक होते. ह्यांत सरदार,

जहागीरदार वगैरे जुन्या कुलीन घराण्यांतील लोक मोडत असत. व क्रोशियन्स हे गरीब कुळींतले आणि भिन्न वृक्षापासून वाढलेले लोक होते. ह्या क्रोशियन लोकांच्या मनामध्यें मॅगेअर लोकांच्याविषयीं भलभलते गैरसमज उत्पन्न करण्याचा क्रम ऑस्ट्रियाच्या एजंटांनीं सुरू केला. ब्राह्मणांच्या हातांत सत्ता आली तर ते शूद्रांना वाईट रीतीनें वागवितील म्हणून ब्राह्मणांच्या हातांतली सर्व सत्ता काढून घ्यावी आणि ती इंग्रजांनीं आपल्याच हातांत ठेवावी हें जसें एक वेड मागासलेल्या जातींच्या लोकांमध्यें अलीकडे कोणी भरवून दिल्यामुळें आपल्या इकडे जसें फार प्रबळ झालें आहे, त्याचप्रमाणें त्या वेळीं ह्या क्रोशियन लोकांची स्थिति झालेली होती. त्यांचीं मनें भारलीं गेल्यामुळें त्यांना असें वाटूं लागलें कीं, आपला हंगारी देश स्वतंत्र होऊन त्याची सत्ता मॅगेअर्स लोकांच्या हातामध्यें आली तर ते आपल्याला चांगल्या रीतीनें वागविणार नाहींत. यासाठीं आपण त्यांना स्वतंत्रच होऊं देऊं नये व कांहीं तरी उपायांनीं ते गुलामगिरींतच राहतील अशी तजवीज केली पाहिजे. अशी कुकल्पना मनांत येऊन त्यांनीं हंगारीच्या स्वातंत्र्यमंदिरावर निखारा ठेवण्याचा दृढनिश्चय केला व हंगारीला स्वतंत्रता देऊं नये, अशाबद्दल त्यांनीं राजाकडे उघड उघड विनवण्या केल्या. याच्यापेक्षां मनुष्याच्या मनाची नीच अवस्था ती कोणती असणार ! ऑस्ट्रियन सरकारला असे कोणी घरभेद्ये पाहिजेच होते. ते मिळाल्याबरोबर सरकारनें त्यांचा पक्ष गुप्त रीतीनें घेतला. क्रोशियन लोकांचा मुख्य झेलॅचीच हा होता. त्याला उत्तेजन येईल अशा रीतीच्या ऑस्ट्रियन सरकारनें बऱ्याच गोष्टी केल्या. त्यामुळें हंगेरियन लोकांचें मन राजाविषयीं दूषित झालें व राजानें असें करूं नये असें सांगण्याकरितां कांहीं मंडळी पाठविण्याचें ठरलें. तुम्ही कोसूथला दूर केल्यावांचून तुमचें म्हणणें ऐकलें जाणार नाहीं असा जबाब मिळाल्यावरून कोसूथला येवढ्यापुरतें दूर करण्यांत आलें. परतु हंगेरियन लोकांच्या मनामध्यें प्रथम जें वारें शिरलें होतें तें कांहीं केल्यानें कमी होईना. व अखेरीस ऑस्ट्रियन सरकारनें क्रोशियन लोकांच्या बळावर हंगेरियन लोकांशीं युद्ध करण्याचा निश्चय केला आणि हंगारीच्या सरहद्दीवरील ड्रेव्ह नदी उतरून त्या मुलुखांत स्वारी करण्याकरितां जाण्याबद्दल झेलॅचीच याला ऑस्ट्रियन सरकारकडून हुकूम मिळाला.

ऑस्ट्रिया आणि हंगारी ह्यांच्यामध्यें याप्रमाणें लढाई सुरू होण्याचा रंग आला त्या वेळीं हंगेरियन लोकांची जशी असावी तशी तयारी नव्हती.

लोकांच्या अंगामध्यें स्वदेशाभिमानाचें स्फुरण पुष्कळ चढलेलें होतें. परंतु लढाईच्या कामाला जें शिक्षण लागतें तें फार थोड्यांना होतें. शहरांत राहणारे लोक स्वतंत्रतेसाठीं फार उत्सुक झालेले होते. व युनिव्हर्सिटींतील विद्यार्थ्यां-चीं मनें आपल्या शिक्षकांचीं व्याख्यानें ऐकून स्वतंत्रतेमध्यें तल्लीन होऊन गेलीं होतीं. आणि हंगारीच्या उद्धारासाठीं काय पाहिजे तें करण्याला ते उत्कंठित झालेले होते. सरदार लोक आपला मोठेपणा विसरून हलक्या लोकांशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागण्याला एका पायावर तयार झाले होते. स्वदेशभक्तीच्या स्फूर्तीनें ह्या सर्व गोष्टी घडून आलेल्या होत्या खऱ्या; परंतु लढाईचें शिक्षण नसल्यामुळें प्रथमतः हंगेरियन लोकांचा पक्ष बराच कमजोर होता. ऑस्ट्रियाचे सर्व शिपाई आपल्या कामांत वाकबगार आणि हंगेरीचे देशाभिमानानें एकत्र गोळा केलेले तरुण पुरुष नवशिके, अशी स्थिति होती. परंतु ह्या स्थितींतही कोसूथ याच्या परिश्रमानें आणि जॉर्ज याच्या शौर्यानें हंगेरियन पक्षाला पुष्कळ जय आला. जॉर्ज यानें ऑस्ट्रियन सैन्यामध्यें फार थोडे दिवसपर्यंत लेफ्टेनेंटचें काम केलें होतें. व नंतर तो एका खेडेगांवांत आपल्या घरीं स्वस्थ बसलेला होता पण आपल्या देशावर संकट आलें आहे ही गोष्ट जेव्हां त्याला कळली त्या वेळेस तो पुढें आला व हंगारीच्या सैन्या-मध्यें त्यानें प्रथमतः नोकरी धरली. परंतु पुढें जार्ज यानें लढाईमध्यें फारच विलक्षण बुद्धि आणि करामत दाखविली. हंगेरियन लोकांच्या ताब्यांत हंगारी-मधील सर्व किल्ले होते त्यामुळें त्यांना लढाई सुरू होतांक्षणींच त्या किल्ल्यांतून ऑस्ट्रियानें सांठवून ठेविलेली लढाईची सामुग्री मिळाली. व शिवाय व्हाएना-मधील बंडवाल्या लोकांची हंगेरियन लोकांना मदत मिळण्याची पुष्कळ आशा होती लढाई सुरू होण्याच्यापूर्वीं सैन्य उभारण्यासाठीं कोसूथ यानें फार खटपट केली. झेलॅचीच हा ड्रेव्ह नदी उतरून आपल्या देशावर स्वारी करून आला आहे ही बातमी कळतांक्षणींच सत्तर हजार लोकांचीं पलटणें नवीन उभीं केल्यावांचून मी परत येणारच नाहीं, अशी प्रतिज्ञा करून कोसूथ पेस्थ येथें ताबडतोब निघून गेला व त्यानें आपली प्रतिज्ञा खरी केली. देशाभिमानाच्या ज्वाळेनें सर्व हंगेरियन लोकांचीं अंतःकरणें आधींच पेटून गेलेलीं होतीं, आणि त्याजवर कोसूथच्या उत्तेजनपर आणि ज्वालाग्राही भाषणाचें तेल पडल्यामुळें तर त्या स्वदेशाभिमानाचा अग्नि जास्तच [illegible]

लढण्याला तयार झाले. आम्ही आपल्या देशाचें संरक्षण करण्याला तयार आहों, आम्हांला हत्यारें द्या, असें म्हणत थोडक्याच दिवसांमध्यें एकंदर तीन लक्ष लोक पुढें आले. आणि त्यांपैकीं एक लक्ष लोक तावडतोब चाकरीस ठेवण्यांत आले.

अशा रीतीनें हंगेरियन लोकांनीं स्वदेशसंरक्षणाची हं हं म्हणतां तयारी केली. तिकडे ऑस्ट्रियाचा सेनापति झेलॅचीच हा ड्रेव्ह नदी उतरून हंगारीमध्यें आलेलाच होता. तेव्हां लढाईला लागलीच सुरुवात झाली. ऑस्ट्रियाचें सैन्य मोठें होतें. त्यांतील शिपाई लढाईच्या कामांत वाकबगार होते. आणि झेलॅचीच हा अतिशय शूर शिपाई होता. परंतु कर्मधर्मसंयोग असा झाला कीं, इतकी सामग्री असूनही झेलॅचीच यानें आपल्या सैन्याच्या ज्या कांहीं लहान लहान तुकड्या करून निरनिराळ्या ठिकाणीं पाठविल्या होत्या त्या सगळ्यांचा हंगेरियन लोकांनीं पराभव केला. त्यामुळें हंगेरियन सैन्यांतील शिपायांना जास्तच उत्तेजन आलें. इकडे झेलॅचीच याचें मुख्य सैन्य हळूहळू कूच करीत पेस्थ शहरावर चालून येत होतें. पण आतां हंगारीचें काम दिरंगाईवर टाकून उपयोगाचें नाहीं असें ऑस्ट्रियन सरकारला वाटून हंगारीमध्यें ऑस्ट्रियाचें निरनिराळ्या ठिकाणीं जें सैन्य पसरलें होतें त्या एकंदर सैन्यावर काउंट लॅंबर्ग यांचा कमॅंडर-इन्-चीफ म्हणून सप्टेंबर महिन्यांत नेमणूक करण्यांत आली. व काउंट लॅंबर्ग याला हुकूम मिळाल्याबरोबर त्यानें आपल्याबरोबर कांहीं एक सैन्य वगैरे न घेतां तो एकटाच पेस्थ येथें जाण्याकरितां निघाला. ही बातमी कोसूथला कळल्याबरोबर त्यानें दुसरा एक उलट जाहीरनामा तावडतोब प्रसिद्ध केला. पूर्वीं झालेल्या कराराप्रमाणें असें ठरलें होतें कीं, ऑस्ट्रियाच्या बादशहानें हंगारीसंबंधानें कोणताही हुकूम देणें झालें तर त्यावर हंगारीमधील मुख्य प्रधानाची सही झालीच पाहिजे तरच त्या हुकुमाचा अंमल हंगेरियन लोकांवर चालावा, नाहीं तर चालू नये. काउंट लॅंबर्ग यांच्या नेमणुकीच्या ठरावावर हंगेरियाच्या प्रधानाची सही नव्हती; सबब कोसूथनें आपल्या जाहीरनाम्यानें असें फर्माविलें कीं, काउंट लॅंबर्ग यांची नेमणूक बेकायदेशीर आहे. आणि सबब काउंट लॅंबर्ग यांचा हुकूम हंगारीमध्यें कोणीही ऐकण्याचें कारण नाहीं. आणि असें असून जर कोणी काउंट लॅंबर्ग यांच्या हुकुमाप्रमाणें चालेल तर तो देशद्रोहाच्या गुन्ह्याला पात्र होईल. अशा प्रकारच्या जाहीरनाम्यानें काउंट लॅंबर्ग यांचें [illegible]

स्वागत करण्याकरितां लोकांचीं मनें तयार होऊन राहिल्यानंतर अखेरीस काउंट लँबर्ग हे पेस्थ येथें येऊन पोंहोंचले. परंतु त्या वेळीं पेस्थ शहराची स्थिति फारच भयंकर होऊन गेलेली होती. सर्व लोकांचीं मनें अतिशय खवळून गेलेलीं असून पेस्थमधील चारी बाजूचे रस्ते उच्छृंखळ आणि बेफाम झालेल्या स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं गच्च भरून गेलेले होते तरी पण रस्त्यानें येतांना काउंट लँबर्ग यांना धक्का पोंचला नाहीं व ते सुरक्षितपणें आपल्या ठिकाणीं येऊन पोंचले. तेथें लोकांचा गलबला जास्त जास्त मोठ्यानें ऐकूं येत असलेला पाहून त्यांनीं आपल्या हाताखालील हंगेरियन अधिकाऱ्याला हें काय आहे म्हणून विचारिलें; तेव्हां लोक आपल्या भेटीला येत आहेत असें त्यांनीं सांगितलें. त्यानंतर आपल्या नेमणुकीबद्दल राजाचा जो हुकूम होता त्यावर हंगारीच्या प्रधानाची सही घेण्याकरितां काउंट लँबर्ग हे निघाले, व तुम्ही माझ्याबरोबर चला असें त्यांनीं आपल्या हाताखालील अधिकाऱ्याला सांगितलें. तो कांहीं वेळपर्यंत त्यांच्याबरोबर गेला. पण कांहीं अन्तरावर गेल्यावर काउंट लँबर्ग यांना एकटेच सोडून तो निघून गेला व काउंट लँबर्ग हे तसेच एकटे रस्त्यानें पुढें जाऊं लागले. रस्ते लोकांच्या गर्दीनें भरून गेलेले होते. आणि काऊंट लँबर्ग यांच्याबद्दल लोकांचीं मनें अतिशय खवळून गेलेलीं होतीं. व लँबर्गला मारा अशा आरोळ्या चोहोंकडून ऐकूं येत होत्या. अशा स्थितींत कोणी एक तरुण मनुष्य एका गाडीच्या माथ्यावर चढून तेथून आपल्या जवळच्या लोकांना उद्देशून मोठ्यानें ओरडून म्हणाला. " नागरिक हो, लँबर्ग आज आपल्या येथें कशाला आला आहे हें तुम्ही समजलां काय ? आपल्या राष्ट्रीयत्वाचा नाश करून आपणा सगळ्यांना ऑस्ट्रियाच्या जुलुमामध्यें बुडविण्याकरितां तो आला आहे. आपण आपल्या देशाचीं जीं यशस्वी निशाणें उभारलीं आहेत तीं खालीं पाडून त्यांच्या जागीं ऑस्ट्रियाचीं तिरस्करणीय निशाणें उभीं करण्याकरितां तो आला आहे. हंगेरियन लोकांच्या रक्तामध्यें ज्या देशाभिमानाचा संचार झालेला आहे तो देशाभिमान पूर्णपणें लयाला नेण्यासाठीं तो आलेला आहे. आणि आपल्या हातामध्यें गुलामगिरीच्या बिड्या ठोकण्यासाठीं तो आला आहे. नागरिक हो, अशी ही मोठी आणीबाणीची वेळ येऊन ठेपली आहे. ह्या वेळीं आपण स्वतंत्रता आणि गुलामगिरी ह्यांपैकीं काय पसंत करावयाचें हें ठरवून

त्याप्रमाणें वागलें पाहिजे." हे शब्द उच्चारून झाले नाहींत तोंच चोहोंकडून लँबर्गला मारा असे आवाज ऐकूं येऊं लागले व नंतर एकच गर्दी उसळली. सर्व लोक लँबर्गच्या अंगावर धांवून गेले. तेव्हां त्याचा जीव वांचविण्यासाठीं कित्येकांनीं प्रयत्न केले, परंतु ते सर्व निष्फळ झाले. आणि अखेरीस दंडुक्यांचे ठोसे आणि कोयत्यांचे घाव यांच्या योगानें काउंट लँबर्ग ह्यांचा अंत झाला. लोकांना इतका त्वेष आलेला होता कीं, मरणानंतर लँबर्गचें शरीर पाहतां त्याला बेचाळीस जखमा लागलेल्या होत्या. त्याच्या अंगावरील कपडे फाटून चिंध्या झाल्या होत्या. व ज्यांनीं त्याचा वध केला त्यांनीं त्या चिंध्या आपल्या जयाची खूण म्हणून आपसांत वांटून घेतल्या. नंतर त्याच्या गळ्याला एक दोरी बांधून त्याचें प्रेत पेस्थच्या रस्त्यांतून ओढीत नेण्यांत आलें. त्या वेळीं तेथें पंधरा हजारांवर लोकांची गर्दी जमलेली होती; व प्रत्येकाच्या तोंडांतून आवेशाच्या भयंकर आरोळ्या जिकडे तिकडे ऐकूं येत होत्या. पंधरा हजार लोकांनीं रस्त्यांत हें कृत्य केलें. परंतु त्याचा निषेध पेस्थ येथील कौन्सिलच्या लोकांपैकीं कोणीही केला नाहीं त्यामुळें ह्या कृत्याला विशेषच भयंकर स्वरूप आलें. काउंट लँबर्ग यांच्या मरणाची बातमी ऑस्ट्रियाच्या बादशहाला कळल्याबरोबर त्याला फारच राग आला व हंगेरियन लोकांना त्यानें पूर्वी जे कांहीं हक्क दिले होते ते सर्व रद्द करून टाकून व हंगारीच्या मोहिमेवर झेलॅचीच याची कमांडर-इन-चीफचे जागीं नेमणूक करून लढाईला जारीनें सुरवात केली. ऑस्ट्रियन सरकारच्या ह्या त्वेषाला हंगेरियन लोकांच्या स्वदेशाभिमानानें कसें तोंड दिलें व जुलूम आणि स्वतंत्रता यांच्या झगड्यामध्यें स्वतंत्रतेनें कसें वर डोकें काढलें ह्याच्याबद्दलच्या मनोवेधक आणि बोधप्रद हकीकतीकडे आपण पुढील खेपेस वळूं.

---

# पिकाची पाहणी.

## सर्वे नंबर २

## पोट नंबर २

ऑस्ट्रियाच्या बादशहानें झेलॅचीच याला हंगेरींतील कमांडर-इन-चीफ नेमिल्याबद्दल मागील अंकीं सांगितलेंच आहे. बादशहाचा हा हुकूम प्रसिद्ध झाला नाहीं तोंच कोसूथनें दुसरा एक उलट जाहीरनामा प्रसिद्ध केला व त्यांत हंगारी हा देश स्वतंत्र झाला आहे, आणि त्या देशांत झेलॅचीच हा जर सैन्य घेऊन आला, तर तो ह्या देशाच्या कायद्याप्रमाणें गुन्हेगार आणि देशद्रोही म्हणून समजला जाईल, असें जाहीर करण्यांत आलें. कोसूथच्या या जाहीरनाम्यानें हंगेरियन लोकांना अतिशयच आनंद झाला. आणि त्यांतच झेलॅचीच याच्या सैन्याचा एके ठिकाणीं पराभव झाल्याची बातमी येऊन पोंचल्यामुळें तर तो आनंद गगनांतही मावेनासा झाला. यानंतर थोड्याच दिवसांनीं ऑस्ट्रियन लोकांचें सहा हजार सैन्य आणि बारा तोफा हंगेरियन लोकांनीं पकडल्या. हंगेरियन लोकांच्या पक्षाला अशा प्रकारचें यश येऊं लागलेलें पाहून झेलॅचीच याला कुमक पाठविणें फार जरूरीचें आहे, असें व्हाएना येथील दरबारला वाटूं लागलें. परंतु ह्या वेळीं ऑस्ट्रियन साम्राज्य मोडून टाकण्यासाठीं त्याच्या पोटांतील देश चोहोंकडून एकदम उठले असल्यामुळें ऑस्ट्रियाचें सर्व सैन्य जिकडे तिकडे गुंतून राहिलें होतें. त्यामुळें व्हाएनाच्या दरबारांतील लष्करी खात्याचा प्रधान, काउंट लाटूर, याला हंगारीमध्यें मदतीसाठीं कोणतें सैन्य पाठवावें, हें कांहींच ठरवितां येईना. अखेरीस रिक्टर येथील पलटण पाठविण्याचा त्यानें निश्चय केला. ही पलटण व्हाएना शहरामध्यें एकसारखी चौदा वर्षेंपर्यंत राहिलेली होती, त्यामुळें तें शहर सोडून जाण्याचें त्या पलटणींतील लोकांच्या मोठें जिवावर आलें होतें पण ह्याशिवाय आणखीही एक महत्त्वाचें कारण होतें. चौदा वर्षें व्हाएना शहरांत राहिल्यामुळें व्हाएनामधील लोकांच्या मतांचा संस्कार ह्या पलटणींतील लोकांच्या मनावर पूर्णपणें झालेला होता. राज्यक्रांति करून आपण स्वतंत्र व्हावें, हें जसें व्हाएनामधील लोकांना त्या वेळीं वाटत

होतें, तसेंच त्या पलटणींतील लोकांनाही वाटत होतें. त्या पलटणीनें कूच करून निघण्याची तारीख ऑक्टोबर ६ ही ठरली होती. परंतु पलटणींतील लोक जाण्याला खुषी नव्हते, ही बातमी व्हाएनामधील लोकांना कळल्याबरोबर अतिशय आनंद झाला, व ही पलटण स्थिरली तर हिच्या साहाय्यानें व्हाएना येथील राज्यक्रांति घडवून आणून ऑस्ट्रियन साम्राज्याचे तुकडे तुकडे करून टाकण्यासाठीं उद्युक्त झालेल्या हंगेरियन लोकांना आपण पुष्कळ मदत करूं शकूं, अशी व्हाएना येथील रहिवाशांना आशा वाटूं लागली. पण काउंट लाटूर हा दृढनिश्चयी होता. व तो जिवंत आहे तोंपर्यंत, तो ह्या पलटणीला पाठविल्यावांचून राहणार नाहीं, अशी सर्वांना खात्री होती. म्हणून ता. ४ ऑक्टोबर रोजीं रात्रीं व्हाएनांतील गुप्त मंडळीच्या पुढाऱ्यांची एक सभा भरली, व त्यामध्यें लाटूर याला ठार मारण्याचा आणि फ्रान्समध्यें डँटन व रोबेस्पिअर यांनीं केलेल्या राज्यक्रांतीप्रमाणें व्हाएनामध्यें राज्यक्रांति करण्याचा निश्चय ठरला. रिक्टरच्या पलटणींतील लोक, कॉलेजांतील विद्यार्थी, राष्ट्रसंरक्षक पलटणींतील लोक वगैरे सव लोकांनीं मिळून व्हाएनामध्यें बंड सुरू करावें; आणि त्या गर्दीमध्यें कांहीं-जणांनीं काउंट लाटूरला गांठून ठार मारावें, असें ठरविण्यांत आलें. सदर पलटणीला बाहेर पाठवूं नये, अशाबद्दल काउंट लाटूरकडे पुष्कळ अर्ज पाठविण्यांत आले. परंतु तो आपला आग्रह सोडीना. त्यामुळें लोकांनीं लढण्याची तयारी चालविली. रिक्टरच्या पलटणीचा हुकूम रद्द केला नाहीं तर तुझ्या प्राणाला धक्का बसेल, अशा अर्थाचीं निनांवीं पत्रेंही काउंट लाटूरला धाडण्यांत आलीं होतीं. पण त्यांचाही उपयोग झाला नाहीं आणि ६ व्या तारखेला सकाळीं ती पलटण रेल्वे स्टेशनावर नेण्याकरितां बाहेर काढण्यांत आली. त्यांच्या भोंवतीं लोकांची अतिशय गर्दी जमलेली होती व आतां काय होतें, इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें होतें. कांहीं वेळ चालून एका पुलापाशीं आल्यानंतर पलटणींतील शिपायांनीं आम्ही याच्यापुढें पाऊल टाकणार नाहीं; असें सांगितलें आणि त्यांचे जे असंख्य देशबांधव त्यांच्या भोंवतीं गोळा झाले होते, त्यांच्यांत ते जाऊन मिसळले. या वेळीं "हंगारीचा जयजयकार असो," असा शब्द जिकडे तिकडे ऐकूं येत होता. अशा रीतीनें ही पलटण फितूर होऊन शहरामध्यें जिकडे तिकडे बंडाचा प्रादुर्भाव झाला, तेव्हां त्या पलटणींतील लोकांना दाबांत ठेवण्याकरितां पुष्कळ प्रयत्न करण्यांत आले. परंतु ते

सर्व व्यर्थ गेलें. जनरल ब्रेडी या नांवाच्या एका सेनापतीनें आपले लोक आणून या बंडाचा बीमोड करण्याचा प्रयत्न केला, परंतु आपल्या सैन्याला गोळीबार सुरू करण्याविषयीं तो हुकूम देत होता, इतक्यांत बंडवाल्यांपैकीं एकानें त्याला गोळी घालून खालीं पाडलें. अशा रीतीनें जय संपादून बंडवाले शिपाई, विद्यार्थी आणि इतर लोक शहरामध्यें घुसले. त्यांनीं शहरांत येणाऱ्या सर्व वाटांची नाकेबंदी केली. आणि रस्त्यांतून जिकडे तिकडे लांकडांचे मेढेकोट बांधून राजाच्या सैन्याला जाण्यायेण्याला प्रतिबंध होईल, अशा तजवीज केली. सर्व देवळांतून घंटानाद सुरू झाला एकंदर लढाईची व्यवस्था लावण्याकरितां एक कमिटी नमण्यांत आली व राजाच्या सैन्याशीं तोंड देण्याकरितां जारानें तयारी सुरू झाली. सर्व शहर बंडवाल्यांच्या ताब्यांत आलें होतें, आणि जर कोठें राजाचें सैन्य आंत आलेंच तर रस्त्यावरील मेढेकोटांनीं त्यांची गति कुंठित होई, आणि शेजारच्या घरांतील खिडक्यांतून होणाऱ्या गोळीबारानें त्याची अंगें भाजून जात असत. काउंट लाटूर हा जेथें होता, ती जागा खेराज करून बाकी सर्व शहर बंडवाल्यांच्या हस्तगत झालें, व अखेरीस ते काउंट लाटूरच्या मकाणाकडे वळले. त्या वेळीं काउंट लाटूरच्या येथें आतां पुढें काय करावें, याबद्दल विचार चालला होता. अखेरीस ते बंडवाले लोक काउंट लाटूरच्या घरामध्यें शिरले. त्यावेळीं राजाची मर्जी असेल तर मी राजीनामा देतों, असें तो म्हणाला. पण लोकाची तेवढ्यानें तृप्तता होईना. सर्व लोकांनीं त्याला वेढलें. त्याचे हाल हाल केले. हातोडे, कोयते, कुऱ्हाडी ह्यांच्या घावांनीं त्याला जर्जर केलें. अखेरीस त्याला एका दिव्याच्या खांबावर टांगून ठेविलें. तेथें त्याचें प्रेत चोवीस तासपर्यंत लोंबत राहिलें होतें. त्याच्या अंगावरील कातड्यांचे तुकडे तुकडे करून ज्यांनीं त्याला मारिलें होतें त्यांनीं आपल्या जयाची खूण म्हणून ते तुकडे आपसांत वांटून घेतले. हे कृत्य केल्यानंतर ती सुमारें पंधरा हजार बंडवाल्यांची टोळी व्हाएना येथील लढाईचीं हत्यारें व दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री ठेवण्याच्या ठिकाणाकडे वळली व थोड्याशा झटापटीनंतर तें ठिकाण तिच्या हस्तगत झालें. तेव्हां बंडवाले आंत शिरले व ज्याला जीं वाटलीं तीं शस्त्रें त्यांनीं उचलून घेतलीं. त्याच वेळीं व्हाएनामध्यें जी एक लोकांच्या वतीची प्रधानसभा होती, तिनें राजापासून ज्या ज्या मागण्या मागितल्या त्या सर्व राजानें कबूल केल्या अखेरीस त्यानीं व्हाएनामध्यें राजानें नवीन सैन्य बोलावूं

नये, कोणत्याही सेनापतींनीं आमच्याशिवाय दुसऱ्या कोणाचा हुकूम ऐकूं नये, आणि कोणत्याही रेल्वे कंपनीनें व्हाएनामध्यें नवीन सैन्य आणूं नये, असेंही राजापासून ठरवून घेतलें. राजाचा मान तितक्या स्थितीचा येऊन पोंहोचल्या-नंतर राजा आपण होऊनच मुकाट्यानें व्हाएना शहर सोडून ऑलमटझ येथें निघून गेला. तारीख ६ ऑक्टोबर रोजीं व्हाएना येथें ज्या गोष्टी घडून आल्या, त्यांची बातमी झेलॅचीच याला हंगारीमध्यें लागलीच कळली. तेव्हां त्यानें हंगेरियन लोकांपाशीं तह करून कांहीं दिवसपर्यंत तेथील लढाई बंद ठेविली. आणि आपलें सैन्य घेऊन तो १२ तारखेला व्हाएना शहरापुढें येऊन दाखल झाला. मूळ लढाई हंगारीमध्यें चालली होती. पण व्हाएनाच्या गादीसाठीं हंगारी देश जिंकावयाचा होता. आणि व्हाएनाचीच गादी डळमळूं लागली, तर हंगारीचा काय उपयोग असा विचार करून झेलॅचीच व्हाएना येथें आला. व्हाएना हें शहर बंडवाल्यांच्या ताब्यांत होतें, परंतु त्याच्याबाहेर राजाच्या सैन्याचा वेढा हळूहळू येऊन पडत होता. व बाहेरच्या सैन्याचा हल्ला आपल्या-वर येऊन आपण मिळविलेली स्वतंत्रता आपल्यापासून लवकरच जाईल, अशी आंतील लोकांना फार भीति वाटूं लागली. म्हणून त्यांनींही आंतून मोठ्या नेटानें तयारी चालविली होती. रस्त्यांतून मेढेकोट उभारण्याचीं कामें रात्रीचीं सुद्धां चालू होतीं. शिपाई लोक निजले तरी ते आपलीं हत्यारें आपणांपासून दूर ठेवीत नव्हते. मजूर लोक रात्रीचींही कामें करीत होते, आणि विद्यार्थी व कारागीर लोक त्यांच्याजवळ मशाली धरून उजेड दाखवीत होते. शहरांतील लोकनियुक्त सभांच्या बैठकी एकसारख्या चालू होत्या. व्हाएनामधील राज्यक्रांति करणाऱ्या ह्या लोकांना मदत करण्यासाठीं इतर देशांतीलही कित्येक लोक आले होते. पोलंडमधून जे पुष्कळ लोक आले होते, त्यांच्यापैकीं जनरल बेम हा सेनापति फारच हुषार होता. १८३१ सालीं पोलंड स्वतंत्र होण्यासाठीं जेव्हां प्रयत्न करीत होतें, तेव्हां तेथील लढाईमध्यें बेम हा फार प्रख्यातीला आला होता. त्याचा स्वभाव धाडशी, दृढनिश्चयी आणि संकट आलें असतां न डग-मगणारा असा होता. त्यानें या व्हाएना शहराच्या संरक्षणाच्या कामीं ह्या वेळीं फारच पराक्रम केला दुसरे दिवशीं सकाळीं राजाच्या जमा झालेल्या सैन्यांनीं शहरावर हल्ला करण्याला सुरुवात केली. त्या हल्ल्यांत राजाचें सैन्य फार निक-

रानें लढलें, व संध्याकाळपर्यंत शहराचा बहुतेक भाग त्यांच्या ताब्यांत आला. रात्रीं तर शहराचा देखावा फारच भयंकर दिसूं लागला शहरांत वीस-पंचवीस ठिकाणीं मोठ्या इमारती पेटून आगीचे लोळ आकाशांत चालले होते, त्या रात्रीं शहरांतील कोणाही इसमाचा डोळ्याला डोळा लागला नाहीं. जागोजागीं प्रेतांचे ढीग पडले होते, रक्ताचीं तळीं सांचलीं होतीं, आणि आगींत सांपडून जळालेल्या माणसांच्या दुर्गंधीनें सर्व हवा बिघडून गेली होती, आणि त्यांतूनच मधून मधून तोफांचे गोळे येऊन पडत होते. ठिकठिकाणीं बायकामुलें हीं रडत बसलेलीं दृष्टीस पडत होतीं. अशा स्थितींत रात्र जाऊन सकाळ झाली. आतां आपल्याला जय मिळत नाहीं, अशी शहरांतील लोकांची खात्री होऊन ते शत्रूच्या स्वाधीन होण्याच्या अगदीं बेतांत आले होते. ह्या प्रसंगीं हंगेरियन लोक आपल्या मदतीला येतील, आणि आपल्याला ह्या संकटांतून सोडवितील, अशी व्हाएना-मधील लोकांना फार आशा होती. व त्यासाठीं उंच मनोऱ्यांच्या शिखरांवर चढून हंगेरियन लोकांचें कोठें कांहीं चिन्ह दिसत आहे काय, हें जाणण्यासाठीं हंगेरीच्या दिशेकडे अनेक विद्यार्थी मोठ्या उत्सुकतेनें प्रत्येक क्षणीं पाहत होते. शत्रूंनीं सांगितलेल्या अटी कबूल करून व्हाएनांतील लोक आपल्या हातांतील शस्त्रें खालीं ठेवण्याच्या अगदीं बेतांत आले होते, इतक्यांत हंगारीच्या बाजूला धुराचे आणि धुळीचे लोट दुरून दिसूं लागले. त्यामुळें ह्या शरण जात असलेल्या लोकांना फिरून धीर आला, व 'हंगेरियन लोकांचा जयजयकार असो, ते आपल्या मदतीला येत आहेत, आतां निराश होऊं नका, आपआपलीं शस्त्रें फिरून हातांत घ्या,' असे शब्द जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागले व निराशेनें हातांतून खालीं ठेवलेलीं शस्त्रें व्हाएनामधील लोकांनीं मोठ्या आशेनें फिरून हातांत घेतलीं. परंतु ही आशा फार वेळ टिकली नाहीं. हंगेरियन लोकांचें पंचवीस हजार सैन्य व्हाएनाचा वेढा उठविण्याकरितां निघालें होतें; परंतु राजाच्या सैन्यांनीं वाटेंतच त्यांचा पराभव केला. या प्रसंगीं हंगेरियन सैन्य नुकतें उभारलेलें असल्यामुळें त्यांत पुष्कळ लोक नवशिके होते. त्यामुळें लढाईला सुरुवात होण्याबरोबर बहुतेक सैन्य भिऊन पळून जाऊं लागलें. खुद्द कोसूथ यानेंही या वेळीं पळ काढिला. तो सैन्यांतील शिपाई या नात्यानें सैन्याबरोबर नव्हता, व सैन्यांतील शिपाई नवीन चाकरीस ठेवलेले होते, या दृष्टीनें पाहिलें असतां ही गोष्ट क्षम्य आहे. त्यानंतर व्हाएनामधील लोकांना

कोणतीच आशा न उरल्यामुळें ते शत्रूच्या स्वाधीन झाले व नंतर राजाचे सैन्यानें शहरामध्यें प्रवेश केला.

ह्या प्रसंगीं व्हाएनाच्या लोकांना आणि हंगारीच्या लोकांना यश आलें असतें, तर ऑस्ट्रियन साम्राज्य खात्रीनें बुडालें असतें. परंतु तो प्रसंग टळला. व्हाएना शहरामध्यें शांतता झाली. परंतु हंगेरियन लोकांच्या मनामध्यें स्वातंत्र्य मिळविण्याविषयीं जी आग पेटलेली होती, ती मात्र शांत झाली नाहीं. त्यामुळें १८४८ सालच्या डिसेंबर महिन्यांत लढाईला फिरून सुरुवात झाली. हंगेरियन लोकांचें मुख्य शहर पेस्थ ह्याजवर चाल करून जावें असा ऑस्ट्रियन सैन्यावरील त्या वेळचा मुख्य सेनापति, वुइंडिशग्रॅट्झ, याचा बेत होता. हंगेरियन लोकांचा सेनापति जॉर्जे ह्याचें असें मत होतें कीं, आपण पेस्थ शहराचें संरक्षण करीत न बसतां तें सोडून द्यावें, आणि मध्यें हंगारीमध्यें जाऊन तेथून शत्रूपाशीं गनिमी काव्यानें लढावें; परंतु कोसूथला ही गोष्ट मान्य झाली नाहीं. ऑस्ट्रियन सैन्य चाल करून येऊं लागल्यापासून त्यांच्या वाटेवरील एकेक शहर त्यांच्या हस्तगत होऊं लागलें. व आतां मात्र आपल्याला पेस्थ येथें राहतां येणें अशक्य आहे, असें दिसून आल्यावरून कोसूथनें तें शहर सोडून दिलें, आणि थीस नदीच्या पलीकडील किनाऱ्यावरील डेब्रेक्झिन हें आपल्या राजधानीचें त्यानें मुख्य शहर केलें. वुइंडिशग्रॅट्झ हा पेस्थ शहरासमोर जानेवारी महिन्याच्या चौथ्या तारखेला जाऊन दाखल झाला, आणि त्या शहरावर हल्ला करण्याची तयारी करूं लागला. पण इतक्यांत त्याला कळून आलें कीं शहरांत कोणी नाहीं. शहरांतील कागदपत्र आणि सर्व खजिना घेऊन कोसूथ आधींच निघून गेला आहे. असें कळून आल्यानंतर वुइंडिशग्रॅट्झ याचा बराच हिरमोड झाला. कोसूथ याची आपल्या देशाच्या मुख्य राजधानीवर अतिशय प्रीति होती, व ती राजधानी सोडून जाण्याचें त्याच्या मोठें जिवावर आलें होतें, तरी पण निरुपायास्तव त्याला ती गोष्ट करणें भाग पडलें. त्यानें पेस्थ शहर १८४८ च्या डिसेंबर महिन्याच्या ३१ व्या तारखेला मध्यरात्रीं सोडिलें. त्या वेळची एक गोष्ट फार विलक्षण आहे. तिच्यावरून आपला देश स्वतंत्र व्हावा ह्याबद्दल कोसूथला किती उत्सुकता होती, हें चांगलें दिसून येतें. कोसूथनें पेस्थ शहर सोडिलें त्या वेळीं हंगारीची स्वतंत्रता कायम झालेली नव्हती, तरी पण डिसेंबर महिन्याच्या ३१ व्या

तारखेला मध्यरात्रीनंतर सुरू होणाऱ्या नवीन वर्षामध्यें आपला देश स्वतंत्र झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी कोसूथला पक्की खात्री वाटत होती. त्यामुळें त्या रात्रीं पेस्थ शहर सोडून निघण्याची जरी सर्व तयारी झाली होती, तरी मध्यरात्र उलटून जाईपर्यंत कोसूथ पेस्थमध्यें मुद्दाम थांबून राहिला होता. मध्यरात्रीचा सुमार झाला. बारा वाजले. बारा वाजून पांच मिनिटें होऊन गेलीं. नवीन वर्षाला सुरुवात झाली. तें हंगारीच्या भावी स्वतंत्रतेचें पहिलें वर्ष होतें. आपल्या भावी स्वतंत्रतेची सुंदर इमारत आपल्या कल्पनादृष्टीनें पाहण्यामध्यें निमग्न झालेल्या कोसूथला तो क्षण अतिशय आनंदाचा होता. त्या आनंदाच्या भरांत आपल्या स्वतंत्रतेच्या पहिल्या वर्षाच्या अभिनंदनार्थ कोसूथनें दारूचा एक पेला घेतला, आणि मग कोसूथ पेस्थ शहर सोडून निघाला. कोसूथनें ओसाड करून ठेवलेल्या पेस्थ शहरामध्यें पुढें थोडक्याच दिवसांनीं वुइंडिश-ग्रॅट्झ ह्यानें मोठ्या थाटानें प्रवेश केला.

पेस्थ शहर सोडून डेब्रेक्झिन येथें आपलें राजधानीचें ठिकाण केल्या-नंतर कोसूथ आणि त्याचे साथीदार स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं आपल्या सैन्याची स्थिति सुधारण्याकरितां भगीरथप्रयत्न चालविले. कोसूथचीं भाषणें आणि कृत्यें ह्यांच्या योगानें ह्या वेळीं हंगारीच्या पक्षाला फार फायदा झाला. हंगारीच्या नांवानें कोसूथनें कागदी नोटा सुरू केल्या. ह्या सर्व हंगारीभर चालत असल्यामुळें ह्या नोटा देऊन कोसूथला लढाईला लागतील तितके पैसे गोळा करतां आले. पूर्वीं ऑस्ट्रियाच्या नोटा हंगारीमध्यें सर्व लोक वापरीत असत; त्या हंगेरियन लोकांनीं इतःपर वापरूं नयेत, त्यांच्याबद्दल कोणी पैसे देणार नाहीं, असें कोसूथनें ठरविलें. त्यामुळें ऑस्ट्रियाला पैशाचा तोटा पडूं लागला. परंतु ऑस्ट्रियन सरकार जर हंगारीच्या नोटा घेईल तर त्याच्या मोबदल्यांत आपण ऑस्ट्रियाच्या नोटा घेऊं, असें कोसूथनें जाहीर केलें होतें. ह्या युक्तीनें कोसूथचा फार फायदा झाला. कारण हंगारीच्या नोटा परदेशांत चालण्या-सारख्या नव्हत्या, म्हणून त्या बदलून त्यांच्या ऐवजीं कोसूथ ऑस्ट्रियाच्या घेऊं लागला. आणि त्या योगानें ऑस्ट्रियाच्या नोटांवर कोसूथला इंग्लंडमध्यें आणि बेल्जममध्यें हत्यारें आणि दारूगोळा लागेल तितका घेण्याची सवड सांपडली. शिवाय खुद्द हंगारीमध्यें हत्यारें आणि दारूगोळा तयार करण्याचे जे कारखाने होते ते कोसूथनें रात्रंदिवस एकसारखे चालू ठेविले होते. ह्याशिवाय

हंगेरियन लोकांना उत्तेजन येईल अशा उदात्त भाषेमध्यें लिहिलेले जाहीरनामे कोसूथ वरच्यावर प्रसिद्ध करीत होता. तुमचें राष्ट्रीयत्व कायम राखण्यासाठीं तुम्हीं झटलें पाहिजे; तुम्हांला आपल्या स्वातंत्र्याची कळकळ असली पाहिजे; तुमचे पूर्वज फार मोठे होते, आणि त्यांचीं पराक्रमाचीं कृत्यें फार विलक्षण होतीं, अशा अनेक गोष्टींचे आपल्या जाहीरनाम्यांत उल्लेख करून ते अगदीं लोकांच्या मनाला जाऊन झोंबतील अशी कोसूथ नेहमीं तजवीज करीत असे. देशांत जे कोणी राजनिष्ठ लोक होते, त्यांना आपल्या पक्षाला वळवून घेण्याकरितां ही राजासाठींच लढाई चालली आहे, असें सांगण्यांत येत असे. आणि ज्यांना स्वतंत्रतेची आवड होती, अशा लोकांना आपल्या पक्षाकडे वळविण्याकरितां ही लढाई लोकसत्तात्मक राज्यपद्धति स्थापन करण्याकरितां आहे, असें सांगण्यांत येई. व हंगेरियन सैन्याची थोडीशी सरशी झाली असली, तरीदेखील तो एक मोठा जय मिळाला आहे, असें सांगण्यांत येई. सारांश, मर्दुमकीचीं कामें करण्याला जेणेंकरून उमेद आणि हुरूप येईल, असे सर्व उपाय त्या वेळीं कोसूथकडून योजण्यांत येत असत. ह्या सगळ्या खटपटीचा फारच चांगला परिणाम झाला. हंगारी देशांत लढवय्येपणा, शूरपणा आणि मर्दुमकी हीं जीं आजपर्यंत झोंप घेत पडलीं होतीं, तीं ह्या उपायांनीं खडबडून जागीं झालीं. ठिकठिकाणीं हत्यारबंद लोकांच्या टोळ्या तयार झाल्या. तुर्की लोकांचें रक्त पिऊन जीं हत्यारें सांधीकोंदींतून अनेक वर्षें गंज खात पडलीं होतीं, तीं फिरून एकदां बाहेर निघालीं. आणि हंगेरियन लोकांवर व त्यांच्या शस्त्रांवर कैक वर्षांचा जो मळ सांचला होता तो निघून दोघांच्याही ठिकाणीं एक प्रकारची नवीन सतेजता दिसूं लागली. आणि आपल्या स्वतंत्रतेसाठीं येथून तेथून सर्व देश लढण्याला तयार झाला.

हंगेरियन लोकांमध्यें स्वदेशभक्तीमुळें जें हें स्फुरण उत्पन्न झालें होतें, त्याच्या योगानें त्यांच्या हातून पुढील लढाईमध्यें फारच पराक्रमाचीं कामें झालीं. व इसासझेगच्या लढाईमध्यें हंगेरियन लोकांनीं राजाच्या सैन्याचा पुराच धींमोड करून टाकला. व तेथून त्यांनीं राजाच्या सैन्याला अशा रीतीनें वेढीत आणिलें कीं, त्यांच्या सेनापतीला बहुतेक हंगारीचा प्रदेश मोकळा सोडून ऑस्ट्रियाच्या सरहद्दीकडे वळणें भाग पडलें. हंगारीमध्यें हंगारीच्या शस्त्रांना हा जो जय आला, तो जॉर्जे याच्या शौर्याचें व शहाणपणाचें फळ होय. इकडे हंगारी-

मध्यें जॉर्जे ह्याप्रमाणें शत्रूवर जय मिळवीत असतां ट्रॅन्‌सिल्व्हेनियामध्यें पूर्वी सांगितलेला पोलंडमधील शूर योद्धा ज.बेम हा अद्‌भुत पराक्रमाचीं कामें करण्यांत गुंतला होता. ज० बेम ट्रॅन्‌सिल्व्हेनियामध्यें प्रथमत: एकटाच गेला, परंतु त्यानें आपल्या करामतीनें थोडक्याच दिवसांत तीस हजार सैन्य आपल्या सभोंवतीं गोळा केलें; व त्या सैन्याच्या साहाय्यानें त्यानें तेथील ऑस्ट्रियन सैन्याचा पूर्णपणें पराभव केला. ह्याप्रमाणें हंगारीचे शिपाई जिकडे तिकडे यशस्वी झालले आणि ऑस्ट्रियाचे शिपाई हंगारीच्या बाहेर हाकलून दिलेले पाहून आतां हंगारीच्या स्वतंत्रतेचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्याला कांहीं हरकत नाहीं, असें कोसूथला वाटूं लागलें. सेनापति जॉर्जे याचें मत या कामीं विरुद्ध होतें. त्याचें मन वळविण्याकरितां कोसूथनें त्याला असें सांगितलें कीं, आपल्या देशांतील लोक ऑस्ट्रियाच्या जुलुमाला अगदीं कंटाळून गेले आहेत. इसासझेग येथील विजयानें आपण स्वतंत्रतेला पात्र आहों, असें आपण जगाला दाखविलें आहे. मग आतां ऑस्ट्रियाच्या जोखडाखालीं आपल्या माना उगीच काय म्हणून अडकवून ठेवावयाच्या? आपण ह्या वेळी जो मार्ग स्वीकारूं त्याप्रमाणे युरोपांतील लोक आपली किंमत करतील. इंग्लंड, फ्रान्स, इटली, टर्की, जर्मनी हे सगळे देश आपण आपली स्वतंत्रता केव्हां जाहीर करितों, याची वाट पाहत बसले आहेत. आपण आपल्या राष्ट्राची स्वतंत्रता प्रसिद्ध केल्याबरोबर ते आपल्या मदतीला धांवून येतील. पोलंडमधील लोक जुलुमाखालीं चिरडून जात आहेत. व ऑस्ट्रिया आणि रशिया ह्यांच्या बळजबरीनें तुर्की लोक अगदीं त्रासून गेले आहेत. आणि आपण स्वतंत्र झालों तर पोलंडमधील लोक आणि टर्कीमधील लोक आपल्याला येऊन मिळतील. हंगारी देश जर आज स्वतंत्र झाला नाहीं, तर मग युरोपांतील दुसऱ्या कोणत्याही देशाला स्वतंत्र होण्याचें धारिष्ट करतां येणार नाहीं, म्हणून आपण पक्कें समजावें. परतु आपण जर स्वतंत्र झालों, तर युरोपांत जेथें जेथें जुलुमाखालीं चिरडले जाणारे लोक आहेत, तेथें तेथें त्या जुलमाविरुद्ध बंडें होऊन ते लोक स्वतंत्र झाल्यावांचून कधींही राहणार नाहींत. आपल्याला जय मिळाला आहे, तेव्हां आतां आपण तर स्वतंत्र होऊंच. परंतु आपण दुसऱ्यांच्याही स्वतंत्रतेकरितां उपयोगी पडलें पाहिजे. जुलुमाखालीं सांपडलेल्या सर्व लोकांना स्वतंत्रता देण्याची हिंमत आज आपल्यामध्यें आलेली आहे. त्या हिमतीच्या जोरावर, ही तुम्ही स्वतंत्र होण्याची वेळ आली आहे, अशी आपण सर्वत्र द्वाही

फिरविली पाहिजे. आपण एका जुलमी राजाच्या सैन्याचा पराभव केला आहे. परंतु लोकांच्या स्वतंत्रतेचा द्वेष करणारे राजे अनेक ठिकाणीं आहेत. ते ही आपली स्वतंत्रता नष्ट करण्यासाठीं कदाचित् एक होऊं लागतील, परंतु आपण त्यांना एक होऊं देतां कामा नये; व त्यासाठीं आपण स्वतंत्रता जाहीर करून आपला पक्ष बळकट करून घेतला पाहिजे. ह्याप्रमाणें विचार करून कोसूथनें हंगारी देश स्वतंत्र झाल्याबद्दलचा जाहीरनामा १८४९ च्या एप्रिल महिन्याच्या १४ व्या तारखेला प्रसिद्ध केला. ह्या जाहीरनाम्यांत असें नमूद करण्यांत आलें होतें कीं, ऑस्ट्रियाच्या राजानें हंगारीला वाईट रीतीनें वागवून तेथील लोकांवर शस्त्र धरल्यामुळें हंगारीच्या मुलुखावर राज्य करण्याचा त्या राजाला इतःपर बिलकुल हक्क राहिला नाहीं; व त्या राजघराण्यांतील सर्व लोकांना या देशांतून हद्दपार करण्यांत आलें आहे; हंगारी हा देश स्वतंत्र झालेला आहे; व कोसूथ हा सर्व लोकांच्या संमतीनें येथील गव्हर्नर झालेला आहे. हा जाहीरनामा हंगारींतील प्रत्येक शहरांतून आणि खेड्यापाड्यांतून प्रसिद्धपणें वाचण्यांत आला आणि ह्याप्रमाणें सर्व सुधारलेल्या जगाला साक्षी ठेवून हंगारीनें आपली स्वतंत्रता जाहीर केली.

ह्याप्रमाणें फ्रान्सच्या राज्यक्रांतीचा हंगारीवर परिणाम झाला. आतां हें खरें आहे कीं, दुर्दैवानें हंगारीची ही स्वतंत्रता फार दिवस टिकला नाही. तरी पण लोकांच्या अंगामध्यें स्वतंत्रतेचें जें एक प्रकारचें तेज यावयाचें तें ह्या योगानें येऊन गेलें यांत संशय नाहीं अतिशय अभ्यास करणाराही विद्यार्थी एखादे वेळीं परीक्षेंत नापास होतो. अशा ठिकाणीं परीक्षा पास होणें किंवा नापास होणें हा प्रश्न अगदीं गौण आहे तो विद्यार्थी नापास झाला तरी चांगल्या अभ्यासाच्या योगानें त्याच्या मनावर झालेले सुपरिणाम परीक्षेंतील सर्टिफिकिटाच्या उणीवेमुळें कमी होण्याचा संभव जसा नाहीं, तद्वतच हंगारीची गोष्ट होय. ज्या लोकांनीं आपल्या स्वतंत्रतेची मजल येथपर्यंत आणून पोंचविली, त्यांचें कांहीं दिवसांनीं स्वातंत्र्य गेलें, आणि कोणी राजा त्यांच्या डोक्यावर येऊन बसला, तरी तो राजा अशा लोकांना सदोदित भीतच असला पाहिजे. आणि लोकांचा राजावर इतका वचक बसलेला असला म्हणजे मग त्यांचें सुख स्वतंत्र लोकांच्या सुखाहून फारसें कमी असेल, असें कधींही व्हावयाचें नाहीं. ऑस्ट्रियाचा हंगारीनें वर सांगितल्याप्रमाणें पराभव केल्यानंतर ऑस्ट्रियाची फारच

दीनावस्था झाली. व ऑस्ट्रियाला रशियापाशीं मदत मागणें भाग पडलें. हंगारीच्या राज्यक्रांतींत रशियाच्या अमलांतील पोलंडमधील पुष्कळ लोक सामील झालेले होते व हंगारीचें उदाहरण पाहून पोलंडही आपल्यापासून असेंच स्वतंत्र होईल अशी रशियाला भीति होती. म्हणून या स्वतंत्रतेचा ओघ बंद करण्याकरितां रशियानें आपलें सैन्य हंगारीमध्यें पाठविलें. ऑस्ट्रिया आणि रशिया यांच्या संयुक्त सैन्यापुढें हंगारीचा निभाव लागेना. जॉर्जे आणि बेम यांचे बऱ्याच लढायांतून पराभव झाले. कोसूथला आपल्या जागेचा राजीनामा देणें भाग पडलें. जॉर्जे रशियन सेनापतीच्या स्वाधीन झाला व हंगेरियन लोकांनीं आपल्या हातांतील शस्त्रें खालीं ठेविलीं. ज. बेम हा मात्र शरण जाण्याच्या विरुद्ध होता. तो म्हणाला : जोपर्यंत माझ्या हातामध्यें एक इंचभर तरी पोलादाचा तुकडा आहे आणि जोंपर्यंत माझ्याबरोबर शत्रूशी लढण्याकरितां एक तरी शूर शिपाई शिल्लक आहे, तोंपर्यंत मी लढल्यावांचून कधींही राहणार नाहीं असें म्हणून तो डोंगरी मुलखांत निघून गेला, व तेथें त्यानें बरेंच सैन्य जमा केलें परंतु त्याचाही कांही उपयोग झाला नाहीं व हंगारीला अखेरीस ऑस्ट्रियाच्या अमलाखालीं फिरून राहणें भाग पडलें. कोसूथ टर्कीमध्यें पळून गेला व तेथें तो सुमारें दोन वर्षें कैदेंत पडला होता. कैदेंत असतांना कोसूथनें शेक्सपीयरचीं नाटकें वाचून इंग्रजी भाषेचा अभ्यास केला व तेथून त्याची सुटका झाल्यानंतर १८५१ सालीं तो इंग्लंडमध्यें गेला. कोसूथ हा आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं झटत होता, म्हणून इंग्लिश लोकांना तो अतिशय प्रिय झाला व त्याचीं व्याख्यानें ऐकण्याकरितां इंग्लिश लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमूं लागल्या. त्याची भाषासरणी मोहक आणि वक्तृत्वशक्ति आवेशयुक्त असे. हंगेरीच्या स्वतंत्रतेबद्दलचीं त्याचीं भाषणें ऐकून इंग्लिश लोक अगदीं वेडे होऊन गेले होते. कोसूथ आपला उजवा हात आपल्या श्रोत्यांच्या पुढें करून " ऑस्ट्रियन साम्राज्याच्या बादशाहाची गादी एके वेळीं ह्या हातामध्यें होती " असें सांगत असे. तें ऐकून दुर्दैवाच्या घडामोडींची स्पष्ट कल्पना डोळ्यांपुढें उभी राहून ज्याच्या नेत्रांतून अश्रु आले नाहींत, असा त्या श्रोतृसमाजामध्यें एकही मनुष्य नसेल. इंग्लिश लोक आपल्या देशाची स्वतंत्रता परत मिळवून देण्याला आपल्याला कांहीं तरी मदत करतील, अशी कोसूथला फार आशा होती. परंतु इंग्लिश लोकांनीं कोसूथचीं मनोहर भाषणें ऐकण्यापलीकडे कांहीं एक केलें नाहीं. आणि

हंगारीच्या स्वातंत्र्याची आशा तेव्हांपासून नष्ट झाली. असा जरी त्या वेळेपुरता परिणाम झाला, तरी त्या वेळीं हंगेरियन लोकांनीं स्वतंत्रतेकरितां केलेले श्रम वाया गेले नाहींत. ह्या जगांत कांहीं एक वांया जात नाहीं ! त्यांच्या श्रमाचें फळ त्यांना पुढें लवकरच मिळालें. हंगारी देश त्या वेळीं स्वतंत्र झाला नाहीं हें खरें, तरी पण आज तो आयर्लंड किंवा हिंदुस्थान नाहीं. कोसूथचें वक्तृत्व आणि स्वदेशाभिमान, जॉर्जेचा शहाणपणा आणि शूरपणा आणि ज. बेम याचा हुरूप आणि पराक्रम यांना दुर्दैवानें ताबडतोब फळें आलीं नाहींत; तरी पण त्यांनीं लावलेला वृक्ष फार दिवस वांझ राहिला नाहीं. सन १८६७ मध्यें त्यांना फिरून पूर्वीचे सर्व राजकीय हक्क मिळाले. त्यांची हल्लीं स्वतःची पार्लमेंट आहे. आणि मनुष्याच्या सुखाला आणि राजाचा जुलूम दाबांत ठेवण्याला जितकी स्वतंत्रता जरूर आहे, तितक्या स्वतत्रतेचा हंगेरियन लोक आज उपभोग घेत आहेत.

---

# पिकाची पाहणी

## सर्व्हे नंबर ३

फ्रान्समधील राज्यक्रांतीचे हंगारी देशावर काय परिणाम झाले याबद्दलचें वर्णन मागील अंकीं समाप्त झालें. आतां आपण इटली देशाकडे वळूं. हा देश त्या वेळीं ऑस्ट्रियन साम्राज्याच्याच ताब्यांत होता. आणि लोकांच्या खुषीविरुद्ध अत्यंत जुलुमानें चालविलेल्या परकीय अमलाला लोकांनीं स्वभावतः जितकें नाखूष असावयाचें तितके इटॅलियन लोक ऑस्ट्रियन अमलाला नाखूष झालेले होते; व ह्या जुलमांतून आपण केव्हां सुटतों असें तेथील लोकांना होऊन गेलें होतें. कारबोनरी या नांवाखालीं मोडणाऱ्या अनेक गुप्त मंडळ्या तेथें स्थापन झालेल्या होत्या. परकीय अमलाचें दुःख काय आहे आणि स्वतंत्रतेमध्यें गोडी काय आहे या गोष्टी पूर्णपणें जाणणारे अनेक लोक ठिकाठिकाणीं

निर्माण झाले होते. लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची हौस सर्व लोकांच्या मनामध्यें उत्पन्न झाली होती. आणि परकीय लोकांचें निष्कासन, स्वतंत्रतेचें संस्थापन आणि लोकसत्तात्मक राज्याचा सुखानुभव हे पृथ्वीवरील अमृताचे झरे आपल्या स्वाधीन करून घेण्यासाठीं हातांत शस्त्रें घेण्यालाही अनेक लोक तयार झालेले होते. इटली देश हा स्वतःच आधीं फारसा मोठा आहे असें नाहीं. पण त्या लहानशा देशाचेंही त्या वेळेपर्यंत अनेक लहान लहान तुकडे झालेले होते. एका लहानशा देशांत अनेक लहान लहान संस्थानें, आणि त्यांच्यांतही एकविचार, एकजूट इत्यादिक अवश्य गोष्टींचा गंध नाहीं, अशी जोंपर्यंत आपली आणि आपल्या देशाची स्थिति आहे, तोंपर्यंत आपल्या देशांतून ऑस्ट्रियन लोक बाहेर घालविले जाणार नाहींत. ह्याकरितां सर्व इटली देश एक झाला पाहिजे हा विचार ज्याच्या त्याच्या मनामध्यें जागृत होऊन एकीबद्दलची उत्कंठा सर्व देशभर प्राबल्य पावलेली होती. मिलन्, व्हेनिस, रोम, जिनोआ, लेगहॉर्न, पालेर्मो वगैरे ठिकाणीं वर प्रदर्शित केलेल्या विचारांचा इतका प्रादुर्भाव झालेला होता कीं, फ्रान्समध्यें राज्यक्रांति होण्याच्या पूर्वींच वरील ठिकाणीं लोकांचे स्वातंत्र्यासाठीं बारीक सारीक दंगे झालेले होते. सारांश, इटलीमध्यें स्वतंत्रतेच्या पिकासाठीं जमीन आधींच नांगरून तयार झालेली होती. आणि त्यावर फ्रान्सच्या राज्यक्रांतीचा पाऊस अगदीं अपेक्षित वेळीं येऊन पडला आणि त्यामुळें सर्व इटॅलियन लोकांना परमानंद झाला. इटलींतील सर्व मोठमोठ्या घराण्यांतील लोक ऑस्ट्रियाच्या विरुद्ध झालेले होते. इटलींतील राज्यकारभाराच्या मोठमोठ्या महत्त्वाच्या ज्या जागा त्या वास्तविक या सरदारांना मिळावयाला पाहिजे होत्या. परंतु ऑस्ट्रियन सरकारनें तिकडे दुर्लक्ष करून त्या सर्व जागा ऑस्ट्रियन लोकांनाच देऊन टाकलेल्या होत्या. त्यामुळें सरदार लोकांमध्यें असंतोष उत्पन्न होणें अगदीं स्वाभाविक होतें. ह्याशिवाय इटलीमधील कारागीर लोक, शिक्षक, विद्यार्थी वगैरे अनेक धंद्यांच्या सामान्य लोकांमध्यें तर असंतोषाची वाढ अगदीं शिखराला जाऊन पोंचली होती. त्या वर्गांतील लोक बहुतेक पैसेवाले आणि ज्ञानसंपन्न होते. विद्येच्या आणि पैशाच्या योगानें आपण आपलें राज्य चालविण्याला समर्थ झालों असतां दुसऱ्यांनीं केवळ सैन्याच्या जोराचा आश्रय करून आपल्यावर राज्य करावें ही गोष्ट या लोकांना बिलकुल पसंत नव्हती; व त्यामुळें आपली स्वतंत्रता परत मिळविण्याची त्यांना

प्रबळ इच्छा झालेली होती. ह्याप्रमाणें बहुतेक लोकमत ऑस्ट्रियाच्या विरुद्ध झालेलें होतें. परंतु इटलीच्या लढाईमध्यें ऑस्ट्रियाच्या पक्षाला प्रथमतः मोठा धक्का बसण्याला दुसरें एक कारण झालें. ऑस्ट्रियन सरकारचा सेनापति, रॅडे-ट्स्की, याचे ताब्यांत असलेल्या अनेक पलटणींमध्यें मिळून सुमारें पंचवीस हजार इटॅलियन शिपाई होते. परंतु ऑस्ट्रियाशीं आपले देशबांधव आपल्या स्वातंत्र्याकरितां लढण्याला तयार झाले आहेत असें पाहिल्याबरोबर ते इटॅलियन शिपाई ऑस्ट्रियाची चाकरी सोडून स्वदेशसंरक्षणाकरितां सिद्ध झाले. अशा रीतीनें ऑस्ट्रियाचा पक्ष कमकुवत झाला असतांना जुलुमी राजांच्या गांज-णुकीच्या चोहोंकडून पेटलेल्या वणव्यानें करपून युरोपांतील परतंत्र राष्ट्ररूपी वृक्षवल्लीच्या ठिकाणीं स्वतंत्रतेची कोंवळी पालवी उत्पन्न करणारा प्रत्यक्ष वसंत-ऋतु फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या रूपानें अवतीर्ण झाल्याची बातमी ऐकून, लॉंबर्डीचें मुख्य शहर मिलन येथें प्रथमतः दंग्याला सुरवात झाली. पॅरिसमध्यें राज्यक्रांति झाली आणि व्हाएना शहर विद्यार्थ्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें, ह्या बातम्या ऐकल्यानंतर मिलनमधील स्वातंत्र्येच्छु लोकांमध्यें खळबळ उडून गेली. रॅडेट्स्कीपाशीं १८,००० लोक होते. त्यापैकीं १२,००० इटॅलियन शिपाई एकदम मिलनमधील स्वातंत्र्येच्छु लोकांच्या पक्षाला येऊन मिळाले. मिलनमधील दंगा एकंदर पांच दिवसपर्यंत चालला होता. त्यांत मिलनचे लोक फारच निकरानें लढले. त्या शहरांतील सर्व माणसांच्या मनामध्यें स्वदेशा-भिमानाचा इतका संचार झाला होता की, त्यांच्या बायकाही तेल तापवून शत्रूच्या अंगावर ओतण्यांत गुंतून गेल्या होत्या. पांचव्या दिवशीं शत्रूकडील दारूगोळा संपला आणि पाण्याची फार उणींव पडली. अशा स्थितींत आपल्या सभोंवतीं चोहोंकडे स्वातंत्र्येच्छु लोकांनीं बंडें सुरू केल्याच्या बातम्या सेनापति रॅडेट्स्की याच्या कानावर येऊन पोंचल्या. तेव्हां मिलन शहर शत्रूच्या हवालीं करून निघून जाणें त्याला भाग पडलें. ह्या जयामुळें मिलनच्या लोकांना अतिशय हर्ष झाला. ह्या वेळीं पॅरिस, व्हाएना, व्हेनिस, नेपल्स, सिसिली ह्या सर्व ठिकाणीं राजाच्या पक्षाचा पराभव होऊन स्वातंत्र्येच्छु लोकांच्याच पक्षाला यश आलेलें असल्यामुळें आतां राजाच्या जुलुमाचे दिवस सरले व हे स्वतंत्र-तेच्या सुखाचे दिवस आलेले आहेत आणि आतां लवकरच सर्व यूरोप खंडभर जिकडे तिकडे लोकसत्तात्मक राज्यें स्थापन होतील, असें मिलनमधील सगळ्या

लोकांना वाटूं लागलें. तेथें लागलीच तात्पुरतें एक लोकसत्तात्मक सरकार स्थापित झालें व लोकांना जास्त उत्तेजन येण्यासाठीं पुढील जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला : "आपण आपल्या शत्रूला पळवून लाविलें आहे, परंतु अजून आपल्याला त्रास दिल्यावांचून शत्रु राहणार नाहीं, म्हणून त्याच्या जवळचे सर्व शिपाई नाहींसे होईपर्यंत आपण हातांमध्यें जीं शस्त्रें घेतलीं आहेत तीं खालीं ठेवतां कामा नये. आपण असें करण्याविषयीं शपथ वाहिली आहे. आणि त्याप्रमाणें आपण कृति करून दाखविली पाहिजे व आपल्या देशाच्या स्वतंत्रतेची लढाई लढण्याकरितां आपण हातांत शस्त्रें घेऊन तयार झालें पाहिजे." ह्यानंतर व्हेरोना, मँच्युआ, पॅदुआ वगैरे सर्व ठिकाणीं बंडें सुरू झालीं. ह्या वेळीं इटलीमध्यें सर्व देशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारीं जीं लहान लहान शहरें आणि संस्थानें होतीं त्या सगळ्यांनीं मिळून इटॅलियन लीग या नांवाचें एक मंडळ स्थापन केलें व ह्या मंडळाचा मुख्य पुढारी चार्ल्स आल्बर्ट हा झाला. पीडमांट म्हणून जो एक इटलीचा भाग आहे तेथील हा राजा होता. ऑस्ट्रियाच्या विरुद्ध उठण्याला याचें स्वतःचें असें कांहीं एक कारण नव्हतें. परंतु स्वदेशाची स्वतंत्रता हें काय हलकें कारण आहे ? आपल्या दशांतील लोक स्वातंत्र्याकरितां लढण्याला तयार झाले आहेत असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां त्याला मोठा हर्ष होऊन परमेश्वराच्या मनांतच आतां आपल्या देशाला स्वतंत्र करावयाचें आहे असें वाटून तो इटॅलियन लीगचा पुढारी झाला. ह्या वेळीं तो अगदीं तारुण्याच्या भरामध्यें होता. त्याचा पूर्वीं-पासून स्वतंत्रतेकडे कल असे, व त्यामुळें तो पूर्वींही एका राज्यक्रांतिकारक बंडाळीमध्यें सामील झालेला होता. त्यानें आपल्या राज्यांतील लोकांना पुष्कळ हक्क देऊन खूष करून ठेविलें होतें. व त्याच्यापाशीं सत्तर हजार सैन्य लढाईला तयार होतें. युद्धकौशल्य, शौर्य, रणमर्दपणा, इत्यादींमध्यें आपला नांवलौकिक व्हावा अशी त्याची फार महत्त्वाकांक्षा होती. ती पूर्ण करण्याला त्याला ही संधि मिळाली, आणि तो आपल्या देशाच्या सेवेला पुढें आला. त्यानें आपल्या हातां-तील म्यान बाजूला फेंकून दिलें आणि त्यांतील तरवार त्यानें ऑस्ट्रियावर उपसली.

पीडमाँट, लाँबर्डी, हीं जशीं इटलीमधील प्रमुख संस्थानें होतीं तसेंच रोममधील पोपचें संस्थान हेंही महत्त्वाचें होतें. व इटलीच्या स्वतंत्रतेकरितां उभा-

रलेल्या इटॅलियन लीगला इतर लोक मिळाले होते त्याप्रमाणें आपणही मिळावें अशी रोममधील लोकांना अतिशय उत्कंठा झालेली होती. चोहोंकडे स्वतंत्रतेची लाट उसळलेली असल्यामुळें रोममधील पोपला आपल्या लोकांच्या इच्छेला प्रतिबंध करण्याचें धारिष्ट होईना. लोकांनीं जे जे हक्क मागितले ते ते पोपनें त्यांना आधींच दिलेले होते व अखेरीस पोपला आपल्या स्वतः-च्या मर्जीविरुद्ध इटॅलियन लीगमध्यें सामील होणें भाग पडलें. रोममध्यें कांहीं स्वयंसेवकांच्या टोळ्या आधींच उभारलेल्या होत्या, त्या ताबडतोब चार्ल्स आल्बर्ट याच्या सैन्याला जाऊन मिळाल्या. व नंतर पोपच्या प्रधानांनीं एक जाहीरनामा काढून उघडपणें असें प्रसिद्ध केलें कीं, लोकांच्या मनांत हल्लीं स्वतंत्र-तेबद्दल जें औत्सुक्य उत्पन्न झालें आहे तें तसेंच दाबून न टाकतां त्याला उत्तेजन दिलें पाहिजे अशी आमची खात्री आहे; व इटलीच्या पवित्र पक्षाला यश यावें आणि न्यायाचा विजय व्हावा अशी आमची इच्छा आहे. म्हणून या गोष्टीकडे आम्ही आपलें सर्व लक्ष पोंचवूं. असा जाहीरनामा काढून पोपच्या प्रधानांनीं आपलें सैन्य इटॅलियन लीगमध्यें जाऊन मिळण्याकरितां पाठविलें.

त्याप्रमाणें पीडमाँटचा राजा चार्लस आल्बर्ट याच्या हाताखालीं इटॅलियन लीगचें पुष्कळ सैन्य जमा झालें व त्या सर्व सैन्याचें आधिपत्य चार्लसनें आपल्या-कडे घेतलें व नंतर इटॅलियन्स आणि ऑस्ट्रियन्स यांच्यामध्यें भयंकर रण-संग्राम सुरू झाला. ह्या युद्धांत ड्यूक ऑफ सेव्हॉय आणि ड्यूक ऑफ जिनोआ हे चार्लस आल्बर्ट याचे दोन मुलगे आपल्या बापाबरोबर मोठ्या शौर्यानें लढत होते. युद्धाला आणि ऑस्ट्रियन लोकांच्या पराभवाला सुरुवात बहुतेक बरोबरच झाली असें म्हणण्याला हरकत नाहीं रॅडेट्स्की याला एका पाठीमागून एक ठिकाण सोडून हळूहळू मागें परतावें लागलें व इटलीमधील बहुतेक किल्ले आणि शहरें इटॅलियन लोकांच्या ताब्यांत आलीं. गॉईटो येथें तर चार्ल्स आल्बर्टच्या सैन्यानें फारच पराक्रम केला व ऑस्ट्रियाच्या निशाणावर जे गरुड पक्षी मोठ्या ऐटीनें बसले होते त्यांना पराभवाच्या लज्जेनें खालीं मान घालणें भाग पडलें. इटलींतील जयापजयावर ऑस्ट्रियन साम्राज्याची इमारत अवलंबून होती ती ह्या पराभवानें अगदीं डळमळूं लागली. परंतु इतक्यांत व्हिसेंझा येथें रॅडे-टस्कीच्या पक्षाला मोठा जय मिळाला. आणि त्यामुळें ऑस्ट्रियन साम्राज्यावरील नष्ट होण्याचा प्रसंग टळला. ह्यानंतर रॅडेट्स्कीच्या सैन्याला दुसरा जय कस्टोझा येथें

मिळाला. आणि ह्यानंतर रॅडेट्स्कीचें सैन्य चार्ल्स आल्बर्टचा पाठलाग करण्याकरितां ताबडतोब निघालें. इटॅलियन शिपाई कांहीं वेळपर्यंत अगदीं व्यवस्थित रीतीनें मागें परतत होते. परंतु अखेरीस कांहीं घोटाळा होऊन तें सैन्य सर्व धीर सोडून आणि व्यवस्था मोडून पळत सुटलें. त्या सैन्याला घेऊन चार्ल्स आल्बर्ट मिलन शहरामध्यें आला. परंतु त्या शहराचें संरक्षण आपल्या हातून होईल असें त्याला वाटलें नाहीं. व म्हणून तो तें शहर शत्रूच्या स्वाधीन करण्याच्या बेतांत होता. मिलन हें इटलीमधील स्वातंत्र्येच्छु लोकांच्या चळवळीचें मुख्य शहर होतें. तेथील लोकांना ही बातमी कळल्याबरोबर त्यांना चार्ल्सचा अतिशय त्वेष आला. व राजा चार्ल्स हा ज्या वाड्यामध्यें उतरला होता त्याला वेढा घालून मिलनमधील लोक त्याला ठार मारण्याच्याही बेतांत आले होते. मिलनमधील लोकांच्या या कृतघ्नतेबद्दल चार्ल्स आल्बर्टला अतिशय वाईट वाटलें. त्याचा निरुपाय झाल्यामुळें अखेरीस त्याला मिलन शहर शत्रूच्या स्वाधीन करून ट्यूरीनकडे परत जाणें भाग पडलें. नंतर दुसरे दिवशीं ऑस्ट्रियन सैन्यानें मिलन शहरांत मोठ्या थाटानें प्रवेश केला. त्या वेळीं मिलनमधील लोकांना अतिशय दुःख झालें. आपल्याला अशी स्वतंत्रता मिळेल, आणि आपण मग असें करूं तसें करूं, अशा ज्या अनेक आशा त्या लोकांच्या मनांत खेळत होत्या त्या सर्व मावळून गेल्या. फिरून स्वतंत्रता मिळण्याचा यत्किंचितही संभव उरला नाहीं. आणि निराशेचे डोंगर मिलनच्या लोकांवर येऊन कोसळले. आपण मिलनमध्यें इटलीची स्वतंत्रता स्थापन करूं ह्या कल्पनेमुळें तें शहर त्यांना प्रिय झालेलें होतें. पण आतां त्या आशेचा समूळ नाश झाल्यामुळें त्यांना त्या शहरांत राहणेंही खेदजनक वाटूं लागलें. जे आपण स्वतंत्र होण्यासाठीं लढत होतों त्यांनींच आतां शत्रूच्या जोखडाखालीं निमूटपणें माना शिणवून घ्याव्या हें बरोबर नाहीं, असें वाटून सुमारें साठ हजार इटॅलियन लोकांनीं इटलींतील आपलीं घरेंदारें सोडलीं आणि ते स्वित्झर्लंड, पीडमाँट वगैरे आसपासच्या स्वतंत्र देशांतून आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं फिरून प्रयत्न करण्याकरितां जाऊन राहिले. ह्या सुमाराला इटलीच्या स्वतंत्रतेच्या लढायांत आणि कारस्थानांत पुढें प्रसिद्धीस आलेला प्रख्यात देशभक्त मॅझिनी हाही इटलीतून स्वित्झर्लंडमध्यें जाऊन राहिला. ऑस्ट्रिया आणि पीडमाँट ह्यांच्यामध्यें ह्या वेळीं तह होऊन लढाई सुमारें एक वर्षपर्यंत बंद राहिली.

ह्याप्रमाणें ही लढाई बंद झाल्याची बातमी ऐकून मिलनमधील राज्यक्रांतिकारक मंडळीचे असे उद्गार निघाले कीं, ही राजांची लढाई बंद झाली, पण आतां लोकांची लढाई सुरू व्हावयाची आहे. त्या राज्यक्रांतिकारक मंडळीमध्यें मॅझिनी हा पुढारी होता; व पुढें उदयास आलेला गॅरिबाल्डी हाही त्या वेळीं आपल्याजवळ कांहीं स्वयंसेवकांच्या टोळ्या जमवीत होता. पीडमाँटचा राजा चार्ल्स आल्बर्ट यानें इटलीच्या स्वातंत्र्याकरितां सुरू केलेल्या लढाईमध्यें त्याला दुर्दैवानें यश आलें नाहीं. तरी पण इटलीच्या स्वतंत्रतेबद्दलची त्याची इच्छा मॅझिनी आणि गॅरिबाल्डी यांच्यापेक्षां कमी होती असें नाहीं. मिलन शहर शत्रूच्या आणि स्वाधीन केल्यानंतर चार्ल्स आल्बर्टनें जो एक जाहीरनामा काढला त्यांत त्यानें म्हटलें आहे कीं, शत्रूचें सैन्य वाढत होतें आणि माझें सैन्य कमी होत होतें, त्यामुळें मिलनमध्यें शत्रूला लढाई देणें शक्य नव्हतें. कारण, माझे शिपाई जरी पराक्रमी होते तरी त्यांच्या पराक्रमालाही कांहीं मर्यादा आहे. मिलनमधील लोकांनीं कांहीं मदत केली असती, परंतु त्यानें फार दिवस टिकाव लागला नसता व कायमचा जय मिळाला नसता, म्हणून मिलन येथें तह करणें मला भाग पडलें. परंतु त्या वेळच्या प्रत्येक क्षणीं माझें अंतःकरण इटलीच्या स्वातंत्र्याकरितां स्फुंदत होतें! अशा रीतीनें निरुपाय झाल्यामुळें चार्ल्स आल्बर्ट यानें कांहीं वेळपर्यंत तह करून लढाई बंद ठेविली होती. पण ही गोष्ट जशी मिलनमधील लोकांना आवडली नाहीं तशीच इतर लोकांनाही आवडली नाहीं. फ्लॉरेन्स आणि लेगहॉर्न येथें मोठमोठे दंगे उद्भवले व रोममधील लोकांनीं तर पोपच्या प्रधानाला ठार मारून व पोपला रोम शहरांतून पळवून लावून तेथें एक स्वतंत्र लोकसत्तात्मक राज्य स्थापन केलें. अशा प्रकारें इटलीमध्यें जिकडे तिकडे स्वातंत्र्याच्या उकळ्या फुटत असतां ऑस्ट्रिया आणि पीडमाँट ह्यांच्यामध्यें फिरून लढाई सुरू झाली. चोहोंकडचे राज्यक्रांतिकारक लोक पीडमाँटमध्यें गोळा झाले होते व त्यांना स्वतंत्रतेशिवाय दुसरें कांहीं सुचत नव्हतें. त्यांनीं चार्ल्स आल्बर्ट याला लढाई करण्याला भाग पाडलें. लोकांनीं त्याला लढाईसाठीं लागतील तितके पैसे पुरविण्याचे ठराव पास केले, निरनिराळ्या सभांकडून, राजानें फिरून इटलीच्या स्वतंत्रेकरितां लढाई सुरू करावी अशा अर्थाचे विनंति अर्ज आणि मानपत्रें येऊं लागलीं. लोकांची इतकी उत्सुकता पाहून आपण जर लढाई सुरू केली नाहीं तर आपल्याला लोक राज्यावरून पदच्युत करतील असें

वाटून चार्ल्स आल्बर्ट यानें फिरून लढाईला सुरवात केली. मोस्टारा ह्या ठिकाणीं पहिला सामना होऊन नोव्हरा येथें ऑस्ट्रियन आणि इटॅलियन सैन्याची फिरून गांठ पडली. ह्या लढाईमध्यें चार्ल्स आल्बर्ट ह्याच्या हाताखालील एका सेनापतीनें त्याचा हुकूम बरोबर न पाळल्यामुळें चार्ल्सचे सर्व बेत विस्काळित झाले. आणि नोव्हराच्या लढाईमध्यें इटॅलियन लोकांचा पूर्णपणें पराभव झाला; व इटलीच्या स्वातंत्र्याची फिरून एकदम व पूर्णपणें निराशा झाली. चार्ल्स आल्बर्ट हा त्या लढाईमध्यें फार शौर्यानें लढला. परंतु मिलनच्या लोकांनीं त्याच्यावर कृतघ्नपणाचा जो आरोप केला त्यामुळें त्याचें मन अतिशय खिन्न झालेलें होतें. तरी पण ऑस्ट्रियाच्या अमलापासून इटली देश स्वतंत्र व्हावा ही त्याच्या आयुष्याची अतिशय मोठी महत्त्वाकांक्षा होती. ती महत्त्वाकांक्षा पूर्ण होण्याचा आतां संभव उरला नाहीं, म्हणून त्याला आयुष्यही नकोसें झालें. व आतां आपण मरून गेलों तर बरें होईल असें त्याला वाटूं लागलें. नोव्हराच्या लढाईत पराभव झाल्यानंतर रात्रीं ४ वाजतां त्यानें आपले सर्व सेनापति आपल्या भोंवतीं जमा केले, आणि त्यांना उद्देशून तो म्हणाला : 'इटलीच्या स्वतंत्रतेसाठीं मी आजपर्यंत काय पाहिजे तें करण्याला तयार झालों! त्या स्वातंत्र्यासाठीं मी आपला जीव, माझ्या मुलांचे प्राण आणि माझें सिंहासन हीं सगळीं धोक्यांत घालण्याला तयार झालों! तरी पण माझा हेतु शेवटास गेला नाहीं! आणि आतां शत्रूपाशीं तह करण्याची वेळ आली! त्या तहावर माझ्यानें सही करवणार नाहीं. असा प्रसंग येण्यापेक्षां मरण यावें म्हणून मी आजच्या लढाईमध्यें पुष्कळ वेळां प्रयत्न केला; पण तोही सफळ झाला नाहीं! असो. आतां आपल्या देशाच्या सेवेकरितां मी आपली ही शेवटची आहुति अर्पण करितों. मी आपल्या डोक्यावरचा मुकुट खालीं ठेवितों.; आणि माझा मुलगा ड्यूक ऑफ सेव्हॉय याला आपलें राज्य देतों. असें म्हणून त्यानें आपल्या डोक्यावरील मुकुट खालीं ठेवला. नंतर आपल्या बायकोला एक कुशल वर्तमानाचें पत्र लिहून तो रात्रींच निघाला व ऑस्ट्रियन शिपायांच्या चौकीपहाऱ्यांतून तो जाऊं लागला. ऑस्ट्रियाच्या छावणींत त्यानें आपण कोणी तरी इटॅलियन कामगार आहोंत असें सांगितलें व चार्ल्स आल्बर्ट यानें आपल्या राज्याचा राजीनामा दिला, ही बातमी ऑस्ट्रियन ऑफिसरना सांगून तो त्यांच्या छावणींतून सुरक्षितपणें बाहेर पडून

नीस ह्या शहरीं जाऊन पोंहोचला. तेथें तो पुढें सहा महिन्यांनीं मरण पावला. चार्ल्स आल्बर्टच्या राजीनाम्याची बातमी जेव्हां टयूरिनमध्यें कळली तेव्हां तेथील प्रतिनिधींच्या सभेमध्यें ज्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहिले नाहींत असा एकही मनुष्य नव्हता. त्या वेळीं त्या सभेमध्यें चार्ल्स आल्बर्ट याची एक तसबीर ठेविलेली होती तिला उद्देशून एम्. जोस्टी ह्या नांवाच्या एका प्रतिनिधीनें पुढील उद्गार काढले; इटलीसाठीं आपल्या सर्वस्वाची आहुति देण्याला तयार झालेल्या त्या महात्म्याची ही प्रत्यक्ष मूर्ति आपल्यापुढें येथें आहे! या महात्म्याच्या गुणांचा जयघोष इटलीच्या प्रत्येक भागामध्यें ऐकूं येईल! इतिहासामध्यें याच्या गुणांची बरोबर किंमत करण्यांत येईल! पुढल्या पिढींतील लोक यानें दाखविलेल्या देशाभिमानाचें चीज करतील. आणि जेव्हां परकीयांच्या जुलमापासून इटली स्वतंत्र होण्याची वेळ येईल त्या वेळीं या महात्म्याचें नांव इटालियन लोकांच्या अंतःकरणामध्यें शाश्वत आणि चिरंजीव होईल! अशा प्रकारचे उद्गार काढून पीडमॉंटमधील लोकांनीं चार्ल्स आल्बर्टबद्दल आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली.

चार्ल्स आल्बर्टच्या बरोबरच इटलीच्या स्वातंत्र्याची आशा त्या वेळेपुरती नाहींशी झाली. व फ्रान्सच्या राज्यक्रांतीचे इटली देशावर काय परिणाम झाले याचें परीक्षण जर तेथेंच थांबविलें तर इटलीला स्वतंत्रतेच्या बाबतींत कांहीं एक फायदा झाला नाहीं असें म्हणावें लागेल. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. इटलीला जरी ह्या वेळीं स्वतंत्रता प्रत्यक्ष मिळाली नाहीं, तरी आपल्या देशांतील सर्व लहान लहान संस्थानांनीं एकत्र व्हावें आणि एकत्र होऊन स्वतंत्र व्हावें ही इच्छा फ्रान्सच्या राज्यक्रांतीचाच परिणाम होय. आतां ती इच्छा लागलीच सफल झाली नाहीं; तरी पुढें थोड्याच वर्षांत इटलीला स्वतंत्रतेचे दिवस पाहण्याचा सुयोग आला. चार्ल्स आल्बर्ट याच्या हातून इटलीच्या स्वतंत्रतेचें काम पुरें झालें नाहीं. पण बापानें सुरू केलेलें काम त्याच्या मुलानें तडीस लाविलें. चार्ल्स आल्बर्ट यानें आपला मुलगा ड्यूक ऑफ सेव्हॉय ऊर्फ व्हिक्टर इमॅन्युएल, याला फक्त आपल्या डोक्यावरील मुकुटच दिला नव्हता, तर त्याच्याबरोबर आपल्या अंतःकरणांतील शौर्य, देशाभिमान आणि शहाणपण हींही दिलीं होतीं. त्यामुळें व्हिक्टर इमॅन्युएल यानें आपल्या बापाची

इच्छा लवकरच तृप्त केली. १८४८ त ऑस्ट्रियाच्याविरुद्ध सुरू केलेल्या लढाईंत त्यांना यश आलें नाहीं. परंतु मॅझिनी, गॅरिबाल्डी, वगैरे लोकांच्या पुढाऱ्यांनीं व्हिक्टर इमॅन्युएलसारख्या राजाच्या साहाय्यानें जी लढाई केली त्यांत त्यांना यश येऊन इटली देश अखेरीस स्वतंत्र झाला.

---

# पिकाची पाहणी

## सर्वे नंबर ४

इटली देशामध्यें फ्रान्समधील राज्यक्रांतीचा काय परिणाम झाला हें आपण मागील अंकीं पाहिलें; आतां आपण जर्मनीकडे वळूं. इ. स. १८४८ च्या पूर्वीं जर्मनीमध्यें राज्यक्रांतीला अनुकूल अशी स्थिति उत्पन्न होत चालली होती. जर्मनी लोक हे मूळचे धाडसी, दृढनिश्चयी आणि दीर्घोद्योगी होते. ह्यांच्या अंगांतील शौर्य फ्रेडरिक धि ग्रेट ह्याच्या वेळीं युरोपांतील सर्व राष्ट्रांच्या दृष्टोत्पत्तीस येऊन चुकलें होतें. ह्या लोकांनीं रणांगणावर जसें आपलें शौर्य गाजविलें होतें, तशीच धर्माच्या बाबतींतही त्यांनीं आपली सत्यप्रीति व्यक्त करून दाखविली होती. युरोपांतील सर्व लोकांवर पोपचा जुलूम अव्याहतपणें चाललेला असे. परंतु त्याला पहिल्यानें प्रतिबंध करणारा लूथर ह्याच लोकांमध्यें निर्माण झाला. लूथरनें ह्या प्रसंगीं जो जुलुमाचा तिटकारा दाखविला, तो फुकट गेला नाहीं. त्याचे परिणाम लूथरच्या पाठीमागून जन्मास येणाऱ्या जर्मन लोकांवर झालेले दिसून येत होते. धार्मिक स्वतंत्रतेपासून राजकीय स्वतंत्रतेची इच्छा प्रबळ झाली. फ्रान्सचा बादशहा नेपोलियन ह्याला जिंकण्याकरितां एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं युरोपांतील सर्व सैन्यें एकत्र झालीं होतीं, त्यांत जर्मन शिपाईही होते. त्यांना जेव्हां नेपोलियनच्या सैन्याच्या विरुद्ध लढूनही त्या लढाईंत जय मिळाला, तेव्हां त्या जर्मन शिपायांची दृष्टि आपल्या स्वतःच्या अंगच्या शौर्याकडे साहजिकपणेंच वळली व त्यांना असें वाटूं लागलें कीं, आपल्या अंगामध्येंही सामर्थ्य आहे, आपण बाकीच्या लोकांपेक्षां कांहीं कमकुवत आहों

असें नाहीं, व ह्या आपल्या अंगच्या सामर्थ्याचा उपयोग जर आपण आपला देश एक आणि स्वतंत्र करण्याकडे केला तर ती गोष्ट आपल्या हातून होणें अशक्य आहे असें नाहीं. असे विचार मनांत येऊन त्यांची दृष्टि जर्मनीच्या स्वतंत्रतेकडे वळली. आणि ह्या कल्पनेचा प्रसार होत होत जर्मनींतील बहुतेक लोकांना आपल्या देशाच्या स्वतंत्रतेबद्दलची अतिशय उत्सुकता वाटूं लागली. आणि स्वतंत्रतेबद्दलची उत्सुकता लोकांच्या मनांत उत्पन्न होऊं लागणें, हाच राज्यक्रांतीचा पहिला प्रारंभ होय.

याशिवाय जर्मनींतील राज्यक्रांतीला आणखी एक कारण झालें. आपल्या इकडे हल्लीं जशी पुष्कळ वर्षें शांतता नांदत आहे, त्याचप्रमाणें त्या वेळीं जर्मनीची स्थिति झालेली होती. १८१५ मध्यें नेपोलियनच्या लढाया संपल्या आणि तेव्हांपासून १८४८ पर्यंत जर्मनीमध्यें एकसारखी शांतता होती. ह्या तेहतीस वर्षांच्या मुदतीमध्यें जर्मन लोकांची एकंदर परिस्थिति फारच चांगल्या रीतीनें बदलून गेली. लढाईपासून नुकसान होत नाहींसें झाल्यामुळें जर्मन लोकांचे व्यापारधंदे फार वाढले. आणि व्यापारधंदे वाढल्यामुळें अर्थात् राष्ट्रांतील संपत्तीही वाढली. कामधंदा करण्याला जागा आणि कामधंद्यामध्यें परिश्रम केले असतां मुबलक फायदा ह्या गोष्टी ज्या देशामध्यें मिळूं शकतात, त्या देशांतील लोकसंख्या वाढण्याला फारसा वेळ लागतो असें नाहीं. वर दिलेल्या मुदतींत जर्मनीची लोकसंख्या, व्यापार आणि संपत्ति ह्यांची वाढ अतिशय झाली. ह्याप्रमाणें जर्मन लोक बाकीच्या बाबतींत इतक्या चांगल्या स्थितीपर्यंत येऊन पोंचल्यानंतर त्यांची दृष्टि स्वाभाविकपणेंच आपल्या आसपासच्या देशांतील लोकांकडे वळली; तेव्हां त्यांना असें दिसून आलें कीं, बाकीच्या देशांतील लोक आपल्याचसारखे असून त्यांना राजकीय स्वातंत्र्य आहे. मग तें आपल्यालाच कां नसावें ? असे विचार मनांत येऊन त्यांची स्वातंत्र्याबद्दलची उत्सुकता जास्तच वाढूं लागली. जर्मनींतील कित्येक संस्थानांच्या राजांनीं आम्ही तुम्हांला स्वतंत्रतेचे अमुक हक्क देऊं अशीं वचनें दिलेलीं होतीं. परंतु हिंदुस्थानांतील लोकांना अशा प्रकारचीं दिलेलीं वचनें ज्याप्रमाणें कधीं पाळलीं गेलीं नाहींत, त्याचप्रमाणें जर्मन लोकांनी दिलेलीं वचनेंही कधीं पाळण्यांत आलीं नाहींत. आपल्या राजांनीं दिलेलीं वचनें पूर्ण करावीं, म्हणून जर्मनीच्या उत्तर आणि मध्य भागांतील लोकांनीं पुष्कळ प्रयत्न केले, परंतु त्यांना यत्किंचितही यश आलें नाहीं.

आपली सांपत्तिक आणि औद्योगिक स्थिति चांगली सुधारली असतांनाही आपले राजे आपल्याला त्यांनीं वचन दिलेले स्वतंत्रतेचे हक्क देत नाहींत, असें पाहून तर जर्मन लोकांना फारच चीड आली होती. व ते स्वतंत्रता मिळविण्यासाठीं अगदीं अधीर होऊन गेले होते.

जर्मनीमध्यें तेहतीस वर्षें एकसारखी शांतता असल्यामुळें लोकांचे उद्योगधंदे वाढून त्यांच्या मनोवृत्तींत फरक पडला होता, हें वर सांगितलेंच आहे. परंतु ह्या शांततेचा जर्मन लोकांच्या मनावर आणखीही एक परिणाम झालेला होता. जुलुमी राजांना वाटत असतें कीं, आपल्या राज्यांत शांतता आहे ही फार चांगली गोष्ट आहे. कारण, जितकी शांतता राहील तितकें आपलें राज्य चिरस्थायी होईल, अशी त्यांची कल्पना असते. परंतु त्या शांततेंतच त्यांच्या राज्याच्या विनाशाची तयारी चाललेली असते. पुष्कळ वर्षांच्या शांततेमुळें लढाईचीं दुःखें लोक विसरून गेलेलें असतात. लढणाऱ्या लोकांना किती उपास काढावे लागतात, किती लोकांना आपल्या प्राणाला मुकावें लागतें, जमिनीच्या पिकाची किती नासधूस होते, आणि किती मुलूख बेचिराख होतात, ह्याबद्दलची कल्पना लोक पूर्णपणें विसरून गेलेले असतात. त्यांना फक्त पूर्वींच्या पराक्रमांचीं वर्णनें दिसत असतात. त्यांना फक्त पूर्वींच्या विजयश्रीच्या गोष्टी ऐकूं येत असतात. आणि त्यांना लढाईपासून होणाऱ्या सौख्यकारक परिणामाशिवाय दुसऱ्या कशाचीही वार्ता नसते. अशा स्थितींत शांतता कंटाळवाणी होते, आणि लढाई हवी हवीशी वाटूं लागते, आणि अशाच प्रकारची स्थिति त्या वेळीं जर्मन लोकांची झालेली होती.

ह्या वेळीं जर्मनीमध्यें शिक्षणाचाही प्रसार पुष्कळ झालेला होता. त्या शिक्षणप्रसाराच्या कामाला तेथील राजांकडून उत्तेजन मिळत असे. त्या वेळचे जर्मनींतील राजे लोकांना विद्यादान करीत होते तें परोपकारबुद्धीनें आणि स्वार्थनिरपेक्षतेनें करीत होते, असें नाहीं. लोकांना विद्या देणें हें आपला जुलूम त्यांच्यावर कायम राखण्याचें एक चांगलें साधन आहे, असें समजून जर्मन राजे आपल्या लोकांना शिक्षण देत होते. त्यांची अशी कल्पना होती कीं, शिक्षण मिळाल्यापासून लोकांना राज्यक्रांति करण्याची यदाकदाचित् इच्छा झाली तर त्यांचे प्रयत्न चिरडून टाकण्याला आपल्यापाशीं मोठमोठीं बलाढ्य सैन्यें आहेतच. परंतु शिक्षणापासून असा परिणाम व्हावयाचाच नाहीं, अशी

त्यांची बहुतेक खात्री होती. लोकांना एकदां लिहिण्यावाचण्याची चटक लावून दिली, म्हणजे ते अगदीं निःसत्त्व बनून जातील; व त्यांचें लक्ष दुसऱ्या कशा-कडेही न जातां सर्व कांहीं या शिक्षणांतच आहे असें त्यांना वाटूं लागेल. व एकदां लोकांची अशी स्थिति झाली म्हणजे त्यांच्यावर राज्य करणें अगदीं सोपें; अशा रीतीनें गाईप्रमाणें लोक झाले म्हणजे त्यांच्यामध्यें राज्यक्रांति करण्याची कल्पनाच उत्पन्न होणार नाहीं. असे अनेक विचार मनांत आणून जर्मन राजांनीं आपल्या प्रजेला सुशिक्षित करून ठेविलें होतें. परंतु त्या राजांच्या दुर्दैवानें लोकांच्या शिक्षणाचा राजांना वाटत होता तसा परिणाम न होतां जर्मन लोकांच्या डोक्यामध्यें स्वतंत्रतेच्या ज्या कल्पना शिरल्या होत्या त्यांना त्या शिक्षणापासून पुष्टीच मिळत चालली

जर्मन लोकांनीं स्वातंत्र्यासाठीं केलेल्या प्रयत्नांना वर सांगितलेल्या शिक्षणप्रसारानें तर यश आलेंच, पण त्याशिवाय आणखीही एक जबरदस्त कारण राज्यक्रांतीला उपकारक असें जर्मनीमध्यें घडून आलेलें होतें. फ्रान्स देशामध्यें पहिला नेपोलियन जेव्हां अतिशय प्रबळ झालेला होता, आणि युरोपियन राजांचे मुकुट जेव्हां त्याच्या पायाभोंवतीं दाटी करून सोडीत होते, तेव्हां प्रशियाच्या राजानें आपल्या राज्यांत फक्त चाळीस हजार सैन्य ठेवावें, असा नेपोलियननें त्याला नियम करून दिला होता. हल्लीं हिंदुस्थानांत अमुक संस्थानिकानें अमुकच सैन्य आपल्या पदरीं ठेवावें, त्याच्यापेक्षां जास्त ठेवूं नये, अशा प्रकारचे नियम ज्याप्रमाणें इंग्रज सरकारनें नेटिव राजांना करून दिले आहेत, त्याचप्रमाणें नेपोलियननें तिकडे व्यवस्था केलेली होती. परंतु नेपोलियनच्या हातावर तुरी देणारे आणि नेपोलियनच्या डोळ्यांत धूळ फेंकणारे राजे जर्मनीमध्यें निघाले. आपण अमुकच सैन्य ठेवावें, असें नेपोलियननें आपल्याला सांगणें म्हणजे हा एक प्रकारचा जुलूम आहे, हें जर्मनींतील राजे जाणत होते. परंतु या जुलमाला आळा घालण्याचें त्यांच्यामध्यें सामर्थ्य नसल्यामुळें त्यांनीं दुसरीच एक युक्ति आरंभिली. नेपोलियनच्या हुकमाप्रमाणें प्रशियाला फक्त चाळीस हजारच सैन्य बाळगण्याचा अधिकार होता. तेव्हां प्रथम चाळीस हजार सैन्य चाकरीस ठेवून त्याला सर्व प्रकारचें लष्करी शिक्षण तीन वर्षेपर्यंत चांगल्या रीतीनें देण्यांत येत असे, व ते शिपाई आपल्या कामांत तरबेज झाले म्हणजे तीन वर्षांनी त्यांना काढून त्यांच्या जागीं दुसरे लोक ठेवण्यांत येत असत; व ते

तयार झाले म्हणजे पुढच्या तीन वर्षांकरितां त्यांच्या जागीं नवीन शिपायांची फिरून भरती करण्यांत येत असे. प्रशियाच्या या युक्तीला चांगलें यश येत आहे असें पाहून, जर्मनींतील इतर संस्थानांनींही ह्याच पद्धतीचें तावडतोब अवलंबन केलें. हा क्रम पुष्कळ दिवस चालू राहिल्यानें एकंदर राष्ट्रांतील सर्व लोक शिपाई-गिरीच्या कामांत निष्णात बनले. प्रत्येक जर्मन मनुष्य अठरा वर्षांच्या वयांत आला म्हणजे त्याला लष्करामध्यें तीन वर्षेपर्यंत शिपाईगिरीचें काम शिकणें भागच पडत असे. तो कोणत्याही जातीचा असला, किंवा कोणत्याही दर्जाचा असला, श्रीमंत असला अगर भिकारी असला, सरदार असला किंवा शेतकरी असला, तरी त्याला तीन वर्षें पलटणीच्या चाकरीमध्यें काढल्यावांचून गत्यतर नव्हतें. जर्मन लोकांच्या मनांत वर दिलेल्या अनेक कारणांनीं स्वतंत्रतेची आवड आधींच उत्पन्न झालेली होती. आणि त्यांतून त्यांच्या सर्व राष्ट्राला अशा रीतीनें शिपाईगिरीचें शिक्षण मिळत होतें, त्यामुळें तर आपली स्वतंत्रते-ची आशा तृप्त होण्याची त्यांना विशेषच खात्री वाटूं लागली होती.

जुलुमी राजांचें सिंहासन त्यांच्या खालून सपशेल निघून जातें तेव्हां त्यांना राज्यक्रांति झाली असें वाटतें. परंतु वास्तविक स्थिति तशी नसून ती राज्यक्रांति अनेक वर्षें आधींपासून सुरू झालेली असते. जुलमी राजांच्या सिंहासनांचे प्रत्यक्ष तुकडे झालेले दिसण्याच्या आधींच अनेक वर्षांपासून तीं सिंहासनें डळमळूं लागलेलीं असतात. राजांनीं कितीही गुप्त हेर ठेविले असले तरी त्यांची दृष्टि चुकवून अनेक कारणें एकत्र गोळा होत असतात. किंबहुना जुलमी राजेच तीं कारणें उत्पन्न करण्याला आपल्या हातांनीं मदत करीत असतात. शिवाय दुसरी एक असल्या राजांची खोटी समजूत असते. ती अशी कीं, राज्यक्रांति ही शस्त्रांनी होते, असें ते मानितात. परंतु खरी राज्यक्रांति शस्त्रांनीं होत नाहीं. विचारांमध्यें क्रांति झाली म्हणजे, राज्यक्रांति घडून येते, असें इतिहासावरून दिसून येतें युरोपांत जेव्हां जेव्हां राज्यक्रांत्या झालेल्या आहेत, तेव्हां तेव्हां त्यांच्या आधीं विचारांमध्यें क्रांत्या झालेल्या होत्या असें आपल्याला दिसून येतें. जर्मनींतील लोकांचेही ह्या वेळीं विचारच आधीं फिरलेले होते. जर्मन लोक आपल्या राजांवर पाठीमागून फिरले. हिंदुस्थान देशांत जशी लहान मोठीं अनेक संस्थानें आहेत, त्याप्रमाणें त्या वेळीं जर्मनीमध्यें होतीं. हीं संस्थानें एकमेकांपासून स्वतंत्र होतीं, परंतु आतांपर्यंतचें त्यांचें सगळें शौर्य आणि शहाण-

पण ह्यांचा विनियोग तीं संस्थानें आपसांत एकमेकांपाशीं भांडण्याच्या कामीं करीत असत. परंतु आपसांत भांडून आणि एकमेकांचा नाश करून आतां आपसांतील दुहीनें जास्त नाश करण्याला कांहीं उरलें नाहीं, अशी स्थिति हळूहळू येऊन पोंचल्यानंतर जर्मन लोकांचें लक्ष त्यांच्या शेजारच्या फ्रान्स आणि रशिया ह्या देशांकडे वळले. व हे देश इतके बलाढ्य कां आणि आपण इतके दुर्बळ कां, त्यांच्यांत आणि आपल्यांत फरक काय, या प्रश्नांचा ते आपल्या मनांशीं विचार करूं लागले. तेव्हां त्यांच्या नजरेस असें आलें कीं, फ्रान्स आणि रशिया ह्या देशांतून एकतंत्री राज्यव्यवस्था आहे, म्हणून त्यांच्या हातामध्यें आज प्राबल्य आहे; तेव्हां त्यांच्याप्रमाणेंच आपण जर चार कोटि लोक एकत्र झालों, आपल्या निरनिराळ्या संस्थानांतून जें सैन्य आहे तें एकत्र केलें, निरानिराळ्या ठिकाणीं जी संपत्ति अडकून पडलेली आहे त्या सगळ्या संपत्तीचें मिळून एक राष्ट्रीय भांडवल केलें, सगळ्या देशांतील पराक्रम आपसांत एकमेकांच्या विरुद्ध उपयोगांत न आणितां त्याचा आपल्या देशाचें महत्त्व वाढविण्याच्या कामीं आपण उपयोग केला, तर आपणही फ्रान्स किंवा रशिया यांच्यासारखें एक राष्ट्र बनूं, आपल्यालाही आपले शत्रु भिऊं लागतील, आणि आपल्याला इतर राष्ट्रें योग्य मान देऊं लागतील. अशा प्रकारचे विचार लोकांच्या मनांत घोळूं लागल्यापासून जर्मनी देश एक करावयाचा ही कल्पना बरीच प्रबळ झाली; व जर्मनींतील देशभक्त ह्या कल्पनेच्या प्रचारासाठीं आणि तशी वस्तुस्थिति घडवून आणण्यासाठीं जारीनें प्रयत्न करूं लागले. जर्मनींतील निरानिराळ्या संस्थानांनीं एकत्र होऊन जर्मनीचें एक राष्ट्र करावयाचें, ह्या जर्मनीच्या एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेला सुरवात आधींपासूनच थोडथोडी झाली होती; परंतु तिचा उगम प्रथमतः राजकारणांत नसून केवळ व्यापारापुरता होता. इंग्लंडचा पुष्कळ माल जर्मनीमध्यें खपत असे; तरी पण जर्मनीचा माल इंग्लंडमध्यें गेला असतां इंग्लंड प्रतिबंध करीत असे; जर्मनीनें इंग्लंडपासून वाटेल तर विकत घ्यावें, इंग्लंडमध्यें माल आणून विकूं नये, अशी इंग्लंडनें त्या वेळीं तजवीज करून ठेविली होती. म्हणून त्याविरुद्ध जर्मन संस्थानांनीं आपसांत एक होऊन असे करार ठरविले होते कीं, जर्मन संस्थानांनीं एकमेकांच्या मालावर कर बिलकुल घ्यावयाचा नाहीं, परदेशांतून येणाऱ्या मालावर इतका जबर कर बसवावयाचा कीं, तो माल बहुतेक येण्याचा बंदच व्हावा, व ह्या देशाच्या मालावर बसवि-

लेल्या जकातीपासून जें उत्पन्न होईल तें एका समाईक खाजिन्यांत ठेवून नंतर तें प्रत्येक संस्थानानें हिस्सेरशीनें वांटून घ्यावें. ह्यामुळें जर्मनींतील व्यापार अतिशय वाढला. व इंग्लंडचा माल जर्मनीमध्यें येण्याचा बंद झाला. ह्या व्यापारी कटामध्यें प्रशिया मुख्य असल्यामुळें त्याच संस्थानाला पुढें महत्त्व आलें. ह्या व्यापाराच्या कामीं जर्मन संस्थानांमध्यें जी एक जूट उत्पन्न झाली, तीच राजकीय कामामध्यें जास्त दृढ होऊन पुढें जर्मनीला अखेरीस एक-राष्ट्रीयत्व प्राप्त झालें.

ह्याप्रमाणें अनेक कारणांनीं जर्मन लोकांचीं मनें स्वदेशाच्या स्वतंत्रते-साठीं आणि एकराष्ट्रीयत्वासाठीं हळूहळू तयार होत होतीं. ह्या सगळ्या कारणां-चा अमुकच एक परिणाम खात्रीनें होईल, असें १८४८ च्या आधीं कोणाला-ही कळून आलेलें नव्हतें. तरी पण कांहीं तरी होणार असें प्रत्येकाला वाटूं लागलें होतें. आणि काय होणार हें माहीत नसतांनाही होणार, अशी खात्री वाटत असणें हें राज्यक्रांतीची सांथ जी पुढें बळावते, तिचें एक पहिलें बल-वत्तर चिन्ह होय व अशीं चिन्हें जर्मनीमध्यें पुष्कळ होऊं लागलीं होतीं. जर्मनींतील राजांची राज्य करण्याची पद्धत जुलुमाची असूनही त्यांनीं आपल्या लोकांना शिक्षण देण्याला सुरुवात केली होती यांतील हेतु काय, हें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. त्याच हेतूनें जर्मन राजांनीं आपल्या लोकांना लेखनस्वातंत्र्याचा-ही हक्क पूर्णपणें दिलेला होता. आपल्यापाशीं मोठमोठीं सैन्यें खडीं आहेत, तेव्हां लोकांनीं कांहीं लिहिलें आणि कांहीं प्रसिद्ध केलें, तरी त्यापासून आपलें यत्किंचितही वांकडें व्हावयाचें नाहीं; कारण त्या लेखनस्वातंत्र्याचा आपल्याला प्रतिकूल असा कांहीं परिणाम होतो, असें दिसून आलें तर तो आपल्या सैन्याच्या मदतीनें जागच्या जागीं दाबून टाकण्याला आपणाला उशीर लागणार नाहीं; अशा समजुतीवर तेथील राजांनीं लोकांना लेखनस्वातंत्र्याचे आणि मुद्रणस्वातंत्र्याचे हक्क दिलेले होते. परंतु ह्या हक्कांचा जर्मन लोकांनीं फार चांगला उपयोग करून घेतला; व शिक्षण, लेखन, आणि मुद्रण ह्या तीन गोष्टींच्या योगानें जर्मन लोकांची महत्त्वाकांक्षा पूर्ण होण्याचा योग लवकरच जुळून आला.

ह्या वर दिलेल्या कारणांनीं जर्मन लोकांचीं मनें राज्यक्रांतीकरितां, स्वतंत्रतेकरितां, एकराष्ट्रीयत्वाकरितां आणि लोकसत्तात्मक राज्यपद्धतीकरितां

अतिशय उत्कंठित होऊन राहिलीं होतीं. सुरुंग उडण्याच्यापूर्वीं जिकडे तिकडे दारू भरून जशी तयारी झालेली असते, तशी जर्मनीमध्यें स्थिति झालेली होती. त्या दारूवर फक्त एक विस्तवाची ठिणगी टाकण्याचा अवकाश होता. आणि ती ठिणगी फ्रान्समधील राज्यक्रांतीनें त्या भरलेल्या दारूवर टाकिली व सुरुंग उडाला. त्या सुरुंगाच्या धक्क्यानें जर्मनींतील सर्व राजांचीं सिंहासनें डळमळून गेलीं. प्रशिया, बव्हेरिया, जर्मनी, पोलंड, फ्रँकफोर्ट, बेडन, साक्सनी, हॅनोव्हर, वर्टेम्बर्ग, वगैरे जर्मनींतील संस्थानांतून फ्रान्समधील राज्यक्रांतीचे परिणाम तर तावडतोब दिसून आलेच; परंतु जर्मनीच्या आसपासचे बेल्जम, हॉलंद, डेन्मार्क, स्वीडन, ऑस्ट्रिया वगैरे देशांतूनसुद्धां ह्या राज्यक्रांतीचे धक्के जर्मनीच्या द्वारानें जाऊन बसले. एखादा उत्तम मांत्रिक आला म्हणजे आतां याच्यापुढें आपलें कांहीं चालावयाचें नाहीं असें वाटून ज्याप्रमाणें भुतेंखेतें आपली धिंगामस्ती सोडून त्याला शरण येतात, त्याप्रमाणें ह्या वेळी जर्मनींतील राजांची स्थिति झाली होती फ्रान्समधील राज्यक्रांतीची बातमी ऐकल्याबरोबर त्यांचें धाबें दणाणून गेलें व जे गर्विष्ठ आणि जुलुमी राजे थोड्या वेळापूर्वीं लोकांवर मोठ्या अरेरावीनें आणि जुलुमानें अंमल करीत होते, तेच लोकांना शरण येऊन तुम्ही सांगाल त्याप्रमाणें आम्ही तुमच्यावर राज्य करूं, तुम्ही घालून दिलेल्या नियमांच्या बाहेर आम्ही जाणार नाहीं, आणि इतकें करूनही जर आम्ही तुम्हांला पसंत नसलों तर आम्ही आपला राज्यावरील हक्क सोडून देतों, असें आपल्या तोंडानें लोकांपुढें म्हणूं लागले फ्रान्समधील लोकांनीं राज्यक्रांति करून व आपला राजा लुई फिलिप याला पळवून तेथें लोकसत्तात्मक राज्य स्थापन केलें आहे; त्या लोकांना राजांच्या जुलुमांचा मोठा द्वेष आहे; तेव्हां ते कदाचित् आपलीं स्वतंत्र लोकांचीं सैन्यें घेऊन येतील व आपला पराभव करून आपल्या देशामध्येंही लोकसत्तात्मक राज्य स्थापन करवितील, अशी जर्मनीतील राजांना फार भीति पडली होती; व त्यामुळें ते आपापल्या देशांतील लोकांना आपण होऊनच जास्त सवलती देण्याला सिद्ध झाले होते. लोकांच्या सभांनीं, अर्जांनीं आणि विनवण्यांनीं जे हक्क त्यांना आज कैक वर्षेंपर्यंत मिळाले नव्हते ते त्यांना मोठ्या बहुमानानें समर्पण करण्याकरितां राजे एका पायावर तयार झाले आणि अशा रीतीनें लोकांच्या स्थितीमध्यें जिकडे तिकडे एकदम पुष्कळ फरक पडूं लागला. राजांनीं पूर्वीं दिलेलीं परंतु

पूर्वीं कधींही पुरीं न झालेलीं अशीं वचनें ताबडतोब पुरीं होऊं लागलीं. पूर्वीं अमक्यालाच अमक्या जागा द्यावयाच्या असे कांहीं निर्बंध होते, पण ते आपो-आप नाहींसे होऊं लागले. पूर्वीं ज्यूरीच्यासमोर लोकांच्या अपराधांची चौकशी होत नव्हती, व लोकांना शस्त्रें घेण्याची परवानगी नव्हती; परंतु आतां लोकांची ज्यूरीपुढें चौकशी व्हावी आणि सर्व लोकांनीं शस्त्रें घ्यावीं, अशा प्रकारच्या सूचना प्रत्यक्ष राजपक्षाकडून पुढें येऊं लागल्या. कांहीं लोकांवर कर जास्त आणि कांहीं लोकांवर कर कमी असा पक्षपात पूर्वीं होता, पण तो आपोआप नाहींसा होऊन, सरदार असो किंवा शेतकरी असो, सर्वांवर सारखा कर बसविला जाईल अशीं आश्वासनें राजांकडूनच पुढें येऊं लागलीं. युरोपांत जिकडे तिकडे राज्यक्रांत्या होऊं लागल्यापासून क्रांतिकारक लोकांनीं आपल्या क्रांतीचें दर्शक म्हणून एक तीन रंगांचें निशाण केलेलें होतें. काळा, तांबडा आणि सोनेरी असे तीन रंग ह्या निशाणावर असत व हें निशाण क्रांति-कारक लोकांचें असल्यामुळें जुलमी राजे त्याचा मोठा तिरस्कार करीत असत. पण प्रस्तुत प्रसंगीं कित्येक राजानी त्या निशाणाचा आपण होऊनच अंगी-कार केला. पण राजांच्या लोकांना फसवण्यासाठीं ह्या युक्त्या होत्या; व कित्येक ठिकाणचे लोक ह्या युक्त्यांनीं फसले गेले. परंतु जेथें स्वतंत्रतेची जास्त अभिरुचि उत्पन्न झालेली होती तेथील लोक असल्या उपायांनीं शांत झाले नाहींत. म्यूनिच, बर्लिन, बेडन वगैरे ठिकाणी लोकांचा त्वेष फारच विकोपाला गेला. तरी पण त्यांच्यावर रोष न करितां ते जें जें मागतील तें तें देण्याला जर्मन संस्थानांतील राजे अगदीं तत्पर होते. अशी चोहोंकडे अंदा-धुंदी चालली असतां प्रशियाच्या राजानें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्या जाहीरनाम्यामध्यें जर्मनीच्या भावी एकराष्ट्रीयित्वाचें बीज पूर्णपणें पेरलेलें होतें. ह्या जाहीरनाम्यांत राजानें असें म्हटलें होतें कीं, जर्मनीमध्यें हल्लीं जी निर-निराळीं लहान लहान संस्थानें आहेत तीं मोडून सगळ्या जर्मनीचें एक राष्ट्र करावें अशी आमची इच्छा आहे. हें कृत्य घडवून आणण्यासाठीं जर्मन संस्थानांतून निवडलेल्या प्रतिनिधींची एक सभा बनविली पाहिजे. सर्व जर्मनी-च्या राष्ट्राचें मिळून एक स्वतंत्र सैन्य तयार केलें पाहिजे. त्यावर एक स्वतंत्र कमांडर-इन-चीफ असावा व त्या सैन्याचें निशाणही स्वतंत्र असावें. त्याच-प्रमाणें सगळ्या जर्मन राष्ट्राचें मिळून एक स्वतंत्र आरमारही असणें फार

जरूरीचें आहे. जर्मनीमध्यें जे लहान लहान संस्थानिक आहेत, त्यांच्यामधील तंटे निवडण्याकरितां एक सर्वसाधारण न्यायासन पाहिजे, व तसेच सर्वसाधारण कायदेही पाहिजेत, अशा सूचना ह्या जाहीरनाम्यांत होत्या. ह्या जाहीरनाम्या-वरून लोकमताचा राजांवर किती पगडा बसलेला होता हें स्पष्टपणें दिसून येतें. ह्या वेळीं जीं लोकांचीं मतें तीं राजे बोलूं लागले होते. एकराष्ट्री-यत्वाची कल्पना मूळची लोकांची; पण ती राजांनीं आपली करून टाकिली इतकेंच नव्हे, तर सर्व जर्मन संस्थानांचें मिळून एक राष्ट्र बनलें असतां त्या-मध्यें प्रमुखत्व आपल्याकडे असावें अशाबद्दलही कित्येक राजांच्या खटपटी चालल्या होत्या. अखेरीस सर्व जर्मन संस्थानांतून आलेल्या प्रतिनिधींची एक सभा भरून तीमध्यें जर्मनीचें एकराष्ट्र करण्याचा निश्चय ठरला. व त्या एका राष्ट्राचा अध्यक्ष कोण होणार याविषयीं प्रश्न पुढें आला. ऑस्ट्रियन साम्राज्य हें त्या वेळीं विस्तारानें आणि सामर्थ्यानें फार मोठें होतें, तरी पण त्याची-देखील जर्मनीचें अध्यक्षस्थान आपल्या घराण्याकडे यावें अशाबद्दल खटपट चालली होती; व त्यासाठी ऑस्ट्रियन सरकारनें आर्च डयूक जॉन याला आपला प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. प्रशियाच्या राजाची तर ह्या प्रसंगीं खटपट फारच जारीनें सुरू होती व एखाद्या म्युनिसिपालिटीच्या निवडणकी-मध्यें एखादा साधारण उमेद्वार मतें मिळविण्यासाठीं धडपडत असतो त्या-प्रमाणें, प्रशियाच्या राजाची धडपड चालली होती. इतका एकराष्ट्रीयत्वाच्या मताचा अंमल राजांच्याही मनावर बसलेला होता. परंतु अखेरीस आर्च डयूक जॉन याचीच बहुमतानें निवडणूक झाली. नंतर आर्च डयूक जॉन ह्यानें फ्रँकफोर्ट या शहरीं मोठ्या इतमामानें प्रवेश केला, व लोकांनीं त्याचा आपला अध्यक्ष या नात्यानें मोठा सन्मान केला व नंतर त्यानें आपलें प्रधानमंडळ नेमून आपल्या कामाला सुरुवात केली. ह्याप्रमाणें जर्मनीच्या एकराष्ट्रीयत्वाला ह्या वेळेपासून प्रारंभ झाला. फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाल्याची नुसतीं बातमी जर्मनीमध्यें आल्याबरोबरच जर्मनीच्या लोकांना त्यांच्या राजांपासून बहुतेक हक्क प्राप्त झाले होते. त्यामुळें त्यांची एक स्वतंत्रतेची महत्त्वाकांक्षा सहजच परिपूर्ण झाली होती; व आपल्यांतील दुही मोडून आपलें एकराष्ट्र व्हावें ही जी त्यांची एकराष्ट्रीयत्वाची दुसरी महत्त्वाकांक्षा तीही अशा रीतीनें परिपूर्ण झाली. आतां ह्या वेळीं जी व्यवस्था झाली ती तशीच शेवटपर्यंत टिकली नाहीं हें खरें. आर्च डयूक

जॉन याची नेमणूक झाली हें प्रशियाच्या राजाला आवडलें नाहीं व ही व्यवस्था पुढें कांहीं वेळानें खुद्द ऑस्ट्रियाच्या बादशहालाही पसंत पडेनाशी झाली. तरी पण ह्या वेळीं ज्या स्वतंत्रतेला आणि ज्या एकराष्ट्रीयत्वाला सुरवात झाली ती स्वतंत्रता आणि तें एकराष्ट्रीयत्व ह्यांना पुढें चांगलीं फळें आलीं. हल्लीं जर्मन साम्राज्याचें जें वैभव दृष्टोत्पत्तीस येत आहे त्याचा उगम पाहूं गेल्यास तो ह्या १८४८ च्या राज्यक्रांतीमध्येंच दिसून येतो. त्या वेळीं जर्मन लोकांना स्वातंत्र्य आणि एकराष्ट्रीयत्व यांपासून काय फायदे आहेत हें कळलें व त्या गोष्टी जरी त्यांना त्या वेळीं कायमच्या साध्य झाल्या नाहींत तरी ते त्या स्वतंत्रतेच्या आणि एकराष्ट्रीयत्वाच्या खऱ्या वाटेला लागले असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा कामांत लोकांनीं भलत्याच वाटेला न लागतां सरळ वाटेला लागणें फार जरूरीचें असतें. जो बरोबर वाटेनें चालला आहे तो उशिरानें का होईना, परंतु आपल्या इष्ट मुक्कामाला जाऊन पोंचल्यावांचून कधींही राहावयाचा नाहीं.

---

## पसंहार : : : २१

काळ : अग्रलेख : ता. १३-३-१९०३

★ शेतें नांगरून ठेवलीं पाहिजेत म्हणजे स्वतंत्रतेचा पाऊस पडेल तेव्हां चांगलें पीक येईल.

पिकाची पाहणी संपली. सबब शंकुसांखळी, दुर्बीण निमतानदार, मोजणी-र वगैरे सर्व सामग्रीला आणि मंडळीला आतां आपण रजा देऊं. आतां कुसांखळीचें काम संपलें. आतां फक्त मनाचें काम राहिलें आहे. दुर्बिणींतून ळ्यानें पाहावयाचें तें पाहून झालें. आतां फक्त मनाच्या डोळ्यानें चौफेर हणी करावयाची राहिली आहे. ऑस्ट्रिया, हंगारी, इटली, जर्मनी वगैरे ताच्या चारी बाजूंनीं पायांनीं फिरून पाहावयाचें काम झालें. आतां फक्त नानें फिरावयाचें राहिलें आहे. डोळे, हात, पाय वगैरे सर्व मनाचे नोकर हेत. या नोकरांनीं केलेल्या पहाणीचा 'रपोट' मालकाकडे करावयाचें काम क्त उरलेलें आहे. सबब आतां आपण तिकडेच वळूं.

आपली हिंदु लोकांची समजूत चुकीची असो किंवा बरोबर असो, पण गांतील घडामोडी एखाद्या रहाटगाडग्याप्रमाणें नेहमीं चाललेल्या असतात, शी जी आपली समजूत, तिच्या पुष्टीकरणार्थ इतिहासामध्येंही अनेक पुरावे ळतात. एकदां एक देश वरती तर कांहीं दिवसांनीं तोच देश खालती, कदां एक लोक वैभवाच्या शिखरावर तर कांहीं दिवसांनीं तेच लोक दुःखाच्या हांत, अशा प्रकारची स्थिति ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते. दिवस गेला

म्हणजे रात्र यावी, सूर्य मावळला म्हणजे नक्षत्रें दिसूं लागावीं, उन्हाळा संपला म्हणजे पावसाळा प्राप्त व्हावा हे जसे सृष्टीमध्यें नियम दिसतात किंवा रहाट-गाडग्याचा एक लोटा रिकामा झाला म्हणजे दुसरा भरून यावा आणि चाकाची एक बाजू खालीं आली कीं, दुसऱ्या बाजूनें वर यावें, हे जसे व्यवहारामध्यें नियम दिसतात तसेच इतिहासांतील घडामोडींमध्येंही दिसून येतात. जगांतील क्षुद्र राजांचीं राज्यें आणि साम्राज्यें कायद्यानें चाललेलीं असोत किंवा नसोत, पण ईश्वराच्या साम्राज्यामध्यें कायदा खात्रीनें आहे आणि त्या कायद्याप्रमाणें त्याचा सर्व राज्यकारभार चाललेला आहे. त्याचा कायदा कधींही मोडला जाणार नाहीं अशी खात्री असल्यामुळेंच विपन्नावस्थेमध्यें सांपडलेल्या लोकांना आशा करण्याला पुष्कळ जागा असते

आतां रहाटगाडग्याच्या न्यायाप्रमाणें जें मडकें रिकामें झालें तें फिरून भरून येणारच असें जरी आहे, तरी तेवढ्यामुळें प्रत्येक मडक्याचें कांहीं निराळें कर्तव्यकर्म नाहीं असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. एखादें मडकें फुटलेलें असलें तर तें रहाटगाडगें शंभर फेऱ्या फिरलें तरी फुटक्या मडक्यांतून पाणी भरून वर कधींही येणार नाहीं व हीच गोष्ट राष्ट्रालाही लागू आहे. ईश्वराचा कायदा कधींही मोडला जावयाचा नाहीं, आणि तो कायदा असा आहे कीं, एका राष्ट्राला सुख आणि एकाला दुःख, अशी मालिका नेहमीं चालावयाची. तेव्हां या सुखदुःखाच्या मालिकेमध्यें आपलें सर्व राष्ट्र हल्लीं दुःखाच्या तडाक्या-मध्यें सांपडलें असलें तर ईश्वराच्या कायद्याप्रमाणें ही रहाटगाडग्यावरील माळ फिरतां फिरतां केव्हां तरी आपलें राष्ट्र सुखाच्याही तडाक्यामध्यें सांपडेल. तेव्हां त्यासाठीं आपण धडपड करून काय करावयाचें आहे, असा युक्तिवाद करून जर कोणी राष्ट्र आळशीपणामध्यें दिवस घालविण्याला उद्युक्त होईल तर मात्र तें कधींही बरोबर होणार नाहीं. रहाटगाडगें फिरत असलें तरी फुटकें मडकें पाण्यानें भरून वर कधींही यावयाचें नाहीं. त्याप्रमाणें राष्ट्राचा चक्र-नेमिक्रम चालला असला तरी आळशी, हताश, अल्पसंतोषी, साहसपराङ्मुख, विषयासक्त, दुर्बळ आणि निरुद्योगी अशा लोकांचें राष्ट्र कधीही वैभवाच्या शिखरावर येऊन पोंहोचावयाचें नाहीं. पाऊस पडला म्हणजे सर्व शेतांतून धान्य उगवतें हें खरें. त्याप्रमाणें चक्रनेमिक्रमाच्या ईश्वरी कायद्याच्या अनु-रोधानें खालीं गेलेलीं राष्ट्रें वर डोकीं काढतील हें खास. पण जें शेत नांगरलें

नाहीं किंवा ज्या शेतांत धान्य पेरलेलें नाहीं त्या शेतावर आकाशांतला सगळा पाऊस पडला तर धान्य कोठून उगवणार आहे ? त्याप्रमाणें ज्या राष्ट्रांतील जमीन नांगरलेली नाहीं आणि ज्या राष्ट्राच्या जमिनीमध्यें आपल्या भावी महत्त्वाचें बीज पेरलें गेलेलें नाहीं त्याच्यावर चक्रनेमिक्रमाच्या ईश्वरी कायद्याचा पाऊस पडला म्हणून या वर्षावानें काय व्हावयाचें आहे ? समुद्राच्या पाण्यांत स्नान करण्याचा ज्यांना कधीं काळीं प्रसंग आला असेल त्यांना हें माहीत असेल कीं, समुद्रांत स्नान करण्याला आपल्याला कांहीं प्रयास करावे लागत नाहींत. घरच्याप्रमाणें घंगाळांत तांब्या बुडवून तो आपल्या डोक्यावर ओतून घेण्याचे आयास तेथें नकोत. समुद्रांत थांबून थांबून लाटा उठत असतात त्यांतील एखादी लाट येऊन आपल्या अंगावरून गेली म्हणजे आपल्याला विन आयासानें स्नान घडतें. भौतिक समुद्रांत जशा लाटा उठतात तशाच राजकारणाच्या समुद्रांतही मधून मधून लाटा उसळत असतात. अशा एखाद्या लाटेमध्यें जीं राष्ट्रें सांपडतात तीं ह्या ऐहिक दुःखापासून आणि बंधनापासून मुक्त होऊन समुद्रस्नानानें सहज उद्धरून जातात. पण हें जरी खरें असलें तरी राजकारणाच्या समुद्रामध्यें जेव्हां अशी एखादी लाट उसळते तेव्हां ज्या राष्ट्राला उद्धरून जावयाचें आहे त्यानें त्या लाटेच्या मार्गामध्यें तरी असावयाला पाहिजे आहे.

सारांश, राष्ट्राच्या उन्नतीचीं सामान्य कारणें आपल्या क्रमाप्रमाणें कार्यें घडवून आणीत असलीं तरी त्या राष्ट्राच्या उन्नतीला ज्या कांहीं विशेष कारणांची आवश्यकता असते त्यांच्याकडे राष्ट्रांतील लोकांनीं पूर्णपणें लक्ष पोहोंचविलें पाहिजे. आतां तीं विशेष कारणें कोणतीं या प्रश्नाकडे वळूं. एका राष्ट्राच्या उन्नतीला ज्या गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांनींच दुसऱ्या राष्ट्रांमध्यें उन्नति खात्रीनें होईल, असें म्हणतां यावयाचें नाहीं. तरी पण अठराशें अठ्ठेचाळीस सालानंतर यूरोपखंडामध्यें जी एक राज्यक्रांतीची लाट अनेक ठिकाणीं उसळली तिचें निरीक्षण केलें असतां सर्व साधारण अशा कित्येक गोष्टी आढळून येतात. फ्रान्समधील पहिली राज्यक्रांति झाली तेव्हांपासून यूरोपखंडांतील वातावरण बदलून गेलेलें होतें. राजांच्या जुलमी अमलाचा ज्या त्या लोकांना अगदीं वीट येऊन गेला होता. स्वतंत्रतेशिवाय लोकांना दुसरें कांहीं दिसत नव्हतें. तिकडील बहुतेक लोक सुशिक्षित आणि त्यांना शस्त्रें मिळणें फारसें अवघड

नव्हतें. राज्यक्रांतीच्या कामीं शिक्षण आणि शस्त्रें या दोन गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. शिक्षणानें राजकारणांतील पुष्कळ गोष्टी समजूं लागतात. आपलें कोणतें, आणि दुसऱ्याचें कोणतें, अमुक वस्तूंवर आपला हक्क कां नाहीं दुसऱ्याचा हक्क कां आहे, इत्यादि अनेक प्रश्नांबद्दलचा उजेड डोक्यामध्यें फक्त शिक्षणामुळेंच पडूं शकतो. स्वतंत्रतेबद्दलची प्रीति हें सगळ्या शिक्षणाचें पर्यवसान होय. ज्या डोळ्यांनी आपल्या अगदीं समोरचीही वस्तु दिसलीं नाहीं ते डोळे जसे फुकट, त्याप्रमाणेंच ज्या शिक्षणानें आपल्या स्वतंत्रतेची कल्पना आपल्या मनाला दिसूं लागली नाहीं तें शिक्षणही फुकट. पुष्कळ पुस्तकें वाचणें म्हणजे शिक्षण नव्हे. शिकावयाचें तें ज्याच्यायोगानें शिकलें जातें तेंच शिक्षण होय. नाहीं तर एखाद्या लांकडाच्या कपाटामध्येंही बुकें काय थोडीं असतात? म्हणून तें कपाट सुशिक्षित झालें म्हणून कोणी समजत नाहीं. तद्वतच मनुष्यांची गोष्ट आहे. अशिक्षित लोकांच्या हातून देशोन्नतीचीं कार्यें होत नाहींत असें नाहीं. पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. एखादा आंधळा मनुष्यही रस्त्यानें सुरक्षितपणें जातो म्हणून मार्ग आक्रमण करण्याला डोळ्यांची आवश्यकताच नाही असें मानणें बरोबर होणार नाहीं. यासाठीं ज्या राष्ट्राला आपलें डोकें वर काढावयाचें आहे त्याचें तें डोकें पहिल्यानें सुसंस्कृत झालें पाहिजे; म्हणजे अर्थात् तेथील लोक सुशिक्षित झाले पाहिजेत. आता शिक्षणानें राष्ट्रांतील सर्व लोक महापंडीत झाले पाहिजेत. याचा असा अर्थ नाहीं तर आपल्या राष्ट्राला ज्या कांही गोष्टी आवश्यक असतील त्या समजण्याइतकें ज्ञान लोकांना प्राप्त होऊन त्या गोष्टींबद्दल सर्व राष्ट्राची एकवाक्यता होणें हाच शिक्षणाचा सुपरिणाम होय हंगारी देशानें स्वतंत्रतेसाठीं प्रयत्न केले, किंवा इटली देशानें स्वतंत्रता मिळवली म्हणजे तेथील प्रत्येक इसम त्या वेळीं दहा दहा परीक्षा देऊन फर्डा पदवीधर बनला होता असा अर्थ मुळींच नाहीं. आपल्या देशाला हितावह गोष्ट कोणती आहे हें त्या सर्व लोकांना चांगलें समजलें होतें व सर्वांची त्याबद्दल एकवाक्यता झाली होती. हेंच शिक्षण आणि हाच शिक्षणाचा सुपरिणाम. शाळेच्या, कॉलेजाच्या किंवा परीक्षेच्या हॉलच्या पायऱ्या झिजवणें हें शिक्षण नव्हे.

परंतु शिक्षणानें जरी सर्व लोकांचीं मनें एकाच स्वदेशोन्नतीसाठीं उत्सुक झालीं तरी शस्त्रांवांचून त्यांचा कांहीं एक उपयोग नाहीं. शिक्षण हें शस्त्रांवांचून

लंगडें आहे. परंतु युरोपांतील लोकांना १८४८ सालच्या राज्यक्रांतीच्या वेळीं शस्त्रांची उणीव कोठेंच पडली नाहीं. प्रस्तुत प्रसंगीच्या इतिहासावरून असें दिसून येतें कीं, राजांचीं जीं शस्त्रें होतीं तीं लोकांचीं झालीं. राजांचीं जीं शस्त्रागारें होतीं तीं लोकांचीं शस्त्रागारें झालीं. इतकेंच नव्हे तर राजांचे जे शिपाई होते तेच लोकांचे शिपाई झाले. शिक्षणानें लोकांचीं मनें फिरल्यावर वाटेल तें फिरूं शकेल. मग राजांचीं शस्त्रें राजांवर फिरलीं म्हणून त्यांत आश्चर्य तें काय ? सुशिक्षणापासून राष्ट्रामध्यें पाहिजे त्या गोष्टी घडून येणें शक्य आहे. शिक्षणापासून सव कांहीं मिळतें तर शस्त्रें मिळणें फारसें अशक्य आहे असें नाहीं. युरोपियन इतिहासामध्यें अशींही कित्येक उदाहरणें आहेत कीं, एखादा देश स्वतंत्र होऊं लागल्यास त्याच्या शेजारच्या देशानें त्याला चोरून शस्त्रांचा पुरवठा केलेला आहे. रशियानें यूरोपच्या पूर्वेकडील भागांतील लहान लहान देशांना चोरून शस्त्रांचा पुरवठा पुष्कळ वेळां केलेला आहे. पण शस्त्रें मिळालीं तरी त्यांचा उपयोग करण्याचें ज्या लोकांना कधीं माहीत नाहीं, त्या लोकांना तीं निरुपयोगी आहेत, असें सकृद्दर्शनीं वाटणें साहजिक आहे; व असें असून युरोपांतील राज्यक्रांतिकारक लोकांना यश कसें आलें, हा एक प्रश्न आहे. परंतु इतिहासामध्यें असे प्रसंग जेथें जेथें आलेले आहेत तेथें तेथें लढाईच्या शास्त्राची पूर्वीं कांहीं माहिती नाहीं म्हणून कोणाचें फारसें अडलें आहे, असें दिसत नाहीं. लढाईचें शास्त्र म्हणजे मारण्याचें शास्त्र. त्या शास्त्रांत निष्णात होण्याला फारशी बुद्धि लागते असें नाहीं. बळकटपणा आणि साहस हे गुण अंगांत असले म्हणजे हें लढण्याचें काम फारसें कठीण आहे असें नाहीं. आपण एखाद्याला चांगला सेनापति म्हणून म्हणतों याचा अर्थ काय ? याचा अर्थ इतकाच कीं, तो पुष्कळ लोकांना मारूं शकतो. आणि जो कमी लोकांचे प्राण घेतो तो वाईट सेनापति ! रणांगणावरून माघारा कोणता शिपाई बोलावला जातो, तर ज्याला पुष्कळ लोकांचे प्राण घेतां येत नाहींत तो; आणि थोडक्या वेळांत अतिशय लोकांच्या प्राणांची कत्तल करण्यामध्यें ज्याची प्रख्याति असा सेनापति त्याच्या जागीं पाठविला जातो. ज्याला पुष्कळ लोकांचे प्राण घेतां येतात, त्याचा जयजयकार होतो, त्याची बढती होते. त्याला पदव्या मिळतात, आणि त्याला मान प्राप्त होतो. ह्या सगळ्या प्रकारावरून असें दिसून येईल कीं, लढ-

ण्याचें शास्त्र म्हणजे प्राण घेण्याच्या शास्त्राहून दुसरें कांहीं नाहीं. या शास्त्रांत लोक लवकर पारंगत होतात. हातांत बंदूक असली आणि तिची गोळी दुसऱ्या· वर झाडली कीं, ती गोळी त्याचा प्राण घेते. आणि हातांत तरवार असली आणि ती दुसऱ्याच्या मानेवर टाकली तर ती तरवार त्याची मान कापते; आणि ज्याचा प्राण घ्यावयाचा तो जर आपल्याजवळ नसेल तर आपण एखाद्या घोड्यावर बसलें म्हणजे तो घोडा आपल्याला त्याच्याजवळ नेतो. ह्या दोनतीन साध्या गोष्टी ठाऊक असल्या म्हणजे लढाईच्या शास्त्रांतील पांडित्य प्राप्त करून घेण्याला कोणाला फारशी अडचण पडत नाहीं. रिक्रूट करून पलटणींत भरती झाली आणि अंगावर शिपायाचें डगलें घातलें म्हणजे कोणी हवा तो मनुष्य शिपाई होतो. आतां ह्या जरी सर्व गोष्टी खऱ्या आहेत; तरी शिकलेल्या शिपायांची बरोबरी नवशिक्या शिपायांना कधींही यावयाची नाहीं, लढाईच्या शास्त्रांत फारसें कांहीं कठीण नाहीं हें तर खरेंच; पण कांहीं गुण संवयीनेंच यावयाचे असतात; व यासाठीं ज्यांनीं लष्करी खात्यांत कांहीं दिवस उमेदवारी केली आहे ते शिपाई-च बहुत करून जास्त चांगले असतात. अशा प्रकारचें शिक्षण सामान्य लोकांना मिळण्याचा फारसा मार्ग नसतो. तरी पण या बाबतींत जर्मनीनें आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांना लष्करी शिक्षण देऊन ठेवण्याची जी युक्ति योजून ठेवली होती, ती विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. प्रसंगाशिवाय मनुष्याला युक्ति सुचत नाही. प्रशियानें अमुकच सैन्य आपल्या पदरीं ठेवावें असा नियम नेपोलियननें घालून दिला नसता तर सगळ्या जर्मन राष्ट्रांतील लोक लष्करी शिक्षणांत तरबेज कधींही झाले नसते. जर्मन लोकांवर नेपोलियननें हा नियम लादला नसता तर कदाचित् जर्मनींचे लोक जे इतके पुढें सरसावले ते कधींच सरसावले नसते. वास्तविक पाहिलें असतां प्रत्येक देशांतील प्रत्येक मनुष्याला जर्मनींतल्याप्रमाणें लष्करी शिक्षण थोडेंबहुत तर मिळालेंच असलें पाहिजे. ईश्वरानें मनुष्याच्या आयुष्याचे जे विभाग केलेले आहेत त्यांच्याकडे लक्ष देऊन पाहिलें असतां मनुष्याला बाल्यावस्थेमध्यें शांतरसाची जशी अपेक्षा आहे, तशी-च त्याच्या तरुणपणामध्यें त्याला वीररसाचीही अपेक्षा असली पाहिजे असें दिसतें. तरुण वयांत मनुष्याचे अंगांत जी शक्ति खेळत असते ती त्यानें वीररसाचीं, शौर्याचीं आणि पराक्रमाचीं मोठमोठीं कामें करावीं म्हणून परमेश्वरानें त्याला दिलेली असते. मनुष्याचें तारुण्याचें वय हें शौर्याचें उत्तम पीक देणारें एक

पहिल्या प्रतीचें शेत होय. त्या शेतांत मशागत करून त्यापासून चांगलें पीक काढून घेणें यांतच शेतकऱ्यांचें हित आहे. पण तसें न करितां असलीं असंख्य शेतें जाणून बुजून ओसाड टाकणें व जेथें उत्तम तांदूळ किंवा गहूं यांच्यासारखें धान्य पिकलें असतें तेथें निवळ गवत उगवूं देऊन त्या जमिनीची खराबी करून टाकणें हें खऱ्या शेतकऱ्याचें काम नव्हे. आतां असा एक प्रश्न येतो कीं, प्रत्येक मनुष्य शिपाई होण्याला योग्य असतो कीं नाहीं? यावर उत्तर एवढेंच आहे कीं, जो अशक्त किंवा दुर्बळ आहे किंवा ज्यांची वीररसाकडे प्रवृत्ति नाहीं ते लोक पाहिजे तर वगळावे. परंतु बाकी सर्वांना लष्करी शिक्षण कांहीं दिवसपर्यंत तरी अवश्य मिळालेलें असावें. पुष्कळ लोकांमध्यें अशी एक सामान्य समजूत आहे कीं, लढाईच्या किंवा शिपाईगिरीच्या कामांत कांहीं विशिष्ट देशांतील आणि कांहीं विशिष्ट जातीचेच लोक योग्य आहेत. पण हाही एक मोठा भ्रम आहे. सृष्टि निर्माण करतांना ईश्वरानें आपणाकडून काहीं पक्षपात केलेला नाहीं. एखाद्या देशांतल्या किंवा एखाद्या जातीच्याच लोकांना चार हात दिले आहेत आणि बाकीच्यांना दोन हात दिले आहेत, असें नाहीं. ईश्वरानें निर्माण केलेले सर्व लोक सारखे आहेत. खिन्न आणि निराश झालल्या मनुष्या, तूं विनाकारण आपल्या मनाला खेद मानून घेत आहेस. तुझ्यांत आणि दुसऱ्यांत कांहीं एक फरक नाहीं. जसें दुसऱ्याचें मनगट तसेंच तुझें मनगट आहे. दुसऱ्याची छाती तशीच तुझी छाती आहे. आणि जसें दुसऱ्याचें डोकें तसेंच तुझेंही डोकें आहे. दुसऱ्यांनीं जे पराक्रम केले ते तूंही कां करूं शकणार नाहींस? तूं करून पहा, म्हणजे तुझ्यामध्यें काय सामर्थ्य आहे तें तुला दिसून येईल. चंदन घासल्यावांचून त्याच्यांतून सुगंध बाहेर पडत नाहीं! आणि घर्षणावांचून लांकडामध्यें असलेली ज्वाळा दृष्टोत्पत्तीस येत नाहीं! वास्तविक अशी स्थिति आहे. एक जातीचे लोक लढाईंत चांगले आणि दुसऱ्या जातीचे वाईट हा भेद भ्रमात्मक आहे. आतां कांहीं नैसर्गिक कारणांनीं कांहीं लोकांच्या अंगांत कांहीं गुण विशेष वृद्धिंगत होतात आणि कांहीं तसेच अपरिपक्कावस्थेमध्यें पडून राहतात. डोंगरांत राहणाऱ्या लोकांच्या अंगांत स्वाभाविकपणेंच राकटपणा आणि कंटकपणा हे गुण येतात. अवघड कडे चढणें, कांट्यांमधून आणि दगडांमधून चालणें, थंडी, वारा, पाऊस, ऊन, तहान जें असेल तें सोसणें, घरावांचून राहणें आणि अंथरुणावांचून निजणें, ताटावांचून जेवणें आणि भांड्यावांचून पाणी पिणें, इत्यादि

अनेक कारणांनीं डोंगराळ लोकांच्या अंगांमध्यें लढाईच्या कामीं उपयोगीं पडणारे बरेच गुण अनायासानें आलेले असतात. शिवाय शिकार ही एक लढाईची शाळाच आहे. त्या शाळेंत पोटासाठीं डोंगराळ मनुष्याला रोजचें कांहीं ना कांहीं तरी तास दवडावे लागत असल्यामुळें, शत्रूला कसें कोंडावें, कसें मारावें, तो उलटला तर कसें पळावें, कसें लपावें आणि तो पळूं लागला तर त्याचा कसा पाठलाग करावा, इत्यादि गोष्टी मनुष्याला सहजपणें कळून येतात. जशा डोंगराळ मुलखांत शौर्याच्या खाणी सांपडतात, तशींच समुद्रकिनाऱ्यावरही शौर्याचीं मोतीं बहुशः दृष्टोत्पत्तींस येतात. समुद्र हे पर्वतांचे विपर्यास होत. अथवा समुद्र म्हणजे पालथे ठेविलेले पाण्याचे पर्वतच होत. ते जर उताणे केले, तर त्या पाण्याच्या पर्वतांच्या शिखरांची उंची इतर पर्वतांसारखीच भरेल. ह्या उपडच्या ठेविलेल्या पर्वतांच्या विस्तीर्ण तळभागावरून फिरण्यामध्येंही साहसाची जरूरी लागते. समुद्रांतील प्रचंड लाटा, उग्र फेंस, सोसाट्याचे वारे, अक्राळ-विक्राळ स्वरूपानें पुढें आलेले किंवा गुप्तपणानें पाण्याच्या खालीं छपून बसलेले खडक, ढगांचा काळोख, तुफानाची हवा आणि वादळांचा गोंधळ, यांच्याशीं रात्रंदिवस झगडण्याचा ज्यांना प्रसंग आहे, ते लोक शूर बनलेच पाहिजेत. ह्या पंचमहाभूतांनीं समुद्रावर माजविलेल्या बंडामध्यें जो भित्रा मनुष्य असेल त्याचा निभाव लागावयाचाच नाहीं. अशा प्रसंगांत लोण्याचें अंतःकरण असलें तरी तें लोखंडाचें बनेल.

अशा कांहीं नैसर्गिक परिणामांनीं मनुष्याचें शौर्य कांहीं जास्त परिपक्क होतें हें खरें; व त्या मानानें पाहिलें असतां सपाट प्रदेशावर राहणारे लोक, शहरांतून राहणारे लोक, चुलीपाशी राहणारे लोक वगैरे मंडळीमध्यें शौर्य, धैर्य, साहस, इत्यादि गुणांचें मान कमी असतें. पण बाकी पाहिलें असतां सर्व देशांतील आणि सर्व जातींचे लोक सारखेच शूर होत. हा नुसत्या मनुष्याच्या शौर्याचा विचार झाला. परंतु शौर्याची कसोटी ठरण्यासंबंधानें दुसरा एक खोटा विचार प्रचलित झालेला आहे. यांत्रिक सुधारणेनें हल्लीं प्राण घेण्याचीं पुष्कळ नवीन नवीन साधनें निर्माण झालेलीं आहेत, आणि त्या साधनांचा उपयोग करून जे दुसऱ्यांचे प्राण घेतात ते शूर व बाकीचे भित्रे असें मानण्याचा एक प्रघात हल्लीं सुरू आहे. पण हा बरोबर आहे काय ? एखाद्या मनुष्यानें एखाद्या तोफेनें शंभर लोकांचे खून केले तर यांत शौर्य कोणतें ? वास्तविक पाहतां हें त्या

तोफेचें शौर्य होय. हल्लीं तोफा शूर आहेत, हल्लीं मॉझर बंदुका शूर आहेत, हल्लीं मशिनगन्स शूर आहेत, हल्लीं बिनधुराची दारू शूर आहे, असें म्हटलें तर तें बरोबर होईल. हीं साधनें वापरणोर शूर कसले ! हीं साधनें जो जो कोणी वापरील तो तो मग शूर होऊं लागेल. सारांश, हल्लींची शौर्याची कल्पना थोडीशी बदललेली आहे. यंत्राच्या शौर्याचा अध्यारोप माणसावर केला जातो. पण ही चूक आहे. मुख्य प्राधान्य मनुष्याच्या शौर्याला पाहिजे आहे व यंत्रें हीं त्या शौर्याचीं अंगभूत साधनें असलीं पाहिजेत. आतां सर्व मनुष्य बहुतकरून सारखेच शूर असतांना एक जय पावतात आणि दुसरे पराजय पावतात असें जें होतें त्याला युक्तीचेंही एक कारण आहे. इतिहासांतून आपण लढायांचीं वर्णनें वाचलीं तर त्यांत निव्वळ शौर्यानें जिंकलेल्या अशा लढाया फार थोड्या. एका पक्षाची कांहीं तरी युक्ति साधते, आणि दुसरा पक्ष कोठें तरी फसला जातो; आणि त्यामुळें जयापजय उत्पन्न होतात. सारांश, सर्व मनुष्यें शौर्यानें बहुतेक सारखींच असलीं तरी लष्करी शिक्षण, सुधारलेलीं शस्त्रें आणि अचाट कल्पकतेनें सुचविलेल्या युक्त्या यांचाही रणांगणावर फार उपयोग होतो.

१८४८ मधील युरोपांतील राज्यक्रांतीच्या वेळीं इटली आणि जर्मनी ह्या दोन देशांमध्यें जी एक नवीन कल्पना उत्पन्न झाली होती आणि जी तेथील लोकांना आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयासाठीं आवश्यक वाटू लागली होती, तीही फार विचार करण्यासारखी आहे. एकाच देशांतील सर्व लहान लहान राजांनीं एकत्र व्हावें, ही कल्पना इटलींत आणि जर्मनींत निघाली, आणि हंगारीमध्यें ही निघाली नाहीं, किंवा खुद्द फ्रान्समध्यें ही निघाली नव्हती, याचें कारण अगदीं उघड आहे. इटलींतील किंवा जर्मनींतील लहान लहान राज्यें निरनिराळीं राहून जर ती शत्रूपाशीं लढलीं असतीं तर गेल्या दोन शतकां-तील हिंदुस्थानांतील लहान लहान राज्यांप्रमाणें त्या राज्यांचा त्यांच्या शत्रूंनीं उच्छेद करून टाकला असता. हिंदुस्थानांत जेव्हां इंग्रज, फ्रेंच, डच वगैरे येऊन हातपाय पसरू लागले, त्या वेळीं तेथील राजांनीं जी मोठी चूक केली ती हीच कीं, ते प्रत्येकजण निरनिराळे राहून परकीय शत्रूंशीं लढले. इंग्लिश किंवा फ्रेंच हे कर्नाटकाच्या किंवा अर्काटच्या एकट्या नबाबाला भारी होते; पण ते जर एकत्र झाले असते, तर त्यांनीं त्या वेळीं इंग्लिशांवर किंवा फ्रेंचांवर खात्रीनें जय मिळविला असता. इटलींतल्याप्रमाणें किंवा जर्मनींतल्या-

प्रमाणें हिंदुस्थानांतील राजांनीं त्या वेळीं जर संयोगसंधीच्या योगानें एकोपा केला असता, तर पोटांतील सर्व लहान लहान राज्यें कायम राहून त्यांच्यावर आलेल्या परचक्राचेंही निवारण झालें असतें पण त्या वेळीं हिंदुस्थानांत इतक्या विशाल आणि उदात्त कल्पनांचा पुरुषच कोणी नव्हता. मराठेशाही-मध्यें ही एकोप्याची कल्पना कांहीं थोडीबहुत उत्पन्न झाल्यासारखी वाटत होती, पण दुर्दैवानें तीही फार दिवस टिकली नाहीं. इटलीमध्यें चार्लस आल्बर्ट किंवा व्हिक्टर इमॅन्युएल ह्यांच्यासारखे जसे राजे झाले तशा कल्पनांचे हिंदुस्थानांत त्या वेळीं कोणीही राजे नव्हते; व जर्मनीमध्यें स्वतंत्रतेसाठीं पाहिजे ते करण्याला जसे लोक तयार झाले होते तसे लोकही या वेळीं हिंदुस्थानांत नव्हते. राष्ट्रीय स्वातंत्र्याची कल्पना त्या वेळीं हिंदुस्थानांत नव्हती असें म्हटलें तरी चालेल. शौर्य, धाडस, पराक्रम हे गुण हिंदुस्थानांत होते. आपापल्यापुरता आत्माभिमान किंवा प्रांताभिमान किंवा जात्याभिमानही होता. मात्र देशाभिमान होता किंवा नाहीं हा प्रश्न आहे जर्मन लोकांच्या मनांत जो स्वदेशाभिमान आणि जी स्वातंत्र्यप्रीति उचंबळली होती, तशी हिंदुस्थानांत कोठेंही दिसून आली नाहीं. एकराष्ट्रीयत्वाची कल्पना, आपसांत न भांडतां परशत्रूशीं सगळ्यांनीं एक होऊन लढण्याची कल्पना ह्या त्या वेळीं नव्हत्या. जो देश अफाट आहे आणि ज्यामध्यें पुष्कळ निरनिराळीं राज्यें आहेत, त्यांच्यावर परचक्र आलें असतां इटलीनें किंवा जर्मनीनें स्वसंरक्षणाचा जो मार्ग स्वीकारला तोच उत्तम होय.

वर नमूद केलेलीं कित्येक महत्त्वाचीं तत्त्वें युरोपियन राष्ट्रांनीं उपयोगांत आणलेलीं होतीं. लोकांचीं मनें राजांच्या जुलमांनीं अगदीं विटून गेलीं होतीं व आपला देश उन्नतीला येण्याकरितां त्याला आणि त्यांतील लोकांना पूर्ण स्वतंत्रता जरूर असली पाहिजे, ह्या गोष्टी त्यांच्या हाडामांसांत खिळून गेल्या होत्या. शिक्षणाच्या योगानें त्यांना राष्ट्रीय ऐक्याची किंमत पूर्णपणें कळून चुकलेली होती. विद्यार्थ्यांना अभ्यासापेक्षां राज्यक्रांतीमध्यें जास्त गोडी लागली होती. व्यापाऱ्यांना नफ्यापेक्षां राष्ट्रीय स्वतंत्रता जास्त प्रियकर झाली होती. आणि राजांना आपल्या खाजगी लहानशा राज्यापेक्षां आपल्या देशाचें लोकसत्तात्मक राज्य जास्त हितकारक दिसूं लागलें होतें. सरदार आणि शेतकरी आपसांतील उच्चनीच भाव आपल्या देशासाठीं बाजूला ठेवण्याला तयार

झाले होते. फार काय, आपला देश, आपली स्वतंत्रता आणि आपलें एक-राष्ट्रीयत्व यांच्या प्राप्तीसाठीं त्या वेळीं हंगारी, इटली, जर्मनी वगैरे ठिकाणचे लोक आपलें घरदार, संपत्ति, ऐषआराम, बायकामुलें इतकेंच नव्हे तर स्वतःचे प्राणही खर्चीं घालण्याला तयार झाले होते. अशा प्रकारची त्या राष्ट्रां-ची तयारी झालेली असल्यामुळें जेव्हां त्यांच्यावर स्वतंत्रतेची लाट आली तेव्हां ते स्वतंत्र होऊन गेले; आणि त्यांनीं आपलीं शेतें उत्तम प्रकारें नांगरून ठेवलीं होतीं म्हणून जेव्हां स्वतंत्रतेचा पाऊस पडला तेव्हां त्यांच्या शेतांतून चांगलें पीक आलें. त्या वेळीं शेतांत पिकलेलें धान्य तीं राष्ट्रें अजून खात आहेत व तें त्यांना आणखीही कित्येक वर्षे पुरेल !

---

## मनोराज्य : : : २२

काळ : अग्रलेख, ता. २०-३-१९०३

★ आम्ही स्वतंत्र असतों तर राज्यारोहणामध्यें मोठा विरस झाला असता.

मागील अंकीं पिकाच्या पाहणीच्या उपसंहारासंबंधानें लिहीत असतांना त्या लिहिण्याच्या ओघांत इटली आणि जर्मनी यांच्या सादृश्यावरून असा एक विचार आला होता कीं, हिंदुस्थानावर पाश्चिमात्य राष्ट्रांचीं परचक्रें येऊं लागलीं त्या वेळीं हिंदुस्थानांतील राजे एक झाले नाहींत म्हणून त्यांच्यावर पुढें अनेक दुर्धर प्रसंग कोसळले. पण ह्या विचाराच्या पुढेंच दुसरा एक विचार मनामध्यें असा आला कीं, जर त्या वेळीं हिंदुस्थानांतील राजे आणि सामान्य लोक हे एक झाले असते तर काय झालें असतें, तर त्याचे हिंदुस्थानावर काय परिणाम घडले असते, आणि त्या परिणामांच्या योगानें हिंदुस्थानांत काय काय फरक पडून आज हें आपलें हिंदुस्थान कोणत्या स्थितीमध्यें असतें ? हे जे अनेक तरंग मनांत उभे राहिले त्यांचा त्या लेखाशीं फारसा संबंध नसल्यामुळें ते त्या वेळीं तसेच दाबून ठेवणें भाग पडलें. परंतु वर दिलेले प्रश्न हे एक दृष्टीनें महत्त्वाचे असल्यामुळें त्यांचाच स्वतंत्रपणें विचार करण्याचें आज योजिलें आहे.

हिंदुस्थानची हल्लीं किती दीन दशा झालेली आहे, हें प्रत्येकाला दिसतच आहे. आणि फ्रेंच लोक किंवा डच लोक हिंदुस्थानावर स्वारी करण्याला येऊं

लागले त्या वेळीं हिंदुस्थानांतील राजे आणि हिंदुस्थानांतील लोक हे सर्व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां एक झाले असते तर त्या गोष्टीचे आज हिंदुस्थानावर किती चांगले परिणाम झाले असते हें आपल्याला आतां पाहवयाचें आहे. आपल्या हल्लींच्या दीन स्थितींत ते चांगले परिणाम पाहवयाचे म्हणजे कल्पनाशक्तीनें आपल्याला पुष्कळच मदत केली पाहिजे. आपली कल्पनाशक्ति आपल्याला हातांत धरून जर ते चांगले परिणाम दाखविणार नाहीं, तर ते आपल्याला कधींही दिसावयाचे नाहींत. वस्तुस्थितीच्या काळोखांत पृथ्वीच्या तळाशीं बसून ते परिणाम आपल्याला कधींही दृग्गोचर व्हावयाचे नाहींत. कल्पनारूपी पाक्षिणीच्या पंखांवर बसून आपण हें भूतल सोडून उंच वातावरणामध्यें भराऱ्या मारिल्या पाहिजेत, तरच आपल्याला हा सुंदर आणि स्पृहणीय देखावा पाहण्याला मिळणें शक्य आहे. हिंदुस्थानचा नकाशा हल्लीं रक्तरंगानें किती लालभडक झाला आहे, हें आपल्याला प्रत्यक्ष दिसतच आहे. पण दीडशें वर्षांच्या पूर्वीं जर हिंदुस्थानांतील राजे आणि हिंदुस्थानांतील लोक परचक्राच्या निवारणासाठीं, स्वतंत्रतेच्या संरक्षणासाठीं आणि एकराष्ट्रीयत्वाच्या संस्थापनेसाठीं एक झाले असते, तर हिंदुस्थानचा नकाशा आज जसा दिसला असता तसा तो रंगविणें असेल तर त्यासाठीं लागणारे रंग ह्या जड पृथ्वीच्या पोटांतील खाणींत सांपडावयाचे नाहींत. रंगाचे पेले प्रत्यक्ष कल्पनादेवीनेंच भरून आपल्या हातांमध्यें आणून दिले पाहिजेत. अंतरिक्षांत संचार करणाऱ्या ढगांचे क्षणोक्षणीं पालटणारे रंग, अरुणोदयाच्या वेळपूर्वींचे पूर्वेकडील आकाशांतील रंग, अस्तमानानंतर संधिप्रकाशाचे रंग, कालाच्या अनंत अवधीमध्यें संचार करणाऱ्या चित्ताला पसंत पडलेले निराशेचे आणि आशेचे चंचल रंग, ढगांमध्यें सूर्यकिरणांप्रमाणें मनामध्यें ईश्वरी चैतन्य प्रतिबिंबित झाल्यानंतर त्या मनामध्यें लखलख लखलख करूं लागणारे तेजोमय रंग, इत्यादि निरनिराळ्या तऱ्हेच्या रंगांच्या संमिश्रणानें, विनिर्मित अशा रंगानें भरलेले सुवर्णाचे पेले आणि चित्रफलकावर चित्रें काढण्याच्यापूर्वीं चित्रकार ज्या कलमानें चित्र काढतो, किंवा कागदावर कविता लिहिण्याच्या आधीं कवि ज्या कलमानें कविता लिहितो तें दिव्य आणि स्पर्शरहित कलम कल्पनादेवीनें आपल्याजवळ आणून दिलें, तरच वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारचा हिंदुस्थान देशाचा नकाशा आपल्याला काढतां येईल. पण ही सामग्री ज्यांच्यापाशी नाहीं, व हतभाग्याला

ब्रह्मविद्येप्रमाणें ज्यांच्या मनाला कल्पनाशक्ति कधीं शिवलीच नाहीं आणि आळशी मनुष्यावर संपत्तीच्याप्रमाणें ज्यांच्यावर कल्पनादेवीची प्रसन्नता कधीं झालेलीच नाहीं, त्यांना हिंदुस्थानचा नकाशा कसा झाला असता हें दिसणें अशक्य आहे. सारांश, जे अधिकारी आहेत त्यांनाच घेऊन आपण आतां या प्रस्तुत विषयाकडे वळूं.

हिंदुस्थान देश ही परदेशांतील दरवडेखोरांची उतारपेठ, परदेशांतील वाटमाऱ्यांची धर्मशाळा, परदेशांतील लुटारूंचें सदावर्त आणि परदेशांतील चांचे लोकांचें अन्नछत्र, अशी स्थिति पुष्कळ दिवसांपासून चालत आलेली होती. हिंदुस्थानांतील लोक हिमालयाच्या आणि विंध्याचलाच्या गुहांमधून तपश्चर्या करीत असतांना, कुरुक्षेत्रांत आणि ब्रह्मावर्तांत यज्ञयागादि कर्में करीत असतांना, सरस्वतीच्या आणि गंगेच्या तीरांवर स्नानदानतपोनियमादिकांचें आचरण करीत असतांना, व मंदिरांतून आणि अरण्यांतून रामायण आणि भारत यांचें पठण करीत असतांना, त्या निरुपद्रवी आणि ब्रह्मकर्मांमध्यें निमग्न झालेल्या लोकांवर परदेशच्या महत्त्वाकांक्षी पुरुषांनीं थोड्याथोडक्या स्वाऱ्या केल्या आहेत असें नाहीं. प्रथमत: हिंदुस्थानावर ज्या स्वाऱ्या आल्या त्या सर्व वायव्य दिशेकडून आल्या. इराणचा राजा डरायस यानें इराणमधून येऊन सिंधुनदा-पर्यंत प्रांत काबीज केल्याचें इतिहासावरून दिसतें. परंतु मॅसिडोनियामध्यें अलेक्झांडर हा एक राजा अतिशय प्रबळ होऊन त्यानें इराण देश काबीज केला, व तेथून हल्लीं ज्याला अफगाणिस्थान म्हणतात तो बॅक्ट्रियाचा भाग पादाक्रांत करून अलेक्झांडरनें सिंधुनद उतरून पंजाबमध्यें प्रवेश केला व बियास नदीपर्यंत त्याच्या सैन्यानें सर्व प्रांत पादाक्रांत करून टाकला, तेव्हांपासून गिझनीच्या महंमदापर्यंत बारीकसारीक स्वाऱ्या वायव्य दिशेकडून हिंदुस्थानावर येत होत्या. पण गिझनीच्या महंमदाच्या स्वाऱ्या त्या सर्वांमध्यें जास्त विघातक झाल्या. गिझनीच्या महंमदाच्या पाठीमागून विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आणि हिंदुस्थानला विशेष विघातक अशी स्वारी म्हटली म्हणजे महमद घोरी याची होय. अलेक्झांडरपासून महमद घोरीपर्यंत ह्या ज्या तीन विशेष अहितकारक स्वाऱ्या हिंदुस्थानवर झाल्या, त्यांच्या वेळीं हिंदुस्थानावर निरनिराळीं अनेक राज्यें होतीं व त्यांजवर त्या त्या ठिकाणचे राजे अंमल करीत होते. पण वायव्य दिशेकडून ह्या ज्या स्वाऱ्या येत होत्या त्यांचें निवारण करण्याकरितां

हिंदुस्थानांतील त्या वेळच्या राजांनीं कायमचे कांहीं उपाय योजून ठेवले होते असें कोठेंही दिसून येत नाहीं. अलेक्झांडरनें हिंदुस्थानवर स्वारी ख्रिस्ती शतकापूर्वीं ३२७ ह्या वर्षीं केली. आणि महमद घोरींची धाड हिंदुस्थानवर ख्रिस्ती शकानंतर ११८९ मध्यें पडली. ह्या सुमारें पंधराशें वर्षांच्या अवधीमध्यें हिंदुस्थानावर किती तरी वेळां परचक्रें आलीं असतील. पण हिंदुस्थानांतील लोकांनीं आपली झोंप यत्किंचितही ढळूं दिली नाहीं. अलेक्झांडरच्या वेळीं त्याच्या सवालाख सैन्याला तोंड देण्याला झेलम नदीच्या कांठीं एकटा पोरसच उभा राहिला. त्या वेळीं पंजाबांतील बाकीचे राजे कोठें होते ? आणि आपल्या देशावर आलेलें परचक्र टाळण्यासाठीं त्यांनीं काय केलें ? अलेक्झांडर एकट्या पोरस राजालाच जिंकण्याकरितां आलेला नव्हता. त्याची महत्त्वाकांक्षा फार विलक्षण होती. त्याला जितके देश जिंकावयाला आणि जितकी संपत्ति लुटावयाला मिळेल तितकी पाहिजे होती. आतां देश जिंकावयाला नाहींत, म्हणून मरते वेळीं ज्या अलेक्झांडरला वाईट वाटलें, तो हिंदुस्थानांतील एकट्या पोरस राजालाच जिंकावयाला आलेला नव्हता. तो हिंदुस्थानांतील प्रत्येक राजाचें डोकें आपल्या पायाखालीं ठेवण्याकरितां आलेला होता. बियास नदीच्या कांठावर त्याचीं सैन्यें आणि निशाणें येऊन थडकल्यानंतर त्या बियास नदीच्या कांठावरून त्याला पलीकडील मगध देशाचें राज्य दिसूं लागलें व त्याचे शिपाई थकून आणि कंटाळून गेलेले नसते आणि ते इच्छेप्रमाणें वागण्याला तयार झाले असते, तर अलेक्झांडरनें पाटलीपुत्राच्या तटांवर मॅसिडोनियाचें निशाण खात्रीनें उभें केलें असतें. पण त्याच्याबद्दल त्या वेळच्या हिंदुस्थानांतील इतर राजांनीं कांहीं तरी काळजी घेतली होती काय ? ज्याच्यावर प्रसंग गुदरेल त्यानें वाटेल तसें करावें, बाकीच्यांचा त्याच्या दुःखपरिहाराशीं कांहीं एक संबंध नाहीं, अशी स्थिति त्या वेळीं हिंदुस्थानांत होती. अलेक्झांडरचें सवालाख सैन्य म्हणजे कांहीं फार नव्हतें. हिंदुस्थानांतील कांहीं राजांचीं सैन्यें एकत्र झालीं असतीं तर त्यांची संख्या याच्या दसपट झाली असती. पण हें करावें कोणीं ? आणि ही कल्पना होती कोणाच्या डोक्यांत ? बिचाऱ्या पोरस राजावर प्रसंग आला. त्याच्यानें लढवेल तेथपर्यंत तो लढला आणि अखेरीस एखाद्या पशूप्रमाणें दांतांत गवत धरून तो शत्रूला शरण गेला.

ही अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळची गोष्ट झाली. आतां आपण गिझनी-

च्या महमदाच्याकडे वळूं. ह्या बहादरानें तर एक नव्हे, दोन नव्हे, हिंदुस्थानावर बारा स्वाऱ्या केल्या. पण ह्यांतही वरच्यासारखाच प्रकार दिसून येतो. ज्याच्यावर प्रसंग येईल त्यानें मरावें; सगळ्यांनीं मिळून कांहीं तरी तजवीज लावणें ही कल्पना कोठेंच दिसत नाहीं. भटिया, मुलतान, ठाणेश्वर, काश्मीर, कनोज, मथुरा, सोमनाथ वगैरे ठिकाणें महमदानें एकापाठीमागून एक काबीज केलीं. पण मुलतान गेलें तेव्हां ठाणेश्वराला कळ आली नाहीं, किंवा ठाणेश्वर गेलें तेव्हां कनोजला हळहळ वाटली नाहीं. महमदानें मथुरेवर हल्ला केला, आणि मथुरेंतील राधाकृष्णांचीं डोकीं फोडलीं तरी सोमनाथाचे डोळे उघडले नाहींत. अशी स्थिति असल्यामुळें महमदाला हिंदुस्थानांत वाटेल तशी दांडगाई करितां आली. ह्या वेळीही सगळ्या राजांनीं एकत्र मिळून संयोगसंधि करून लढण्याची कल्पना नव्हती. नाहीं म्हणावयाला महमदाच्या पूर्वी सबक्तगिनानें जेव्हां हिंदुस्थानावर स्वारी केली, त्या वेळीं लाहोरच्या सुभ्यावर जयपाळ या नांवाचा राजा राज्य करीत होता, त्याच्या डोक्यांत या कल्पनेचा कांहीं अंश होता. त्याला आपल्या लोकांच्या धर्मभोळेपणामुळें सबक्तगीनपाशीं तह करणें भाग पडलें. परंतु कांहीं वेळानें त्यानें कलिंजर, अजमीर, दिल्ली, कनोज वगैरे ठिकाणचे राजे आपल्या सभोंवतीं गोळा करून शत्रूला लढाई दिली. गिझनीच्या महंमदाच्या वेळीं एकदां ग्वाल्हेर, उज्जेन, कलिंजर, कनोज, अजमीर, वगैरे ठिकाणचे राजे आपसांत संयोगसंधि करून शत्रूशीं लढण्याकरितां तयार झाले होते. चितोरच्या वेढ्याच्या वेळीं बहुतेक रजपूत अल्लाउद्दिनाच्या विरुद्ध एकत्र झाले होते; व इंग्लिशांच्या विरुद्ध सर्व मराठे राजांना उठविण्याचा नाना फडणिसांनीं प्रयत्न केला होता. परंतु ही पद्धत तेथील राजांच्या मनांत चांगली ठसली नसल्यामुळें तिचा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं जितका फैलाव व्हावयाला पाहिजे तितका तो कधींच झाला नाहीं. हिंदूंच्या दंडनीतीच्या पुस्तकांतून राजांनीं असे संयोगसंधि करावे, तसे संयोगसंधि करावे, अशीं पुष्कळ वर्णनें सांगितलेलीं असतील; पण त्यांचा प्रत्यक्ष उपयोग हिंदुस्थानांतील राजांनीं हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीयत्वासाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं केल्याचें फारच विरळा दिसून येतें.

हिंदुस्थानावरील तिसरी महत्त्वाची स्वारी म्हटली म्हणजे महंमद घोरी याची होय. महमद घोरीनें स्वारी केली त्या वेळीं हिंदुस्थानांत पुष्कळ रजपूत राजे राज्य करीत होते; व त्या वेळीं मुसलमानांच्या स्वाऱ्या ह्या इतक्या वारंवार

होऊं लागल्या होत्या कीं, नवीन स्वारी केव्हां होईल याचा कांहीं एक नियम नव्हता. अशा वेळीं रजपूत राजांनीं काय करावयाला पाहिजे होतें ? गिझनीचा महमद् गेला तर त्याचा काका दुसरा येणार, ही गोष्ट ठरलेली असतांना हिंदुस्थानांतील रजपूत राजांनीं त्याबद्दल काय तजवीज करून ठेविलेली होती ? रशिया अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानांत येईल ही भीति कायमची असल्यामुळें इंग्लिशांनीं वायव्येकडील सरहद्दीवर जसा बंदोबस्त ठेविला आहे आणि अफगाणिस्थानच्या अमिराला आपल्या हाताखालीं घालून ठेविलें आहे, किंवा चिनात कांही तरी गडबड होणार हें खास असल्यामुळें इंग्लंडनें जपानशीं आधींच संयोगसंधि करून ठेविला आहे, तशा प्रकारची दूरदर्शित्वाची योजना त्या वेळच्या रजपूत राजांनीं काय केली होती ? दिल्ली, अजमीर, कनोज, गुजराथ येथील सिंहासनांवरून मोठमोठे रजपूत राजे विराजमान झालेले होते. पण त्यांनीं आपल्या भावी संकटांची काय तरतूद करून ठेविली होती ? आपसांतील हाडवैराचे किल्ले आणि परस्परभांडणांचे संयोगसंधि ही मात्र तयारी त्यांनीं करून ठेविली होती. त्या वेळीं दिल्ली येथें पृथ्वीराज हा राज्य करीत होता; व कनोजचें राज्य जयचंद्राकडे होतें. हे दोन राजे त्या वेळीं सर्व रजपुतांमध्यें प्रमुख होते. परंतु त्या दोघांचें आपसामध्यें जें वैमनस्य होतें तें त्यांच्या नाशाला, इतकेंच नव्हे तर सर्व हिंदुस्थानच्या भावी नाशाला, कारण झालें. कारण, महंमद् घोरीच्या स्वारीपासूनच हिंदुस्थानावर मुसलमानांचा अंमल कायमचा झाला. महंमद घोरीनें पृथ्वीराजावर स्वारी केली, तेव्हां जयचंद्राला आनंद झाला. जेव्हां आपल्या जन्मभूमिरूप आईवर महंमद् घोरी बलात्कार करीत होता, आणि जेव्हां आपल्या बंधुसमान पृथ्वीराजाचा महंमद् घोरी पराभव करीत होता, तेव्हां जयचंद्राला एखाद्या अत्यंत नीच कुलांगाराप्रमाणें समाधान वाटत होतें. परंतु आपल्या निंद्य स्वभावाबद्दलचें प्रायश्चित्त जयचंद्रालाही लवकरच मिळालें. पृथ्वीराजाचा पराभव केल्यानंतर महमद् घोरीनें दुसऱ्याच वर्षीं जयचंद्राचेंही चंदन उडविलें. अशा रीतीनें हिंदुस्थानांतील राजांच्या आपसांतील वैमनस्यावर महंमद् घोरीनें तेराव्या शतकाच्या प्रारंभीं जी इमारत उभारली ती औरंगजेबाच्या मरणापर्यंत पांचशें वर्षें अव्याहत टिकली.

हिंदुस्थाननें हीं पांचशें वर्षें मुसलमानांच्या गुलामगिरींत घालवलीं, तरी हिंदुस्थानचे डोळे उघडले नाहींत. औरंगजेबाच्या मरणानंतर अठराव्या शतकां

च्या प्रारंभीं सर्व हिंदुस्थानचे राजे आणि लोक एक झाले असते तरी देखील त्यांचें पुष्कळ कल्याण झालें असतें. ह्या पांचशें वर्षांच्या मुसलमानी जुलुमाच्या सुकाळामध्यें हिंदुस्थानावर तैमुरलगाच्या स्वारीशिवाय दुसऱ्या परकीय लोकांच्या विशेष म्हणण्यासारख्या स्वाऱ्या झाल्या नाहींत. परंतु अठराव्या शतकाच्या प्रारंभापासून दुसऱ्या एक प्रकारच्या नवीन स्वाऱ्यांना सुरुवात झाली. अठराव्या शतकापर्यंत हिंदुस्थानावर झालेल्या स्वाऱ्या हिंदुस्थानच्या वायव्य दिशेकडून आल्या; परंतु यापुढच्या स्वाऱ्या पश्चिमेकडून येऊं लागल्या. येथपर्यंतच्या स्वाऱ्या जमिनीवरच्या होत्या. याच्या पुढच्या स्वाऱ्या समुद्रावरून होऊं लागल्या. एवढा वेळपर्यंत एशियांतील लोकच हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत होते. पण आतां युरोपांतील लोक येऊन हिंदुस्थानावर धाड घालूं लागले. हिंदुस्थानांतील माल ह्या वेळीं युरोपांत पुष्कळ जात असल्यामुळें इकडील संपत्तीची तिकडे फार प्रख्याति झालेली होती व ती संपत्ति आपल्याला मिळावी म्हणून युरोपियन राष्ट्रांच्या तोंडाला पाणी सुटत चाललें होतें. पूर्वीं हिंदुस्थानांतील माल अरब लोक अरबस्थान, एशिया मायनर या देशांतून इटलीच्या किनाऱ्यावरून यूरोप खंडांत नेत असत. परंतु याच्यापेक्षां जवळची आणि समुद्राची वाट आपल्याला मिळाली तर आरबी लोकांच्या हातचा व्यापार आपल्या हातांत येऊन आपल्याला पुष्कळ फायदा होईल असें युरोपियन लोकांना वाटूं लागलें. असा मार्ग शोधून काढण्याच्या प्रयत्नांत असतांना एकाला अमेरिका सांपडली आणि दुसऱ्याला केप ऑफ स्टॉर्म्स मिळालें, परंतु हिंदुस्थानच्या दुर्दैवानें त्या केप ऑफ स्टॉर्म्समधील सर्व वादळें शांत होऊन तें केप ऑफ गुड होप झालें व वास्को-डि-गामाचे पहिले पांढरे ( कारण तो गोरा होता ) पाय हिंदुस्थानला लागले. हा पहिला युरोपियन अनुग्रह झॅमोरिन ऑफ कॅलिकत ह्याजवर झाला. हें उंटाचें पिलूं घरांत घेतलें तर ह्यापासून पुढें काय अनर्थ ओढवतील ह्याची कल्पना झॅमोरिनला नव्हती. तरी पण त्या वेळीं यूरोप आणि एशिया ह्यांच्यामधील व्यापाराचा एशियाच्या हितासाठीं नेआण करणारे जे अरब लोक होते, त्यांना मात्र त्यापासून ओढवणाऱ्या अनर्थाची बरोबर कल्पना आली. ह्यांना आश्रय देऊ नये म्हणून त्या आरब लोकांनीं झॅमोरिनला पुष्कळ सांगितलें. व त्यांचें सांगणें झॅमोरिननें ऐकलें असतें, तर आज हिंदुस्थान इतकें धुतलेलें दिसलें नसतें. आरब व्यापारी झॅमोरिनला हा जो सल्ला देत होते

तो हिंदुस्थानच्या किंवा एशियाच्या सार्वजनिक हितासाठीं देत नसून ते आपल्या खासगी फायद्यासाठीं देत होते, असा आक्षेप युरोपियन लोक येथें घ्यावयाला कधींही चुकावयाचे नाहींत. पण ते आरबी व्यापारी स्वार्थासाठीं असें म्हणत असले म्हणून तरी काय झालें ? हल्लीं युरोपियन राजे तरी काय करीत आहेत ? आपल्या देशांतील व्यापाऱ्यांचें आणि व्यापाराचें हित होण्यासाठीं त्यांनीं काय केलें नाहीं ? पण हिंदुस्थानांत त्या वेळीं आपल्या व्यापाऱ्यांचें जें हित तेंच आपल्या देशाचें हित ही साधी गोष्ट जाणण्याइतकादेखील कोणी शहाणा राजा नव्हता. युरोपियन व्यापाऱ्यांचा हिंदुस्थानांतील राजांनीं मोठा आदरसत्कार करून त्यांना आपल्या घरांत घेतलें. ह्याप्रमाणें वास्को-डि-गामानें हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर भोक पाडलें. आणि एकदां भोक पडल्यावर मग काय विचारतां ? एका मागून एक असे ते हिंदुस्थानांत घुसूं लागले. अलबुकर्कनें हिंदुस्थानचा पश्चिम किनारा व्यापला. फ्रेंचांनीं पूर्व किनाऱ्यावर आपले बावटे लावले व डच लोक जावा, सुमात्रा, अंबोयना ही ठिकाणें आमचींच असें म्हणूं लागले. इंग्लिश लोक मात्र अजून आलेले नव्हते ! प्रबळ रोग ज्याप्रमाणें शरीराचे एकेक भाग व्यापून टाकितात, त्याप्रमाणें हिंदुस्थानच्या समुद्र किनाऱ्यावरील बरींच ठिकाणें युरोपियन लोकांनीं हळूहळू ह्या रीतीनें व्यापून टाकिलीं. तरी हिंदुस्थानांतील लोक अगदीं बेफिकीर होते. वास्तविक त्यांचे डोळे उघडावयाला पाहिजे होते. परकीय लोकांच्या स्वाऱ्या म्हणजे काय असतें याचा अनुभव त्यांना त्या वेळीं पुष्कळ आलेला होता. अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां ती पहिली परकीय स्वारीची खेप असल्यामुळें, कदाचित् लोकांनीं तिकडे दुर्लक्ष केलें असेल; व त्या स्वारीचे वाईट परिणाम त्यांना फारसे भोगावे लागलेले नसल्या-मुळें त्यांनीं गिझनीच्या महंमदाच्या स्वाऱ्यांकडेही कदाचित् दुर्लक्ष केलें असेल. पण त्यानंतर पुढें हिंदुस्थानांतील लोकांना जुलमापासून जो त्रास झाला तो इतका होता कीं, तो प्रत्यक्ष पशूदेखील विसरले नसते. पण हिंदुस्थानांतील लोक तो देखील विसरले. कारण हिंदुकुश पर्वतावरून येणाऱ्या स्वाऱ्यांची लाट थांबल्या-नंतर पश्चिमेकडून समुद्रावरून येणाऱ्या परकीय स्वाऱ्यांच्या लाटेला योग्य प्रतिबंध करण्यासाठीं त्यांनीं कांहींच केलं नाहीं. युरोपियन लोक पहिल्यानें व्यापारासाठीं म्हणून आले. परंतु येथें हळूहळू राज्य स्थापन करावें अशी इच्छा त्यांना उत्पन्न होऊं लागली; व फ्रेंचांना सरदार डुप्ली याची तर महत्त्वा-

कांक्षा सर्व हिंदुस्थानभर फ्रेंच साम्राज्य स्थापन करण्याची होती. स्वदेशा- व्यापार बुडून परदेशाचा व्यापार वाढूं लागला तर त्या व्यापारालाही प्रतिबं करणें हे हिंदुस्थानांतील राजांचें आणि लोकांचें कर्तव्यकर्म होतें. परंतु हिं स्थानांतील शिपाई चाकरीला ठेवून त्यांच्याकडूनच येथील राजांना जिंकू येथें आपण आपलें साम्राज्य स्थापन करूं अशी महत्त्वाकांक्षा जेव्हां डुप्लीच मनामध्यें उत्पन्न झाली व जेव्हां तो त्यासाठीं उघड उघड प्रयत्न क लागला, तेव्हां तरी निदान त्याला हिंदुस्थानांतील राजांनीं आणि लोकांनीं ए होऊन प्रतिबंध करावयाला पाहिजे होता. तीं प्रतिबंध करण्याची वेळ होती आपल्याच जातभाईच्या विरुद्ध लढण्याकरितां फ्रेंचांची मदत न घेतां सगळ्य हिंदुस्थानांतील जातभाईनीं एकत्र होऊन फ्रेंचांच्या विरुद्ध लढण्यासाठीं तया व्हावयाला पाहिजे होतें. असें झालें असतें, तर आज हिंदुस्थानचें भाग्य कित तरी उदयाला आलेलें आपल्याला दिसलें असतें ! परचक्र येऊं द्यावयाचें नाहीं, किंवा आलें तर त्याचें निवारण करावयाचें, ह्या एकच कल्पनेनें स हिंदुस्थान प्रेरित झालें असतें तर ती एक कल्पना हिंदुस्थानच्या विस्कळित झालेल्या सर्व भागाला एकत्र बांधून टाकण्याला फार उपयोगीं पडली असती त्या वेळचे शत्रु हे समुद्रांतून हिंदुस्थानावर हल्ला करणारे असल्यामुळें व सुरते पासून कलकत्त्यापर्यंत हिंदुस्थानचा सर्व किनारा उघडा असल्यामुळें शत्रु कोठें उतरून हल्ला करतील ह्याचा नेम नसल्याकारणानें जेथें शत्रु येईल तेथल्य राजानें किंवा लोकांनीं त्याच्यापाशीं लढावें, अशी व्यवस्था ठेवून हिंदुस्थाना वरचें परचक्र टळलें नसतें. त्यासाठीं सर्व राजांची मिळून एक निराळीच सेना तयार करावी लागली असती व ही सेना पाहिजे त्या ठिकाणीं नेतां आली असती. उत्तरेकडून स्वारी येण्याची त्या वेळीं फारशी भीति नव्हती व असतीच तरी तिकडच्या मार्गाच्या संरक्षणासाठीं कांहीं सैन्य आणि एकंदर समुद्रकिनाऱ्या- च्या संरक्षणासाठीं बाकीचें सैन्य अशी व्यवस्था झाली असती, तर हिंदु- स्थानचें परकीय शत्रूंपासून चांगलें संरक्षण झालें असतें. कारण, हल्लींच्याप्रमाणें तेव्हांही हिंदुस्थानाला हिंदुकुशपर्वत आणि समुद्रकिनारा या दोन बाजूंनींच विशेष भीति होती. ब्रह्मदेश, सयाम वगैरे बाजूंनीं परचक्र येण्याचें भय नव्हतें. वायव्येची सरहद्द आणि समुद्रकिनारा यांचें संरक्षण करण्याला हिंदुस्थानच्या संयुक्त सैन्याला फारसें जड गेलें असतें असें नाहीं. उत्तरेस दिल्लींतील मोंगल

बादशहा, फरुक्शायर, महंमद्शहा वगैरेचें पुष्कळ वजन होतें व दक्षिणेंत बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं तर आपली सत्ता चांगलीच बसविलेली होती. हे प्रमुख होऊन ह्यांनीं जर हिंदुस्थानच्या सर्व राजांना एकत्र केलें असतें, तर लाहोरचे सुभेदार, दिल्लीचे बादशहा, अयोध्येचे नबाब, बंगालचे सुभेदार, राजपुतान्यांतील रजपूत राजे, ग्वाल्हेरचे शिंदे, इंदूरचे होळकर, नागपूरचे भोसले, पुण्यांतील पेशवे, रोहिलखंडांतील रोहिले, हैद्राबादचे निजाम आणि मद्रासेकडील नायर आणि नाईक. यांच्यापुढें युरोपियन लोकांचें कांहीं एक चाललें नसतें. पण इतके सगळे राजे एक झाले असते, म्हणजे अर्थातच ह्यांच्यांतील खासगी वैमनस्य मोडून गेलें असतें, व त्यांच्यांत कांहीं तंटेबखेडे उपस्थित झाले असते, तर ते तडजोडीनें मोडण्यांत आले असते. अशी व्यवस्था सुरू झाली असती म्हणजे अर्थातच लढाईचें कारण न उरून सर्वत्र शांतता झाली असती. बाहेरून परचक्राचें भय नाहीं आणि आंतून शांतता आहे, अशा प्रकारची स्थिति हिंदुस्थानासारख्या सुपीक आणि सुसंपन्न देशाला प्राप्त झाली असती, तर त्या वेळच्या बुद्धिमान् लोकांनीं त्या स्थितीचा काय काय फायदा करून घेतला नसता ? हल्लीं हिंदुस्थानावर इंग्रजांचें राज्य आहे, म्हणून हिंदुस्थानांत आगगाड्या, तारायंत्रें आणि दुसऱ्या अनेक पाश्चिमात्य सुधारणा झाल्या आहेत असें कित्येकांचें मत आहे. पण आपण ज्या स्थितीची हलीं वर दिल्याप्रमाणें कल्पना करीत आहों तशी स्थिति आपल्या सुदैवानें झाली असती, आणि हिंदुस्थानावर हिंदुस्थानचेंच राज्य असतें, तर हिंदुस्थानानें सहस्रपट सुधारणा केल्या असत्या. सर्व हिंदुस्थान एक होऊन स्वतंत्र राहिलें असतें तर त्यांत पूर्वीचे उद्योगधंदे न बुडतां पश्चिमेकडील नवीन उद्योगधंदे सुरू झाले असते. तिकडे वाफेचा उपयोग करून घेण्याची कल्पना निघाल्याबरोबर बाकीच्या देशांतील लोकांप्रमाणेंच हिंदुस्थानांतील लोकांनींही आपल्या इकडे आगगाड्या आणि आगबोटी सुरू केल्या असत्या; व जे मूर लोक पूर्वी हिंदुस्थानांतील माल गलबतांतून व्हेनिसला नेत होते, तेच आगबोटींतून नेऊं लागले असते. हल्लीं हिंदुस्थानची जी अगणित संपत्ति यूरोपमध्यें गेलेली आहे ती न जातां आपल्या स्वतंत्र राष्ट्राच्या व्यापारामुळें तिकडील किती तरी संपत्ति आपल्या इकडे आली असती व हिंदुस्थान अमेरिकेपेक्षांही जास्त श्रीमंत झालें असतें. हिंदुस्थानच्या पोटांत नानाविध धातु

भरलेल्या आहेत. त्या खणून उद्योगी लोकांनीं येथेंही मोठमोठे लोखंडाचे कार खाने काढले असते, व त्या कारखान्यांतून कामें करितां करितां इतर लोकां प्रमाणें येथल्या लोकांनींही कांहीं नवीन शोध लाविले असते. त्याचप्रमाणें स्वतंत्र हिंदुस्थानचे विचारही स्वतंत्रच राहिले असते. स्वतंत्रतेचा उपभोग घेणाऱ्या हिंदुस्थानांत उत्तम कवि, उत्तम ग्रंथकार, उत्तम कारागीर, उत्तम शिल्पकार उत्तम अर्थशास्त्रवेत्ते, उत्तम तत्त्ववेत्ते, उत्तम चित्रकार वगैरे सर्व प्रकारचे उत्तम लोक निपजून त्यांनीं हिंदुस्थान देश उत्तमांतील उत्तम करून ठेविला असता. स्वतंत्र हिंदुस्थानापासून एशिया खंडांतील इतर देशांचाही पुष्कळ फायदा झाला असता. स्वतंत्र हिंदुस्थानानें बाकीच्या एशियाटिक देशांची स्वतंत्रता कायम राखण्याला मदत केली असती. ब्रम्हदेश ब्रम्ही लोकांच्या ताब्यांतून त्यानें जाऊं दिला नसता. सयामच्या मुलखांत परकीय लोकांचें प्राबल्य त्यानें होऊं दिलें नसतें. एशियाटिक तुर्कस्थानमध्यें रशियाचा प्लेग जो पसरला आहे त्याजवर त्यानें सर्व्हेलन्स ठेविलें असतें. इराणच्या दरबारांत इराणच्या शहाचेंच अस्तित्व कायम राहावें, यासाठीं त्यानें लक्ष पोंचविलें असतें. चीनच्या जुनाट साम्राज्याच्या अंगाचे तुकडे तुकडे होऊं नयेत म्हणून ढालीप्रमाणें तो त्याच्या पुढें येऊन उभा राहिला असता; व जपान हा आपला धाकटा स्वतंत्र भाऊ म्हणून त्यानें त्याला प्रेमालिंगन दिलें असतें. सारांश, एशिया खंडांत स्वतंत्र-तेचा संरक्षक म्हणून हिंदुस्थानची ख्याति झाली असती. जुलुमानें गांजलेले लोक हिंदुस्थानची मदत मागण्याकरितां त्याजकडे धांवत आले असते व हिंदुस्थानच्या आरमारांनीं आणि सैन्यांनीं लढाया जिंकून स्वतंत्रतेच्या शत्रूंचा बींमोड करून टाकला असता. अमेरिकेंतल्याप्रमाणें हिंदुस्थाननें एशिया खंडाकरितां मनरो डॉक्ट्रिनही स्थापित केलें असतें. दुसऱ्या खंडांत जाऊन आपलें राज्य वाढविण्याची वेडगळ महत्त्वाकांक्षा न धरितां आपलें आहे त्यांतच संतोष म.नून हिंदुस्थानानें जिकडे तिकडे स्वतंत्रतेचें आणि संतोषाचें साम्राज्य स्थापित केलें असतें. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर परकीय लोकांचीं लढाऊ गलबतें न दिसतां आपलीं आरमारें हिंदी महासागराच्या पाण्यावर तरंगत पडलीं असतीं. हिंदुस्थानच्या किल्ल्यांतून आपले लोक, आपले शिपाई, आपल्या तोफा आणि आपला दारूगोळा असा देखावा दिसला असता. हिंदुस्थानच्या बाजारांतून आपल्या देशांत तयार केलेल्या मालांनींच भरलेलीं दुकानें आपल्या दृष्टीस पडलीं असतीं. आपल्या

मित्रांना भेटल्यामुळें झालेला आनंद आपण आपल्या भाषेमध्यें प्रकट केला असता. आणि आपल्या दूरच्या इष्टमित्रांना आपण आपल्या भाषेमध्येंच पत्रें लिहिलीं असतीं. आपले पगार अमुक रुपयांच्यावर वाढावयाचे नाहीत किंवा आपल्याला अमुक इयत्तेच्या पलीकडील जागा मिळावयाची नाहीं असल्या नियमांनीं आपण बांधले न जातां आपल्या अंगांत जितकें सामर्थ्य असेल त्या मानानें आपण वाढलों असतों आणि त्या मानानें आपण मोठ्या जागा मिळविल्या असत्या.

हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य स्थापन करण्याचा डुप्लीनें प्रयत्न चालविला त्या वेळेला हिंदुस्थानचे राजे आणि लोक एकत्र झाले असते तर वरच्याप्रमाणें फायदे झाले असते. आतां तशी गोष्ट झाली असती तर त्यापासून आपल्याला कांहीं तोटेही सोसावे लागले असते. त्या वेळीं फ्रेंचांचीच डाळ शिजली नसती, तर इंग्रजांच्या राज्यापासून आज जे कांहीं आपल्याला फायदे होत आहेत त्याला आधीं आपण आंचवलों असतों. लॉर्ड कॅनिंग, लॉर्ड रिपन, लॉर्ड कर्झन यांच्यासारख्या चांगल्या व्हाइसरॉयांच्या चांगल्या राज्यपद्धतीचा आपल्याला अनुभव मिळाला नसता. इंग्लिशांसारख्या शूर आणि उदात्त लोकांच्या उदाहरणाचा आपल्याला फायदा घेतां आला नसता. हे आपले मुख्य तोटे झाले असते. पण ह्याशिवाय हिंदुस्थानचे राजे एक होऊन त्या वेळेपासून हिंदुस्थान स्वतंत्र राहतें तर क्लाइव्हसाहेबांनीं उमीचंदासाठीं केलेले खोटे कागद आणि वाटसनसाहेबांची केलेली खोटी सही, हेस्टिंग्ससाहेबांनीं घेतलेले लांच आणि केलेले जुलूम, डलहोसीसाहेबांनीं गिळलेलीं राज्यें आणि ओकलेलें बंड ह्यांना मात्र आपण सर्वस्वीं मुकलों असतों. त्या वेळचे राजे एकत्र झाले असते तर आज आपली विलायतेला कच्चा माल पुरविण्याबद्दलची जी ख्याति आहे ती झाली नसती, आपल्या गव्हांबद्दल विलायतेंतील लोक जी तारीफ करितात ती कोणी केली नसती, जीं मुलें दुष्काळानें फुकट मरून गेलीं असती अशा अल्पवयी मुलांना देखील ख्रिस्ती धर्माचीं जीं अत्युदात्त तत्त्वें आज सहज कळत आहेत तीं त्यांना त्यांच्या उतारवयांत आणि मोठ्या परिश्रमानेंही समजलीं नसतीं, व दुष्काळाच्या दिवसांत आपल्यांतील हजारों लोक रिलीफ कामावरून एकत्र जमून कोठें रस्ते बांध, कोठें तळीं खण, अशा प्रकारचीं जीं आज परोपकाराचीं आणि लोकोपयोगी कामें करीत आहेत

तीं त्यांच्या हातून कधींही घडलीं नसतीं. पैशाच्या योगानें मनुष्य उन्मत्त होतो म्हणून तो नसल्यामुळें आपल्या अंगामध्यें आज जो स्वाभाविक नम्रपणा आलेला आहे तो आपल्याला लाभला नसता. हे आपले स्वतःचे तोटे झाले असते. पण ह्याशिवाय आपण इतरही कित्येकांच्या नुकसानीला कारणीभूत झालों असतों. तेव्हां जर सर्व राजे एकत्र झाले असते तर आधीं गुलामगिरीला, दारिद्र्याला आणि दुष्काळाला राहण्याला अशी ऐसपैस जागा दुसरीकडे न मिळून त्यांची फार गैरसोय झाली असती; इंग्लंडला आणीबाणीच्या प्रसंगीं लागेल तितका पैसा आणि लष्कर मिळण्याला पंचाईत पडली असती, अफगाणिस्थानला फुकट खंडणी मिळाली नसती, आणि रशियाला स्वारीची भीति घालण्याला ठिकाण मिळालें नसतें; बोअर कैदी ठेवण्याला हिंदुस्थानसारखे बिनभिंतीचे विस्तीर्ण तुरुंग दुसरीकडे सांपडले नसते, आणि राज्यारोहणाच्या वेळीं दरबार भरविण्याकरितां अतिशय जुनाट शहर, पुष्कळ हत्ती आणि सोन्यांनीं आणि मोत्यांनीं मढविलेलीं राजांचीं शरीरें दुसरीकडे कोठेंच मिळण्यासारखीं नसल्यामुळें एकंदर राज्यारोहणामध्यें मोठा विरस झाला असता!

समाप्त.

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

महाराष्ट्रांत आयुर्वेदिक औषधें व अितर पेटंट औषधें तयार करून विकणाऱ्या ज्या थोड्या यशस्वी कंपन्या आहेत त्यांमध्यें अत्यंत थोड्या अवकाशांत व युद्धकालीन सर्व अडचणींना तोंड देअूनही **सूर्य किरणनें** चांगलें नांव कमावलें आहे.

कंपनी १४ डिसेंबर १९४३ मध्यें स्थापन झाली. पण कंपनीच्या प्रत्यक्ष कामाला सुरुवात मात्र जानेवारी १९४५ पर्यंत होअूं शकली नाहीं. कॅपिटल अिश्यूवरील युद्धकालीन कंट्रोलमुळें भांडवलाची परवानगी मिळवून पुरेसें भांडवल जमा करणें व चांगला अनुभवी संचालक वर्ग मिळविणें या प्राथमिक कामामध्येंच जवळजवळ अेक वर्ष गेलें.

पण या वर्षामध्यें कंपनीचा पाया मात्र अगदीं दृढ व मजबूत रीतीनें बसविला गेला व व्यापारक्षेत्रांतील निरनिराळ्या शाखांमध्यें वाकबगार व अनुभवी अशा कार्यकर्त्यांची व संचालकवर्गाची जोड कंपनीला व कारखान्याला मिळाली आहे. **मे. पी. लिमये आणि कंपनी** ही फर्म या कंपनीचे मॅनेजिंग अेजंट्स् असून या फर्मचे भागीदारांना या धंद्याचा—औषधें तयार करणें व त्यांची यशस्वी विक्री—सुमारें अेक तपाचा अनुभव आहे. तसेंच संचालकवर्गामध्ये:

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

व्यापारक्षेत्रांमध्यें हि अनुभवी व योग्य मार्गदर्शन करणारे असेच संचालक पनीला लाभले आहेत.

**मे. पी. लिमये आणि कंपनीचे** भागीदारांपैकीं **श्री. के. गो. लिमये** ल्ह्यांतील व भोर संस्थानांतील अुत्साही कार्यकर्ते असून कित्येक कंपन्यांचे स्थापक व व्यवस्थापक आहेत. **वै. पू. गो. ऊर्फ राजाभाऊ लिमये** हे टिळक ाविद्यालयाचे स्कॉलर व पदवीधर असून आयुर्वेद रसशाळेनें त्यांना औषधि र्माण शास्त्राचा अभ्यास व संशोधन करण्याकरतां खास शिष्यवृत्ति दिली ती. या शास्त्राचा अभ्यास करून त्यांनीं रसशाळेंत औषधि निर्माणाधिकारी पुणें केंद्रप्रमुख या नात्यानें कामें केलीं आहेत. तसेंच औषधी कारखान्यांतील क्रीशास्त्र व हिशोब यांचा अनुभव असलेले **वै. गो. कृ. पेठे** व **वै. द. ह. ोडोलीकर** ही सहाय्यक मंडळी फर्मला मिळाली आहेत. **वै. काळे** हेहि ा क्षेत्रांत अनुभवी असून मुंबअी केंद्राचे सर्वाधिकारी आहेत.

संचालक वर्गामध्यें खालील सद्‌गृहस्थ आहेत. हे सर्वच यशस्वी व्यापारी व शल कार्यकर्ते आहेत व त्यांनीं आपल्या अनुभवी मार्गदर्शनानें कंपनीचा स्तार करण्यासाठीं आपलें तनमन देण्याचें ठरविलें आहे.

१ डॉ. **दि. स. सरदेसाई** यांची ओळख निदान महाराष्ट्रास तरी करून ण्याची आवश्यकता नाहीं. हे डोळ्यांचे डॉक्टर म्हणून प्रसिद्ध आहेत. डॉ. रदेसाअी हे तळेगांवच्या जनरल हॉस्पिटलचे संस्थापक असून किर्लोस्कर बंधु ॰. चे अेक डायरेक्टर आहेत.

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

२ वै. र. **वा. ऊर्फ मामासाहेब जोशी** हे आयुर्वेद रसशाळेच्या संस्थापकांपैकीं अेक असून रसशाळेच्या आजच्या यशाचे ते बहुतांशीं वांटेकरी आहेत. रसशाळेचे अेक्स-ऑफीशिओ डायरेक्टर म्हणून प्रथम पासून त्यांनीं काम केलेलें असल्यामुळें त्यांच्या अनुभवाचा लाभ आमचे फार्मसीस प्रथमपासून मिळणार आहे. बँकांसारख्या अितर कित्येक कंपन्यांचे ते डायरेक्टर आहेत. याशिवाय विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट ही कीं, "पैसा फंड" संस्थेला सध्यांच्या अुन्नतावस्थेला आणणाऱ्या मंडळींपैकीं वै. मामासाहेब जोशी हे अेक असून ते पैसा फंडाचे खजिनदार आहेत.

३ रसवैद्य **स.ब.कुलकर्णी दुधगांवकर** हे कोल्हापूर भागांतील अेक विद्वान् नाणावलेले वैद्य असून यांनीं बँकेसारख्या संस्थेचे डायरेक्टर व नगरपालिकेचे लोकनियुक्त सभासद या नात्यांनीं अुत्तम कामें केलेलीं आहेत. आयुर्वेदीय औषधीकरण-प्रक्रियेतील तज्ज्ञ म्हणून व विशेषतः रसायनें, भस्में वगैरे औषधें शास्त्रशुद्ध रीतीनें तयार करण्याचे बाबतींत सबंध महाराष्ट्रांतील वैद्यवर्गांत यांची प्रसिद्धि असून या शास्त्रांतील अधिकारी व्यक्ति म्हणून त्यांस मान आहे.

४ **श्री. गो. रा. ऊर्फ बापूसाहेब लिमये** हे पाली सं. भोर येथील अेक जमीनदार आहेत. भोर संस्थानांतील व कुलाबा जिल्ह्यांतील त्यांचें सार्वजनिक कार्य महशूर आहे. अस्पृश्योद्धारासारखीं कार्यें त्यांनीं चिकाटीनें अनेक वर्षें चालविलेलीं असून हरिजनसेवक म्हणून सर्व महाराष्ट्रांत ते प्रसिद्ध आहेत. सुधागड तालुक्यांतील प्रमुख व्यापारी संस्थांचे ते अध्यक्ष आहेत.

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

५ **श्री. श्रीकृष्ण विद्याधर दामले,** बी. कॉम्., हे नवीन किताबखान्याचे मालक असून यांचा व्यापाराचा व विशेषतः व्यापारी हिशेबाचा अनुभव आम्हांस अुपयोगी पडणार आहे. ' महाराष्ट्र अिंडस्ट्रिअल अिन्व्हेस्टमेंटस् लि.' चे हे अेक डायरेक्टर आहेत.

६ **श्री. सदाशिव विष्णु अूर्फ सदूकाका रानडे,** बी. अे., हे सुप्रसिद्ध काँट्रॅक्टर्स मेसर्स व्ही. आर. रानडे अँड सन्सचे भागीदार आहेत.

७ **एम्. एच्. मोलेदिना** पुणें.

कंपनीनें आतांपर्यंत अनेक रोग्यांवर वापरून गुणकारी ठरलेलीं अशीं कांहीं खात्रीचीं औषधें पेटंट स्वरूपानें काढलीं असून तीं अल्पावधींतच लोकप्रिय झालीं आहेत. व दिवसेंदिवस त्यांचा खप व लोकप्रियता वृद्धिंगत होत आहे. या स्वरूपाच्या औषधांमध्यें खालील प्रमुख आहेत.

( १ ) **हेमकिरण**—हे सर्वोत्कृष्ट शक्तिवर्धक टॉनिक असून यामध्यें सुवर्ण, अभ्रक मौक्तिकादि भस्में अितर दीपक व पाचक जीवनीय वनस्पति व ' सी ' व्हिटॅमिनयुक्त आवळ्यांचा अवलेह यांचा समावेश केलेला आहे. हें सेवन केल्यानें पचनशक्ति सुधारते व दैनंदिन झीज व आजारानंतरची अशक्तता भरून येअून रोगप्रतिकारशक्ति वाढते.

( २ ) **किरण हेअर ऑअील**—अनेक केशवर्धक व थंड वनस्पतींपासून हें तेल बनविलें आहे. याचा नित्य अुपयोग केल्यानें केसांच्या मुळांना जीवन

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

मिळतें व ते मऊ, काळे व लांबसडक होतात. गळणारे केस थांबतात व नवीन केस भरपूर वाढतात.

( ३ ) **किरणांग तेल**—हें अेक सर्वोत्तम मालिश तेल आहे. हें तेल अंगास लावल्यानें थोड्याच दिवसांत ते शरिरावयव चांगले पुष्ट व तजेलदार होतात. विशेषतः आजारांतून अुठलेल्यांकरितां व अशक्त स्त्रिया, मुलें, बाळंतिणी, व मुडदुस झालेलीं मुलें यासाठीं हें अत्युपयुक्त मालिश आहे. हें कृशांना पुष्ट बनवितें. त्याचप्रमाणें याच्या योगानें रक्ताभिसरण सुधारल्यानें स्थूल माणसांचा मेद कमी होअून शरीर सुटसुटीत व हलकें बनतें.

( ४ ) **वि-कास**—( खोकल्याच्या गोळ्या ) याचे योगाने घसा, फुप्फुसें अि० ठिकाणीं सांठलेला कफ पातळ होअून बेडका लवकर सुटतो व त्या त्या ठिकाणची सूज कमी होते.

या गोड व सुगंधी गोळ्या तोंडांत धरून ठेवल्यानें मुखाला सुगंध प्राप्त होअून शिवाय खालील आराम प्राप्त होतात.

( १ ) थंड पेयें, थंडी, पडसें, ताप अि० कारणांनीं खोकला होणें, पडसे येणें व घसा सुजणें अित्यादि विकार बरे होतात. खोकल्यावर सर्वोत्कृष्ट.

या शिवाय अितर नित्योपयोगी गुणकारी औषधें, अर्क, आसवें, तेलें वगैरे शास्त्रसिद्ध रीतीनें कंपनीच्या कारखान्यांत तयार होअून आज बाजारपेठांत लोकप्रियता व विश्वास संपादित आहेत.

# धि सूर्यकिरण फार्मसी, लिमिटेड, तळेगांव

या शिवाय ग्रामीण जनतेला हरघडी लागणारीं सर्व सामान्य रोगांवरील औषधें अल्प किंमतींत सर्वांना सहज साध्य व्हावीत या अुद्देशानें आम्ही अेक आणा सिरीज् पाकिटांच्या स्वरूपांत काढली असून त्यांना मोठ्या व वाढत्या प्रमाणांत मागणी आहे. यांतील मुख्य औषधें खालीलप्रमाणें :—

१ **अनल जीवन**—सर्वोत्तम दीपक व पाचक.

२ **एस. के. टॅब्ज**—डोकें दुखीवर सर्वोत्तम.

३ **किरण शोधन**—अुत्कृष्ट सौम्य सारक.

कंपनीचा कारखाना तळेगांव येथें पैसा फंड कांचकारखान्याचे शेजारी स्वतःच्या मालकीच्या पांच अेकर जागेंत असून त्या ठिकाणी ३० फूट × १०० फूट ची अिमारत कारखान्यासाटीं तयार झाली आहे. या ठिकाणींच चालकांसाठीं रहात्या जागा व गेस्ट हाअुस बांधण्याचाहि कंपनीचा विचार आहे.

कंपनीच्या चालकांत सर्वच नाणावलेले चिकित्सक असल्यानें लौकरच स्वतःचें अिस्पितळ व संशोधन शाला काढून औषधांचें संशोधन व परीक्षणाला योग्य परिस्थिती निर्माण करणें हें आमचें स्वप्न आहे. व वाढत्या लोकप्रियतेवरून हें लौकरच प्रत्यक्षांत येअील असा दृढ विश्वास वाटतो.

